हिंद एजन्सी विविध-विषय ग्रंथमाला.

पुष्प ११ वें. 

# श्रीशिवाजी महाराजांचें आरमार



अथवा

# सांवळ्या तांडेल.

( ऐतिहासिक सचित्र कादंबरी. )

लेखक—श्रीयुत नाथ माधव.

प्रकाशक—हिंद एजन्सी,

बुकसेलर्स ॲन्ड पब्लिशर्स माधवबागें, मुंबई.

सन १९१४—शके १८३६.



किंमत १। रुपया.



748

# प्रस्तावना.

छत्रपति श्रीशिवाजी महाराजांच्या आरमाराची केव्हां स्थापना झाली, त्यासंबंधीं निश्चयात्मक उलेख केलेला कोठेंच आढळत नाहीं. तसेंच त्यांच्या आरमारासंबंधीं सर्व हकीकतहि उपलब्ध नाहीं. ही माहिती मिळावी म्हणून मी शक्य तितका प्रयत्न केला, माझ्या कांहीं इतिहास-प्रिय विद्वान् मित्रांसहि विचारलें, परंतु त्यांनीं मला ठरावीक एक दोन पुस्तकांकडे बोट दाखविण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. एकंदरीनें सर्व महाराष्ट्रास अत्यंत वंद्य व 'असान्निवृत्यै तदतीतमेव' ह्मणून अत्यंत प्रिय आणि संस्मरणीय असलेले श्रीशिवाजी महाराज यांच्या आरमाराची संपूर्ण माहिती एकत्र नसावी अगर ती उपलब्ध करण्याचा प्रयत्न होऊं नये ही गोष्ट इतिहास शोधक ह्मणवून घेणारांच्या केव्हां लक्षांत येईल तो सुदिन ! नाहीं ह्मणण्यास **रा. ब. पारसनीस** यांनीं आपल्या '**मराठ्यांच्या आरमारां**'त महाराजांच्या कारकीर्दीतील आरमाराची एका भागांत माहिती दिली आहे, परंतु ती अगदीं अल्प आणि त्रोटक अशी आहे.

महाराजांच्या आरमाराची स्थापना कोणत्या सालीं झाली व तें आरमार किती होतें, याचा निर्णय बरोबर होत नाहीं. कै. **ना. रानडे** यांच्या 'The rise of the maratha power' डॉ. **भांडारकर**कृत '**दक्षनचा प्राचीन इतिहास**,' ग्रंथ मालेंतून प्रसिद्ध झालेला '**महाराष्ट्राचा अभ्युदय**,' राजवाडेकृत '**ऐतिहासिक खंड**,' **पारसनीसांचें**

**'मराठ्यांचें आरमार,' सरदेसाई** यांनीं केलेली '**मराठ्यां रियासद, केळूसकर**कृत '**श्रीशिवाजी चरित्र**' '**विविधज्ञा विस्तार,' 'इतिहास संग्रह,' 'ऐतिहासिक पोवाडे**' इत्या विश्वासनीय इतिहास लेखकांच्या लिहिण्यावरून इ० स० १६६१ आ इ० स० १६६२ च्या सुमारास महाराजांच्या स्वतंत्र आरमाराची स्थाप झाली असें समजतें. मराठी बखरीमध्यें जंजिरा काबीज करण्याकरि व समुद्रामध्यें आपली सत्ता स्थापित करण्याकरितां शिवाजी महाराजां आरमार उभारिलें असें वर्णन आहे. परंतु त्या आरमाराची संख किती होती याचा स्पष्ट निर्णय होत नाहीं. **मल्हार रामराव चिटणी** यांनीं महाराजांच्या आरमारासंबंधीं लिहितांना असें लिहिलें आहेः-"**जंजिर पाण्यांत किल्ला, जेर न होय, असाध्य, तो आपणांस याव समुद्रांत सत्ता करावी ह्मणून बहुत चित्तांत हेतु धरून, आ मार करावें असा बेत करून, जहाजें नवीं तयार महाराजांन करविलीं. त्यांचीं नांवेंः-गुराब, तरांडी, गलबतें, दुबारे शिहाडें, पगार, मचवे, बाथोर, तिरकटी, पाल अशा जातींच चार पांचशें तयार करविलीं. त्यांस दहापांच लक्ष रुपये ख झाला.**" शिवाय **सभासदी** बखरीमध्यें "* * * **ये रीतीनें सात जहाजें पाण्यांतील झालीं. समुद्रामध्येंही एक लष्कर झालें. ह एक बेत साजिला**" असे उल्लेख आहेत.

असो. कादंबरीचें वाचन सर्वांना प्रिय आहे. तोच एखादा शास्त्री किंवा औद्योगिक अथवा असाच एखादा गहन विषयावरील ग्रंथ असल ह्मणजे तो वाचण्याकडे सर्वांचीच प्रवृत्ति होते असें नाहीं. एवढ्याकरितां अ विषय एकाद्या मनोरंजक कथानकांत गुंतवून वाचकवर्गापुढें ठेविल्यास क मणूक आणि विविध विषयज्ञान असे दोन फायदे होणार आहेत, याच मला माझ्या 'श्रीनिवासराव' कादंबरीवरून पूर्ण अनुभव आला आहे करितां, असे शास्त्रीय विषय, त्या त्या विषयांत प्रवीण असलेल्या लेखकां

कादंबरीची सांगड घालून लिहिल्यास त्याची मराठी वाङ्मयांत ' कादंबरी ' ह्या सद्‌रांत विशेष महत्वाची भर पडेल यांत शंका नाहीं. प्रस्तुतची कादंबरी मी ह्याच उद्देशानें, मिळाली तितकी महाराजांच्या आरमारासंबंधीं माहिती गोळा करून, कथानकास जुळेल तितकी घेऊन, लिहिली आहे. ह्या कादंबरीच्या वाचनानें मनाची करमणूक आणि छत्रपति श्रीशिवाजी महाराजांच्या आरमारासंबंधीं संक्षिप्त इतिहास माहिती वाचकांस होईल, अशी आशा आहे.

ह्या कादंबरीला ' **श्रीशिवाजी महाराजांचें आरमार** ' असें नांव देण्याचें कारण कादंबरींत सर्वत्र महाराजांच्या आरमाराचा उल्लेख असून कादंबरीच्या नायकानें त्या प्रौढ प्रतापी स्वामीच्या आरमाराचा शेवटपर्यंत अभिमान धरून आपली निस्सीम स्वामिभक्ति व्यक्त केली,त्याच्या स्मरणार्थ तसें नांव दिलें आहे. कथानकांतील प्रसंग सारखे जुळविण्याकरितां एक दोन ठिकाणीं आरमाराच्या इतिहासाची माहिती पुढें मागें केली आहे, त्याबद्दल क्षमाशील वाचक आणि इतिहास संशोधक क्षमा करतील अशी दृढ आशा आहे. ही आरमारावर कादंबरी लिहितांना वर उल्लेख केलेल्या पुस्तकांची मला फार मदत झाली, करितां त्या पुस्तककर्त्यांचा मी अत्यंत आभारी आहें. त्याचप्रमाणें हिंद एजन्सीचे मालक **श्रीयुत नारायणराव केतकर** यांनीं ही माझी कृति बहुजन समुहापुढें आणून आपल्या मित्रप्रेमांत भर घातली त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

कावसजी पटेल तलाव.<br>
नं. ४ मुंबई.<br>
१५ जुलै. १९१२

**नाथ माधव.**

# प्रकाशकाचे दोन शब्द.



आगाऊ जाहीर केल्याप्रमाणें आज वर्षप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर आमच्या विविध-विषय ग्रंथ-मालेचें हें तिसरें पुष्प " **श्री शिवाजीमहाराजांचें आरमार** " अथवा ' **सांवळ्या तांडेल** ' ही एक ऐतिहासिक सचित्र कादंबरी आह्मीं आपल्या प्रिय वाचकांच्या हातीं देत आहोंत. प्रस्तुत कादंबरीचे लेखक आमचे परमस्नेही प्रसिद्ध कादंबरीकार **श्रीयुत नाथ माधव** असून हे महाराष्ट्र वाचकांच्या पूर्ण परिचयाचे व प्रेमाचे आहेत. तेव्हां त्यांच्या कादंबरीविषयीं आह्मांस येथें दोन शब्द लिहिण्याची जरूरी आहे असें वाटत नाहीं. ही कादंबरी आमच्या वाचक बंधु भगिनी वर्गाला श्री शिवाजीमहाराजांच्या काळचें सुंदर बोधप्रद व मनोरंजक ऐतिहासिक चित्र दाखविल्याशिवाय राहणार नाहीं इतकेंच आह्मीं सांगितलें असतां पुरे होईल.

आमच्या मालेंतील चौथें पुष्प **नागपंचमीस** बाहेर पडेल.ही आमची माला चिरायु होण्यास, आमच्या वाचकवर्गाकडून या मालेस योग्य तो लोकाश्रय मिळण्याची सुबुद्धि तो जगच्चालक परमेश्वर आमच्या वाचकवर्गास देवो अशी अनन्यभावें प्रार्थना करून हे दोन शब्द पुरे करतों.

वर्षप्रतिपदा.
शके १८३६
मुंबई.

आपला नम्र,
**व्यवस्थापक—**
**हिंद एजन्सी विविध-विषय-ग्रंथमाला.**

# अनुक्रमणिका.





श्री छत्रपति शिवाजी महाराज.

The Lakshmi Art, Bombay.

# श्रीशिवाजी महाराजांचें आरमार

अथवा

# सांवळ्या तांडेल.

## उपोद्घात.




मुख्य तांडेल हंबीरराव यांनीं खूण करतांच गणोबानें आपल्या आरमारावरील मोठ्या तोफेला एकदम बत्ती दिली. तोफेनें ' ध—ड्—ड्—ड्—धा ' अशी गर्जना करतांच सर्वत्र नौबत झडूं लागली; तोफांचा धडधडाट सुरू झाला, ' श्रीशिवाजी महाराज की जय '—' माता श्रीभवानी की जय ' ह्या मंगल आरोळ्यांनीं सर्व दिशा दणाणून गेल्या ! त्या वेळचा देखावा अत्यंत अपूर्व होता. मातृभूमीच्या कल्याणासाठीं आपलें शिरकमल हातावर घेऊन शत्रूच्या रुधिरपानासाठीं सदैव

भुक्षित झालेलीं तेजदार हत्यारें घेतलेले असंख्यात मावळे वीरांनीं ालवणचा किनारा अगदीं गजबजून गेला होता. त्याचप्रमाणें समुंत शेंकडोशें लहान मोठें आरमार आपल्या प्रभूचा भगवा झेंडा ातावरणांत मोठ्या डौलानें फडकावित आनंदानें डुलत होतें.

अहाहा ! त्या आनंदाचें वर्णन कोठवर करावें !

आज क्षत्रियकुलावंतस श्रीशिवाजी महाराजांनीं मंगलमुहूर्तानें ापल्या आरमाराच्या बचावासाठीं स्वतःच्या देखरेखीखालीं बांधलेल्या सिंधुदुर्गांत प्रवेश केला.

---

१ सिंधुदुर्ग केव्हां व कोणी बांधला याविषयीं माहिती त्यावेळचे किल्ल्यावरील ाधिकारी चांदोजी घाटगे नामजाधव व नाइकवाडी यांनीं दादंभट उपाध्ये यांस ा० १६ रजब सूरसन इहिदे अशरीन मया व अलफ् ह्मणजे शके १६४२ या ाजीं लेख लिहून दिला त्यावरून घेतली आहे. त्यांतील मजकूर येणें प्रमाणें—

" × × × अदलशाही यांचीं ठाणीं तमाम प्रांत मजकुरीं होतीं. त समयीं हाराज स्वामीही दस्त प्रांतें मोहिम करावयानिमित्य अरमारच्या जमावानसी मौजे ाजकूर तेथें आले. त्याउपर दर्यामध्यें बेट मौजे मजकुरानजीक दृष्टीस पडलें. व्हां या बेटाचें नांव काय ह्मणोन पुसलें. त्यावरी कृष्णसावंत देसाई व भानजीभाई ेसाई प्रांत मजकूर याणें सांगितलें कीं, या बेटाचें नांव ' कुरंटे ' असें सांगितलें. यावरी राजश्री स्वामी बेटावरी येऊन जागा पाहिला तों स्थळ उत्तम विस्तीर्ण भाटोपसार देखिला. या उपर राजश्री स्वामीनी आज्ञा केली कीं या जागा बिलंद केल्ला बांधावयास हुकूम केला, आणि अरमारचे जमावानसी राजश्री स्वामीनी मुहूर्त करितेसमयीं पंडितराव व उपाध्ये जोतिषी होते. तथापि आज्ञा केली, पेस्तर संपूर्ण प्रांत हस्तगत करणें आहे व तें कृत्य होतच आहे; ऐशीयास गावींचा उपाध्या असावा. ह्मणोन आपणास व आपला मामा जानभट अभ्यंकर उपाध्ये मौजे मजकूर असे दोघांस धरून आणून ३० १४ जमादिलवल सन खम्मस्सीतैन व अल्लफ् मार्गशीर्ष बहुल द्वितीया शके १५८६ ते दिवशीं किल्ला बांधावयास मुहूर्त करून चिरा भूमीमध्यें बसविला, आणि ' सिंधुदुर्ग ' असें नांव ठेविलें. × × × '

समुद्रावर आपला अंमल बसवून सर्व व्यापाराची किल्ली आपल्या हातांत ठेवावयाची व आपल्या ताब्यांतील समुद्रकांठच्या मुलखास शत्रूकडून किंचितहि त्रास होऊं नये, या धोरणावर महाराजांनीं समुद्रांत जे अनेक जंजिरे बांधिले, त्यांतील सिंधुदुर्ग हा पहिला होय.

उत्तम मुहूर्तावर गणेशपूजन व सागरपूजन करून हा दुर्ग सतत तीन वर्षे तीन हजार उत्तम कारागीर बांधीत होते. हा दुर्ग पाण्यांत पक्का पायाशुद्ध उभारण्यास काय युक्त्या योजाव्या यासंबंधीं सर्व कल्पना महाराजांची स्वतःचीच होती. दुर्गाचें काम पुरें होण्याला एक कोट होन खर्च झाले. ह्या जंजिऱ्याचें नांव सिंधुदुर्ग ठेवून सुमुहूर्तावर महाराजांनीं आंत प्रवेश केला. त्यावेळीं सर्व लोकांस साखर वाटली, पांच हजार ब्राह्मणांना भोजन घातलें आणि लहानमोठ्या कामगारांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रें, मंदिल, सोन्याचीं कडीं, चौकडा तुरा, तरवार, इत्यादि अनेक बक्षिसें वांटिलीं.

---

१पुढें थोड्या दिवसांनीं ह्या जंजिऱ्यावर पाण्याचा मारा होऊं नये म्हणून महाराजांनीं पाण्यांत एक मोठा बुरुज बांधला. ह्या बुरुजाला ' दर्याबुरुज ' असें म्हणतात. ह्या बुरुजाची पहाणी करीत असतां एके ठिकाणीं महाराजांचीं पावलें उमटलीं त्यांवर देवालय बांधून त्यांत महाराजांची मूर्ति ठेविली आहे. देवालयांत नित्य पूजा होत असते. ही पूजा करणारांस हल्लीं कोल्हापूर सरकाराकडून नेमणूक आहे. हा सिंधुदुर्ग पूर्ण होतांच महाराजांनीं तेथें आपल्या आरमाराची जागा केली.

वरील उतारा केळुसकर कृत शिवाजी महाराजांचें चरित्र यांतील आहे. परंतु विविधज्ञानविस्तार सन १८७४ च्या फेब्रुवारीच्या अंकांत पुढें दिलेली माहिती आहे—

' किल्ल्याचे मध्यभागीं शिवाजी महाराजांचें देऊळ आहे हें देऊळ सन १८१२ त, पूर्वी कांहीं वर्षे किल्यावर बाजीपंत म्हणून कोल्हापूरकरांच्या तर्फेनें मामलेदार होता त्यानें बांधलें असें सांगतात. देऊळ फार मोठें आहे असें नाहीं. सुमारें ३६

एकंदरीनें त्या दिवशीं मालवणच्या किनाऱ्यावर जिकडे तिकडे आनंदी आनंद दृष्टिगोचर होत होता !

---

हात लांब आणि १६ हात रुंद होईल. पूर्वाभिमुख असून मध्यें चार हात अंतरावर दोन रांगांनीं, साहा हाताच्या अंतरानें, दोन हात औरस चौरस व सवादोन हात उंच खांब, आणि खांबापासून दोन हात अंतरावर दोन हात जाडीच्या दोन भिंती यांवर कमान वळली आहे. जमीनीपासून कमानीची उंची साडेसात हात आहे. देवळाच्या पश्चिमेस अहेर १२ हात औरस चौरस असून वर चौकोनी कळस बांधला आहे. जमिनीपासून कळसाची उंची १६ हात होईल. मुंगसाळीवर चांगला घुमट होण्यास आणखी एक एक चिरा लागेल; पण तें काम देऊळ बांधणारा कबूल राहून गेल्यामुळें वर शाकार करावा लागतो. देवळांत जाऊन पाहाणारांस त्यांत शिवाजीची मूर्तीच स्थापन केल्याचा भास होतो; पण वास्तविक तसा प्रकार नाहीं. एकाद्या मठांत जशा पादुका स्थापन करितात तशाच तऱ्हेच्या दगडाची स्थापना अहेरांत केलेली असून दररोज वर कपडे घालतात आणि वर सोन्याचा अगर रुप्याचा मुखवटा लावितात. हे मुखवटे चांगले उग्र शूर पुरुषास शोभण्यासारखे केलेले आहेत. समोर एक सडक ठेविलेली असते. ती महाराजांच्या हातची असें सांगतात. या देवळांत निरनिराळ्या उत्साहानिमित्त, इंग्लिशांच्या हातीं किल्ला गेल्यापासून दरसाल १५०० रुपयांची नेमणूक आहे. ही नेमणूक किल्ला स्वाधीन करते वेळीं उभय सरकारांमध्यें जे करार जहाले त्या करारांवरून इंग्लिश सरकार चालवितें. परंतु मध्यंतरी त्या नेमणूकीस इनाम कमिशनचा अवतार सेटूलमेन्ट खातेरूप ग्रहाची पीडा होऊन ती सुमारें सात वर्षें बंद पडली होती. सदर ग्रहाचा पुरस्कर्ता वतन संबंधी कायदा याचा अवतार जर त्या मुदतींत झाला असता, तर ती नेमणूक बुडालीच असती. पण तो अवतार होण्याच्या पूर्वीच नोकर लोकांनीं बंद असलेल्या नेमणुकीची हायकोर्टरूप होमांत आहुती देऊन ग्रहापासून पुढील नेमणुकीची मुक्तता करून घेतली. हल्लीं तीन वर्षे नेमणूक चालू आहे.

किल्ल्यावरील तोफा वगैरे सामान किल्ला, इंग्लिशांच्या स्वाधीन केला त्या वेळीं कोल्हापूरकरांचा अधिकारी घेऊन गेला असें मालवणांतील वृद्ध लोक सांगतात.'



सिंधुदुर्ग किल्ल्यांतील श्री शिवाजी महाराजांची प्रतिमा.

( उपोद्घात टीप पहा. )

*The Lakshmi Art, Bombay.*

# प्रकरण १ लें.

## पूर्वींची हकीकत.



उपोद्घातांत वर्णन केलेल्या सिंधुदुर्गांत महाराजांनीं प्रवेश करतांच आपल्या मुख्य तांडेलाच्या हुकुमावरून तोफेला पहिली बत्ती देणारा गणोबा तांडेल, हा आमच्या कथानायकाचा जनक होय. ह्या कामगिरीबद्दल त्याला एक मंदिल व सोन्याचें कडें बक्षिस मिळालें. महाराजांनीं सर्व कोंकणपट्टी काबीज करून त्या प्रांतांत उपद्रव करणाऱ्या बहुतेक पुंडांचा नायनाट केला. परंतु जंजिऱ्याच्या शिद्दीचा त्यांना वरचेवर फार उपद्रव होत असे. आरमाराच्या साहाय्यानें तो संधी साधेल तेव्हां महाराजांच्या ताब्यांतील किनाऱ्यावरच्या गांवांस वारंवार त्रास देई. ह्या शिद्याचा त्रास कमी करण्याकरितां महाराजांनीं दहा लक्ष रुपये खर्च करून जी

पांचशें जहाजें तयार करविलीं, त्यांपैकीं एका मोठ्या जहाजावर गणोजी जतपाळ हा दुय्यम प्रतीचा तांडेल होता.

गणोबा ज्या जहाजावर तांडेल होता त्या जहाजाचा मुख्य तांडेल—हंबीरराव नांवाचा सरदार होता. हंबीररावाचा स्वभाव फारच गरीब व मनमिळाऊ असे. परंतु जहाजावर असतांना त्याचा सर्व खलाशांवर फारच करडा अंमल असे. गणोबावर मात्र त्यांची फारच बहाल मर्जी ! त्या सरदाराच्या बायकोचें नांव कमलजा असें होतें. हिचा स्वभाव हंबीररावाच्या स्वभावाच्या अगदीं विरुद्ध होता. डामडौल आणि नटण्यामुरडण्याची हिला फार आवड असे. हिची सरू नावाची एक अत्यंत प्रीतींतील दासी होती. ही देखील आपल्या धनीणीप्रमाणें डामडौलाची शौकी होती. गणोबाचें कामकाजानिमित्त हंबीररावाकडे वरचेवर जाणें येणें होत असल्यामुळें तिची आणि त्याची चांगलीच ओळख होती. हळुहळू त्यांचा परिचय दृढ होत जाऊन, सिंधुदुर्गांत महाराजांनीं प्रवेश केला तेव्हां गणोबाला मिळालेलें सोन्याचें कडें आणि मंदिल ह्याकडे पाहून सरूच्या मनांत त्याच्या विषयीं निराळेच विचार येऊं लागले. पुढेंमागें तो आपल्या धन्या-

१ ह्याप्रमाणें महाराजांचें आरमार तयार होतांच तें समुद्रांत इकडे तिकडे फिरूं लागलें. आणि त्यानें मोगलाई, फिरंगी, वलंदेजी, फराशीस व इंग्रज तारवांवर हल्ले करून त्यांस लुटण्याचा सपाटा चालविला. त्यामुळें महाराजांचा आरमाराच्या अवाढव्य सर्व बाहेरच्या बाहेर भागूं लागला. हबशाला चांगलीच दहशत बसली. तो आपणास इतके दिवस ' समुद्राचा राजा ' ह्मणवी, परंतु आतां त्याला जबरदस्त रिपु निर्माण झाला. फिरंगी, इंग्रज वगैरे व्यापाऱ्यांस मोठी दहशत वाटून आपलीं जहाजें समुद्रांतून सुरक्षितपणें जावीं ह्यासाठीं ते महाराजांस वार्षिक खंड देऊं लागले.

प्रमाणें चांगला नांवारूपास चढून सरदार होईल असें वाटून ती त्याच्यावर प्रीति करूं लागली. लवकरच त्या दोघांचें सूत जमलें. त्यांच्या गुप्त भेटी होऊं लागल्या. परंतु ही गोष्ट कमलजाबाईच्या लक्षांत येण्यास फारसा उशीर लागला नाहीं. आपल्या आवडत्या दासीचें गणोबा खलाशावर प्रेम बसलेलें पाहून तिला अतिशय राग आला. कारण ती खलाशांचा मनापासून तिट्कारा करीत असे. गणोबाबरोबर सरूनें लग्न केल्यास तिला कसलेंच सुख मिळणार नाहीं असें तिला वाटे. आपला पति एवढा मोठा सरदार असूनहि जहाजावरील नोकरीमुळें आपणांस जें दुःख भोगावें लागत आहे, तसें दुःख आपल्या आवडत्या दासीनें अनुभवूं नये अशी तिची फार इच्छा होती.

'मोहिमीवर असतांना कोणीहि बायकोमनुष्य जवळ बाळगूं नये' असा महाराजांचा सक्त हुकूम असल्यामुळें हंबीरराव कधीं मोहिमी-वर गेले असतां दोन दोन चार चार महिने कमलजाबाईला एकटेंच घरीं रहावें लागे. ह्याच कारणामुळें तिला जहाजावरच्या नोकरीचा आणि खलशांचा तिट्कारा वाटत असे. सहा सहा महिने पतिपत्नीची ताटातुट करणारी ही जहाजावरील नोकरी सोडून लष्करांत कुठें तरी नोकरी धरावी म्हणून कमलजाबाईची आपल्या पतीजवळ सारखी कटकट सुरू असे. परंतु हंबीरराव त्याकडे लक्षच देत नसत. जहाजा-वरील काम त्यांस मनापासून आवडे.

एकदोन वेळां हंबीररावानें सरू आणि गणोबा यांना एकत्र गोष्टी करतांना पाहिलें होतें. परंतु त्याकडे त्यांनीं विशेष

लक्ष दिलें नाहीं. आपणांस त्यांनीं विचारावें व आपण त्यांस सर्व सांगून त्यांच्याकडून कमलजाबाईची आपल्या लग्नाला संमति मिळवावी अशी गणोबाची फार इच्छा होती. कमलजाबाईनें नाहीं ह्मटल्यावर आपलें सरूबरोबर लग्न होणार नाहीं आणि तिच्या मर्जी-विरुद्ध जर आपण लग्न केलें तर आपणांस व सरूला एकदम नोक-रीला मुकावें लागेल हें तो पूर्णपणें जाणून होता. अशी वस्तुस्थिति होती तरी स्वतः हंबीररावाजवळ गोष्ट काढण्यास त्याला धीर होईना. परंतु लवकरच तसा एक सुयोग जुळून आला. एके दिवशीं तो आणि सरू एकत्र बोलत असतां हंबीरराव तेथून जात होते. त्यावेळीं त्या प्रणयी जोडप्याकडे त्यांची दृष्टि जातांच ते तेथेंच उभे राहून ह्मणाले, " कायरे गणबा, काय विचार आहे ? आमच्या सरूला पळून नेणार आहेस वाटतं ! पण सांभाळ हो, तिची बाईसाहेब तुला ठिकाणावर राहूं द्यावयाची नाहीं हें लक्ष्यांत ठेव ! काय ह्मणतोस ? —तसाच आहे विचार होय. बरं तर ठीक आहे—तुझा तूं आपला विचार पहा ! "

असें ह्मणून त्यांनीं हांसत हांसत मानेला हिसका दिला. आपला धनी आज खुशींत आहे असें पाहून गोष्ट काढण्यास ही योग्य संधी आहे असें सरू वांकड्या मानेनें गणोबाला सुचवूं लागली. गणोबा खालीं मान घालून हळु हळू हंबीररावाच्या मागून जाऊं लागला.

" कारे गणबा, खरंच आहे कारे तुझा विचार ? " मागें वळून हंबीरराव ह्मणाले. तेव्हां गणोबानें आपलें मन उघड करण्यास सुर-वात केली.

" हं—एकूण आहे तर तुझा विचार ! ठीक आहे, दे तर उठवून बार ! पण सांभाळ हो, सरूचा स्वभाव तुला चांगला माहिती नाहीं. ह्मणून ह्मणतों, तिच्याबरोबर लग्न करून आपलं स्वातंत्र्य मात्र गमावशील आणि मागून पश्चात्तापांत पडशील.—काय ह्मणतोस?—नाहीं पश्चात्तापांत पडणार ! ठीक आहे तर, होऊन जाऊं दे ! "

गणोबाच्या आग्रहावरून हंबीररावांनीं त्यांच्या लग्नाला आपल्या पत्नीची संमती मिळविली. मग काय ? हां हां ह्मणतां हंबीररावाच्या ह्मणण्याप्रमाणें गणोबानें 'बार उडविला.' लग्नांत कमलजाबाई आपल्या लाडक्या दासीवर, तिनें खलाशाबरोबर लग्न केलें ह्मणून क्षणोक्षणीं रागावत होती, तरी आपल्या मनाप्रमाणें तिनें तिचें कोड पुरविलें. लग्न झाल्यावर दोन महिने त्या नूतन विवाहित जोडप्यानें सुखांत घालविले. सरू रूपानें चांगली देखणी असून त्यांत तिच्या डामडौली पोशाखाची विशेष भर पडे. गणोबा तिच्याबरोबर तासाचे तास बोलण्यांत घालवी. तितक्या अवधींत आपल्या बायकोचा स्वभाव कसा आहे हें त्याला कळूं लागलें. सरूचा स्वभाव हेकेखोर आणि त्यांत दुसऱ्याला चिडविण्याच्या कामांत तिचा हातखंडा आहे असें त्याच्या लक्षांत आलें. दोन महिन्यांत त्यानें जहाजावर पाऊल देखील ठेविलें नाहीं. परंतु असें किती दिवस चालणार ? लवकरच कोंकण प्रांन्ताची मोहीम सुरू झाली. त्यावेळीं त्याच्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति होऊन गेली. पुनः जहाजावर जाण्यास

---

१ ह्या मोहिमींत समुद्रकिनाऱ्याचीं रत्नागिरी; विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग साळशी, खारेपाटण वगैरे ठाणीं महाराजांनीं हस्तगत केलीं. इ० स० १६५२.

त्याच्या अगदीं जिवावर आलें. नोकरी सोडून द्यावी असेहि विचार त्याच्या मनांत येऊं लागले. परंतु नोकरी सोडून नवीन थाटलेला संसार चालावा कसा ? हा प्रश्न पुढें येतांच लग्न केल्यापासून आपण स्वतःवर किती मोठी जबाबदारी ओढून घेतली याची त्याला कल्पना होऊं लागली.

मोहिमीवर गेल्यानंतर गणोबाचें कोठल्याच कामाकडे लक्ष लागेना शेवटीं दोन महिने झाल्यावर हंबीररावांनीं त्याच्या मनाची झालेली चमत्कारिक स्थिति पाहून त्याला पंधरा दिवसांची रजा दिली. परंतु परवानगी देतांना 'पुढें मोहीम संपेपर्यंत बिलकूल रजा मिळणार नाहीं' असें त्याच्या जवळून कबूल करून घेतलें. त्याप्रमाणें पुनः एक वेळ पंधरा दिवस आपल्या बायकोच्या संगतींत घालवून गणोबा परत जहाजावर गेला. पुढें सहा महिने त्याला परत घरीं येतां आलें नाहीं. त्यामुळें सरूच्या स्वभावांत चलबिचल झाली. आपण खलाशाबरोबर लग्न करून फसलों असें तिला वाटूं लागलें. आणि त्यांत कमलजाबाई भर घालीत असे.

" पाहिलंस, एवढ्याच करितां मी ह्मणत होतें कीं, तूं खलाशाबरोबर लग्न करूं नको. पहा आतां ! मी ह्मणत होतें, त्याचा आतां आलाना अनुभव ? अग हे बोलून चालून खलाशी ! त्यांना बायकोची कुठें काळजी असते ? " असें ह्मणून सरूला चिडवून खलाशाविषयीं तिच्या मनांत द्वेष उत्पन्न करण्यांत कमजाबाई आनंद मानी.

सहा महिन्यांनीं मोहीम आटोपून हंबीररावाबरोबर गणोबा परत घरीं आला. तितक्यावेळांत कमलजाबाईनें सरूचें मन तयार करून

ठेविलें होतें. इतके महिने आपणास एकटें टाकून गेल्याबद्दल पहिल्याच दिवशीं त्या नूतन विवाहित जोडप्याचें कडाक्याचें भांडण झालें. आपण मोहिमीवरून सुरक्षित परत आलों त्याबद्दल आनंद मानावयाचा सोडून उलट बायकोचा हा मूर्खपणा पाहून गणोबाला फार वाईट वाटलें. परंतु त्या वेळीं सरूला सहा सात महिने गेले आहेत असें त्याला कळल्यावर तो पूर्ववत सर्व राग विसरून तिच्याबरोबर आनंदानें वागूं लागला. दोन महिने त्यांनीं पुनः सुखासमाधानानें घालविले. सरूचा राग मात्र अद्यापि शमला नव्हता. ती कांहीं तरी कारण शोधीत होती. पुढें एके दिवशीं एका क्षुल्लक कारणावरून त्याचें पुनः भांडण झालें. त्या रागानें सरू दोन दिवस मुद्दाम अन्नावांचून राहिली. आपणामुळें हंबीररावांस उगाच त्रास होतो असें पाहून तिसऱ्या दिवशीं मोठ्या जुलमानें त्यानें सरूला माहिमच्या खाडीजवळ आपल्या खिन्हाडीं नेलें. त्या दिवसापासून त्यांचीं रोज भांडणें होत. सरूला भांडण उकरून काढण्यास फारसें कारण लागत नसे. कारण दोघांनाहि आपआपल्या कुळाचा मोठा अभिमान असे. खलाशाबरोबर लग्न केलें ह्मणून आपल्या कुळाला बट्टा लागला असें सरूला वाटे आणि आपण हलकीं कामें करणाऱ्या एका दासीबरोबर लग्न केलें ह्मणून आपल्या कुळाला कलंक लागला असें गणोबाला वाटे. बायकोचा हेकेखोर स्वभाव पाहून गणोबाहि आपला हेका सोडीत नसे. 'मेल्या हलकट कुळाशीं संबंध करून खलाशीण मात्र झालें आणि आई-बापांचें नांव बुडविलें.' हें सरूचें वाक्य ऐकतांच त्यांचें भांडण जुंपत असे.

शेवटीं ह्या रोजच्या भांडणाला गणोबा अगदीं त्रासला. सुखा करितां लग्न केलें परंतु तें दुःखाला मात्र कारण झालें असें त्याल वाटूं लागलें. पूर्ण विचार केल्याशिवाय फक्त रंगरूपाला भुलू स्वतःच्या पायावर आपण होऊन धोंडा मारून घेतला या मूर्खपणाच त्याला पश्चात्ताप होऊं लागला. हंबीरराव म्हणालेल्या प्रत्येक शब्दाच त्याला आतां आठवण होऊं लागली. इतकेंच नव्हे तर आपल्य जुन्या धन्याला ह्या लग्नामुळें पुनः तोंड दाखविण्यास त्याला लज वाटूं लागली. अलीकडे तो सर्व दिवस अगदीं चिन्ताक्रान्त अ त्यावेळीं मोरो पिंगळे यांस पेशवाईचा अधिकार देऊन महाराजां त्याला फत्तेखान शिद्दीच्या पारिपत्यास पाठविलें आहे असें गणोबा

१ मोरो त्रिंबक पिंगळे मोठा हुशार पुरुष होता. ह्याचा बाप शहा राजांच्या नोकरीस असून राजे कर्नाटकांत गेले तेव्हां हा त्यांच्या बरोब तिकडे गेला होता. तेथें त्यास आपल्या बापाच्या आणि शहाजी राजांच हाताखालीं त्या धामधुमीच्या काळास योग्य असें शिक्षण व अनुभव हीं प्र झालीं होतीं. तो इ. स. १६५३ च्या सुमारास महाराष्ट्रांत परत येऊन मह राजांपाशीं नोकरीस राहिला. कृष्णानदीच्या उगमासन्निध बिकट व खडका जागेवर किल्ला बांधावा असें महाराजांच्या मनांत आलें. तें काम महाराजां पिंगळे यांस सांगितलें. ह्या किल्ल्याचें नांव प्रतापगड.

२ फत्तेखान सिद्दि हा जंजिऱ्यास राज्य करीत होता. तो आपल्या मुलुखा उपद्रव देऊं लागला म्हणून महाराजांनीं शामराजपंत पेशव्याबरोबर पुष्क लोक देऊन त्यास सिद्दीवर पाठविलें. त्यावेळीं फत्तेखानाची जय्यत तया होती. त्यांचे दंडाराजपुरीजवळ बरेच सामने झाले. परंतु त्यांत पेशव्या हार खावी लागली. तेव्हां त्यास मागें बोलावून त्याचा पेशवाईचा हुद्दा का महाराजांनीं तो मोरो त्रिंबक पिंगळे यांस दिला. हा पेशवाईचा अधिक मोरोपंताकडे आमरण राहिला.

कळलें. ही बातमी कळतांच त्याला आनंद झाला. बायकोचा रोजचा त्रास चुकविण्याकरितां पेशव्याला जाऊन मिळावें आणि महाराजांची नोकरी करावी असा त्यानें विचार केला. नंतर एक दोन दिवसांत योग्य संधी साधून तो बायकोच्या नकळत चालता झाला. नवरा गेल्याबद्दल सरूला कांहींच वाटलें नाहीं. ' जातो कुठें ? एक दोन दिवसांत आपण होऊनच परत येईल ' असें ती पहिले दोन चार दिवस ह्मणाली. परंतु आठ दहा दिवस झाले तरी गणोबाचा परत येण्याचा रंग दिसेना, तेव्हां तिला काळजी वाटूं लागली. जसे जसे जास्त दिवस होऊं लागले तसें तसें तिचें धाबें दणाणलें ! कारण एकतर घरांत डाळदाणा थोडा होता आणि त्यांत तिचे नऊमासहि पूर्ण भरत आले होते.

अशा हालांत आणि बापाच्या पश्चात् सांवळ्याचा—आमच्या चरित्रनायकाचा जन्म झाला !

असो. सरूच्या त्रासाला कंटाळून गणोबा घरांतून निघून गेला तो दोन वर्षे परत आलाच नाहीं. सरूनें नवऱ्याच्या शोधाकरितां पुष्कळ खटपट केली परंतु व्यर्थ ! आठ पंधरा दिवसांनीं माहिमच्या खाडींत एखादें तरी जहाज येत असे. तेथें जाऊन सरूनें गणोबाचा शोध करावा. आपल्या नवऱ्याच्या रंगरूपाचें वर्णन करून ती प्रत्येक जहाजावरील खलाशाकडे चौकशी करीत असे. कैक वेळां भलत्याच एखाद्या दुर्दैवी मनुष्याला गणोबा समजून ते खलाशी सरूला वाईट बातम्या सागत. कोणी ह्मणे, ' तो शिद्द्यांच्या लढाईत मारला गेला.'

कोणी ह्मणे, ' त्याचें जहाज खडकावर आपटून बुडालें, ' तर कोणी ह्मणे, ' हबश्यांनीं त्याला गुलाम करून दूर देशांत नेऊन विकलें. '

बिचाऱ्या सरूला दुसरें वर्ष फारच हालांत काढावें लागलें. हंबीररावाकडे नोकरी करून मिळविलेल्या पैशावर तिला सहज पांच वर्षे सुखांत घालवितां आलीं असती. परंतु कमळजाबाईच्या संगतींत ती विशेष खर्चिक व चैनी बनली असल्यामुळें एका वर्षांतच तिनें सर्व पैशांचा चक्काचूर केला. सांचविलेलें पाणी किती दिवस पुरणार ? लवकरच कोळी लोकांचीं जाळीं विणून तिला स्वतःचा आणि आपल्या मुलाचा चरितार्थ चालविण्याचा प्रसंग आला. कमळजाबाई-सारख्या श्रीमंत आणि चैनी सरदार स्त्रीजवळ नोकरी केलेल्या आमच्या सरुबाई स्वतःच्या चरितार्थाकरितां सर्व दिवस काबाडकष्ट करतां करतां कैक वेळां दुःखाश्रू गाळूं लागल्या ! आतां तिला पूर्वीच्या सुखाच्या दिवसांची आठवण होऊं लागली.

पुढें कांहीं दिवसांनीं महाराजांचें डोल काठीचें एक मोठें जहाज माहिमच्या खाडींत आलें. तें पाहण्याकरितां गांवांतील सर्व लोक खाडी-वर गेले, त्यांत सरूहि सांवळ्याला कडेवर घेऊन गेली. जहाजावरील खलाशी ' श्रीशिवाजी महाराजकी जय, ' ' स्वामी समर्थकी जय, ' ' माता भवानीकी जय ' असा जयघोष करीत खाडींत उतरले. हें आरमार कोठली तरी मोहीम करून स्वदेशीं आलें होतें. ह्या आरमारा-वरील प्रत्येक खलाशाचे कपडे उंची होते. त्यावरून त्यांची मोहीम यशस्वी झाली असावी किंवा वाटेंत त्यांना चांगली लूट मिळाली असावी असें स्पष्ट दिसत होतें. सरू जहाजावरून उतरणाऱ्या

प्रत्येक खलाशाकडे उत्सुकतेनें पहात होती. आपला नवरा ह्या जहाजावरून यावा असें तिला वाटूं लागलें. एका वर्षाच्या काबाडकष्टानें आणि दैन्यावस्थेनें सरूला जरी हालांत दिवस काढावे लागले तरी तिचा मानी स्वभाव अद्यापि पूर्णपणें पालटला नव्हता. ‘ प्रसंग हा मनुष्याला आपला दास बनवितो ’ हें अगदीं अक्षरशः खरें आहे. सरूचा स्वभाव बदलणें जरी शक्य नव्हतें तरी तिचा नटण्यामुरडण्याचा सोस बराच कमी झाला होता. असो, जहाजावरून उतरणाऱ्या खलाशांकडे पहात असतां ती एकाएकीं किंचित् दचकली ! गणोबा खरोखरच त्या जहाजावर होता. त्याच्या डोक्याला उंची पागोटें असून हातांत एक सोन्याचें सलकडें होतें. त्याचा तो सरदारी पोशाख पाहून तिला प्रथम वाटलेली भीति पार नाहींशी होऊन आनंद झाला. थोड्या वेळानें गणोबाची दृष्टि तिच्याकडे गेली. तिच्या कडेवर असलेल्या मुलाला पाहून त्यालाहि समाधान झालें. त्यानें क्षणभर सांवळ्याच्या गोंडस चेहऱ्याकडे पाहून त्याला आनंदाच्या भरांत आपल्या खांद्यावर घेतलें.

घरीं आल्यावर गणोबानें आपली सर्व कमाई सरूच्या स्वाधीन केली. त्यानें आणलेले शंभर कलदार रुपये पाहून तिला आपल्या नवऱ्याचा अभिमान वाटला. पहिले आठ दिवस तें जोडपें इतक्या एकोप्यानें आणि प्रेमानें वागलें कीं, खरोखरच जगांत जर एखादें सुखी आणि प्रेमी जोडपें असेल तर हेंच ! असें पाहणाराला वाटे. सरू आपल्या नवऱ्याची फारच उत्तम तऱ्हेनें बरदास्त ठेऊं लागली. परंतु हा आनंद कांहीं नवव्या दिवशीं टिकला नाहीं. एके दिवशीं गणोबा सोप्यांत बसला असतां सरू त्याला चिलीम भरून देत होती, तें तिच्या जुन्या

ओळखीच्या एका बाईनें पाहिलें व ती ह्मणाली, " ह्योग कोन् खलाशी !— आन् त्यू तर त्योला बटकीवानी चिलीम देतीस ! !—" झालें ! सरूची तब्येत बिघडली ! तिला पूर्वीच्या रोगानें एकदम पछाडलें ! तिनें हातांतील चिलीम दूर फेंकून दिली आणि गणोबाजवळ जाऊन शिव्याला सुरवात केली ! तिला कोणी ' खलाशाची बायको ' असें ह्मटलें कीं राग येत असे. तेथील आजुबाजूच्या मंडळीला तें माहित झालें होतें. ती निरुद्योगी मंडळी केव्हांतरी गमती खातर तिला चिडवीत असत. आतां आपला नवरा परत आला आहे तेव्हां ही मंडळी आपणांस चिडवून सळो कीं पळो करून सोडतील हें ती पूर्णपणें जाणून होती. ह्मणून गणोबानें खलाशाची नोकरी सोडून कोठें तरी लष्करांत नोकरी धरावी असें तिला वाटूं लागलें. तिनें त्याला पुष्कळप्रकारें सांगून पाहिलें, भांडणहि केलें परंतु त्याचा कांहीच उपयोग झाला नाहीं.

अलीकडे गणोबा यथेच्छ सुरा पिऊन सर्व दिवस निशेंत घालवूं लागला त्यामुळें, आणि आजुबाजूच्या मंडळीकडून सरूला दिवसें दिवस अधिक त्रास होऊं लागला. नवरा जवळ आहे तोंपर्यंत हा त्रास चुकत नाहीं, असें पाहून त्यानें जहाजावर जावें व जेवणापुरतें घरीं यावें असें ती त्याला सांगूं लागली. परंतु तिच्या बोलण्याकडे गणोबा लक्षच देईना. त्याच संधीला मोगलाई आरमारावर भरती व्हावयाची होती. ही बातमी तिला लागली. तिनें एके दिवशीं संधी साधून गणोबा निशेंत असतांना त्या आरमाराच्या मुख्य तांडेलाकडे जाऊन आपल्या नवऱ्याची शिफारस केली. आणि त्याला नोकरीवर ठेवल्यास आपणांस एका उत्तम दर्यावर्दी मनुष्याचा लाभ होईल

असेंहि त्याला सांगितलें. त्यावेळीं त्या तांडेलाला हुशार मनुष्यांची जरूरी असल्यामुळें त्यानें सरूला रुकार दिला व गणोबाचा एका महिन्याचा पगार तिच्या स्वाधीन करून आपल्या खलाशाकडून गणोबाला दारूच्या निशेंतच उचलून जहाजावर आणलें.

गणोबाची व्यवस्था लावल्यावर आपण मोठ्या त्रासांतून सुटलों असें सरूला वाटलें. तिला माहिमच्या खाडीचा मनापासून वीट आला होता. आपलें घर विकून सर्व चीज वस्तु घेऊन मुंबईस जावें असें तिच्या मनांत फार होतें, परंतु ती एका गोष्टीमुळें अडली होती. याहि खेपेस तिला कांहीं महिने लोटले होते. पुढें पूर्ण मास भरतांच ती प्रसूत होऊन तिला मुलगी झाली. तिचें तिनें कमलजा असें आपल्या पूर्वींच्या आवडत्या धनिणीचेंच नांव ठेविलें. मुलगी चार महिन्यांची होतांच तिनें आपलें घर विकून आपल्या दोन मुलांस बरोबर घेतलें आणि मुंबईचा रस्ता धरला. हंबीररावांकडे असतांना तिला मुंबईची चांगलीच माहिती झाली होती.

वाचकहो, आपल्या नायकाच्या आईबरोबर अडीचशें वर्षांपूर्वींच्या मुंबईत आपणांस जावयाचें आहे. सांप्रत आपण जें हें टोलेजंग आणि ऐश्वर्यसंपन्न शहर पाहतों त्याचें पूर्व स्वरूप कसें होतें, याची कल्पना केली असतां आपणांस अत्यंत आश्चर्य वाटेल. सात लहान लहान बेटें मिळून त्याला मुंबईबेट असें म्हणत असत. सात बेटांपैकीं एका बेटास कुलाबा असें नांव होतें. ह्या कुलाब्यांत महाराजांनीं एक रोगीवाडा बांधला होता. ह्या वाड्याजवळच सरूनें

एक ल्हानसें घर भाड्यानें घेऊन तेथें विशी[1] सुरू केली. कमळजाबाई जवळ असतांना ती नानातऱ्हेचीं पक्वान्नें आणि निरनिराळे फराळाचे पदार्थ करण्यास शिकली होती. त्याचा आतां तिला फार फायदा झाला. थोड्याच दिवसांत तिच्या जिन्नसांचा वाड्यांत फार खप होऊं लागला. ह्या वाड्यांत लष्करांतील किंवा आरमारावरील लढाईत पंगु, थोटे किंवा जखमी झालेल्या शिपायांस औषधोपचार करीत असत. ह्या वाड्याच्या मागें पुष्कळ अंतरावर इंग्रज व्यापाऱ्यांची एक मोठी वखार होती. आणि त्या वखारीच्या डाव्या बाजूला त्यांची बराक होती. हे इंग्रज लोक वाड्यांतील सर्व लोकांबरोबर फार मिळून मिसळून वागत असत. कारण महाराजांचा त्यांना फार वचक असे. आपण जर महाराजांबरोबर नीट रीतीनें वागलों नाहीं तर एक क्षणभरदेखील ते आपणांस येथें राहूं देणार नाहींत, अशी त्यांची पक्की खात्री होऊन चुकली होती.



१ हल्लीं ज्याप्रमाणें शहरोशहरीं आपणांस 'उपहारगृहें' दृष्टीस पडतात त्याप्रमाणें पूर्वी नव्हते. विशी—प्रवासी लोकांस उतरण्यास आणि त्यांच्या जेवणाची जेथें व्यवस्था होते असें घर.

# प्रकरण २ रें.

## बालपण.

तो वैशाखाचा महिना होता. बाहेर स्फटिकासारख्या शुभ्र चांदण्यांत दृग्गोचर होणारें अप्रतिम सृष्टि-सौंदर्य मनाला आल्हाद देत होतें. चोहोंकडे शांतीचें साम्राज्य प्रस्थापित झालें होतें. अशा त्या सुरम्य वेळीं सरू आपल्या लाडक्या कमलजेला मांडीवर घेऊन दरवाजांत बसली होती. कमलजाबाईजवळ नोकरीस असतांना ती पुष्कळ गाणीं शिकली होती, त्यांपैकीं राधा-विलासांतील एक चुटका ह्या वेळीं ती गात होती—

धरि कृष्णनाथ हनुवटी, बैस ये कटी, दीन ही राधा ॥
ही चरणिं नम्र हो साधा । कर करुणा । रक्ष मज शरणा ॥ १ ॥
बहु साहासि मीरे खरी, माझी वैखरी, आतां मज जाची ॥
ही मरणवेळ साची । बघ इकडे । तो करिल अंग–तुकडे ॥ २ ॥
अति रागिट तो मम पती, करिल आहुती, या गेहाची ॥
वाटत हि हांक काळाची । कापरे गळा । ही चरणिं नम्र अबला ॥ ३ ॥
बघ कृष्ण तुला तो धरिल, फार कीं छळिल, दुःख मज वाटे ॥
कां हंसुनि टोचसी कांटे । कर करुणा । रक्ष मज शरणा ॥ ४ ॥
यदुराय पाहिं मजकडे, लोटुनी कडे–वरुनि देईं ॥
ही गाय लोळते पाईं । कर करुणा । रक्ष मज शरणा ॥ ५ ॥
परिणामीं न देती दृष्टी, होति त्या कष्टी, मजपरि रे ॥
ही शरण मरण हरिरे । कर करुणा । रक्ष मज शरणा ॥ ६ ॥

---

१ चाल०—वद जाऊं कुणाला शरण.

अशि ऐकुनियां विनवणी, कृष्ण तो गुणी, होइ सान ॥
जो भक्तदुःखनिधन । कर करुणा । रक्ष मज शरणा ॥ ७ ॥

* * * *

* * * *

" आई, दादा आला, दादा आला. " सांवळ्याला येतांना पाहून कमलजा आईच्या मांडीवरून उठून त्याच्याकडे बोट दाखवीत म्हणाली.

सांवळ्या जवळ येतांच " आतां उजाडलं वाटतं तुला यायला घरीं ! " त्याचा चटकन् हात धरून सरू म्हणाली, " मेल्या, तुला घरची कांहीं काळजी तरी ? बाप तसा तूं ! " असें ह्मणून तिनें सांवळ्याच्या चिमुकल्या गालावर चापट लगाविली.

" आई–ए, नको ग मारू दादाला– "

" कमलजे, दूर हो—आज ह्या मेल्याची चांगलीच खबर घेतें. बोल—कुठें गेला होतास तूं इतका वेळ ? "

" ब–ब–ब–रा–कींत साहेबांचा नाच होता, तो–तो–पहात–"

" साहेबांचा नाच होता काय ? थांब आतां मेल्या तुलाच नाचवितें ! " असें ह्मणून ती सांवळ्याला मारूं लागली.

माहिमची खाडी सोडून सरूला जवळ जवळ पांच वर्षे झालीं. अद्यापि गणोबाचा तिला कांहींच पत्ता लागला नाहीं. तिनें घातलेली विशी—त्याला आतां आपण फराळाचें दुकान असेंच ह्मणूं—फार चांगल्या तऱ्हेनें चाललें होतें. तिच्या दुकानावर वाड्यांतील लोकांची सकाळपासून रात्रीपर्यंत सारखी गर्दी असे. वाड्यांतील रोग्यांना तेथें ठराविक अन्न मिळत असल्यामुळें सरूच्या दुकानांतील निरनिराळ्या

जिनसाचा त्यांच्याकडे चांगला खप होत असे. सरूनें दुकान घाल-ताच एका वर्षांतच तें चांगलें भरभराटीस आलें. तिचें कमलजेवर अतिशय प्रेम होतें तरी ती तिचें फार लाड करी. कमलजेच्या अंगा-वर नेहमीं चांगले कपडे असत. परंतु सांवळ्याचे कपडे तिच्या अगदीं विरुद्ध ! धुळीनें माखलेली आणि मागें पुढें फाटलेली अशी बंडी व एक लंगोटी हेंच त्याचे नेहमींचे कपडे होत. कमलजेचा जन्म झाल्यापासून सरू सांवळ्याचा अगदीं तिट्कारा करूं लागली. कदाचित् सांवळ्या मोठा झाल्यावर तो आपल्या बापाप्रमाणें खलाशी होणार ह्मणून ती त्याचा तिट्कारा करी किंवा काय नकळे ! बिचाऱ्या पोराला कधीं कधीं एखाद्या क्षुल्लक कारणावरून शक्तिबाहेर मार खावा लागे, तर कधीं अन्नाशिवाय उपाशीं निजावें लागे. आजचाहि दिवस त्यापैकींच एक होता.

" जा आतां घरांत आणि ती घोंगडी घेऊन नीज मुकाट्यानें ! " बराच वेळ मारल्यावर त्याला हातानें जोरानें घरांत ढकलून सरू ह्मणाली.

सांवळ्या हुंदके देत देत आंत गेला आणि घोंगडीवर पडला. त्याला आईचा इतका धाक होता तरी कधीं कधीं तो एकटाच समुद्रकिनाऱ्यावर रेतींत जाऊन बसे. तेथें एकटाच बसून पाण्यावर जहाज कसें तरतें याचा तो तासन् तास विचार करी. केव्हां केव्हां रात्रींहि समुद्रकिनाऱ्यावर जाऊन आकाशाकडे ताऱ्यांची मजा पहात बसून राही. तारे पडत असतांना पाहून त्याला इतका आनंद होई कीं, घरीं जाण्यास रात्र होईल व आईचा मार मिळेल याचें

त्याला भानहि राहत नसे. कमलजेवरूनहि त्याला कधीं कधीं मार खावा लागे. बरोबरीच्या इतर मुलांबरोबर खेळतांना दुसरीं मुलें कमलजेला ' पोरी ' ह्मणून हांक मारीत. त्यांच्याबरोबर खेळण्याच्या नादांत तो देखील तिला ' पोरी ' ह्मणून हांक मारी. परंतु तें आईनें ऐकलें कीं, तिनें सांवळ्याला बडवावें ! कमलजेला वाईट नांवानें हांक मारलेली सरूला बिलकूल खपत नसे, इतकें तिच्यावर आईचें प्रेम होतें. बाकी ती दोन लहान भावंडें प्रेमाला योग्य अशींच होतीं. परंतु सरूच्या मातृप्रेमांत असा पक्षपात कां व्हावा हें तिचें तिलाच ठाऊक !

सांवळ्या घरांत गेल्यावर सरूनें कमलजेला पुनः मांडीवर घेतलें आणि तिच्या गालावरून हात फिरवून विचारलें, " कमलजे, त्या मेल्या कार्ट्याला ' दादा ' ह्मणून हांक मारायला तुला कोणीग सांगितलं ? "

" तुकोजी बाबानं. " कमलजेनें चटकन् उत्तर दिलें.

तुकोजीचें नांव ऐकतांच सरू गप्प राहिली. तिच्या दुकानावर वाड्यांतील पुष्कळ मंडळी येत होती हें वर सांगितलेंच आहे. त्यांत तुकोजी कडू नांवाचा एक ह्मातारा खलाशी होता. तो फार अनुभवी असून अतिशय बोलका होता. त्याच्याचमुळें वाड्यांतील सर्व रोम्यांच्या पेजपाण्याचें काम सरूला मिळालें होतें. सर्व कुलाव्यांत ती एकट्या तुकोबालाच वचकून असे. त्यानें आरमारावर बऱ्याच लढाया मारल्या होत्या. त्याच्या कपाळावर शस्त्रांचे पुष्कळ व्रण पडले होते. वाडीच्या सांवताबरोबर एकदां चकमक झाली

त्या वेळीं तुकोबाला मोठी जखम झाली. तेव्हांपासून तो वाड्यांतच राहूं लागला. त्याचें वृद्धपण झालेलें पाहून महाराजांनीं त्याला पुनः जहाजावरचें काम न देतां वाड्याच्या देखरेखीचें काम दिलें. आमच्या कथानायकाला पुढें प्रसिद्धीस येण्याला ह्याच पुरुषाचें शिक्षण होय. कधीं कधीं तो बोलण्याच्या भरांत आला ह्मणजे महाराजांविषयीं फार चमत्कारिक शौर्याच्या गोष्टी सांवळ्याला सांगे. त्यामुळें लहानपणापासूनच सांवळ्याच्या मनांत महाराजांविषयीं फारच पूज्य बुद्धि वास करूं लागली. सांवळ्या तुकोबाच्या गोष्टी अगदीं मन लावून ऐकत असे.

तुकोबा एखादी गोष्ट सांगूं लागला कीं, त्याला मोठें स्फुरण चढत असे. "काय सांगूं रे सांवळ्या—" असें ह्मणून तो आपल्या प्रत्येक भाषणाला सुरवात करीत असे.

"काय सांगूं रे सांवळ्या," एके दिवशीं नादांत येऊन तुकोबा सांगूं लागला, "त्यावेळीं महाराजांना मोठा आनंद झाला. कल्याणप्रांतीं महाराज स्वारीला आले होते. तेथें विजय मिळवून परत जात असतां मोलाणाची देखणी सून महाराजांच्या नाटकशाळेकरितां पकडून आणिली. परंतु अहारे आमचा प्रभू ! देव माणुसच तो ! तिला त्यानें मातेची

१ आबाजी सोनदेव यानें त्या लढाईत मौलाणा हयातीस याची सून गर्दीत पकडून ठेविली होती. पुढें महाराज कल्याणास आल्यावर त्यांच्यापाशीं आबाजीनें अर्ज केला कीं, ह्या लढाईत एक अति लावण्यसंपन्न तरुण स्त्री सांपडली आहे. हें ऐकून तिला सभेंत आणण्याचा महाराजांनीं हुकूम केला. तेव्हां तिला चांगली नटवून सजवून आबाजीपंतानें सभेंत आणिलें. तिला पाहून महाराज हांसले आणि ह्मणाले, 'ह्या बाईच्या लावण्यासारखें आमच्या

उपमा दिली ! " एका दमांत सांगितल्यावर मागून तीच हकीकत तो विशेष खुलवून सविस्तर रीतीनें समजावून सांगत असे. तुकोबाची स्मरणशक्ति मोठी दांडगी होती. कोठल्याहि एका स्वारीची तो हकीकत सांगूं लागला कीं, त्या स्वारींत महाराजांवर आलेले सर्व लहान मोठे प्रसंग तो सांगत असे. वरील हकीकत सांगून झाल्यावर महाराजांच्या त्याच मोहिमेंत घडलेल्या दुसऱ्या प्रसंगाची तो माहिती सांगत असे.

" काय सांगूं रे सांवळ्या, त्यावेळीं महाराजांना मोठा लाभ झाला. सुनेची हकिकत तुला सांगितली, त्याच स्वारींत महाराजांना यशस्वी भवानी तरवारीचा लाभ झाला—"

असो. सांवळ्याप्रमाणें तो कमलजेला सुद्धां देवादिकांच्या लहान लहान गोष्टी सांगून तिचें मन रिझवी. तसेंच वडील माणसांबरोबर कसें वागावें याचाहि तो तिला उपदेश करीत असे. सांवळ्या हा वडील भाऊ आहे तेव्हां त्याला ' दादा ' हांक मारून त्याच्यावर प्रेम करावें हें तुकोबानेंच तिला आदल्या दिवशीं सांगितलें होतें.

मातुश्रीचें लावण्य असतें तर आमचेंहि रूप हिच्यासारखें झालें असतें. ' नंतर आबाजी सोनदेवास उद्देशून ते पुढें ह्मणाले, " ज्यास यश पाहिजे त्यानें परस्त्रीचा अभिलाष कदापि करूं नये. राजानें उच्छिष्ट स्त्रीचा अंगिकार करूं नये. परस्त्रीचा अभिलाष केल्यानें रावणासारखे बलाढ्य पुरुष नाश पावले, मग आमच्यासारख्याची कथा काय ? राजास सर्व प्रजा आपल्या अपत्या समान आहे. ' नंतर महाराजांनीं तिला वस्त्रालंकार देऊन मोठ्या इतमामानें विजापुरास सासरीं पाठविलें.

१ ही धोप तलवार गोवलकर सावंतांच्या घरीं होती. ही तरवार त्यांजकडून आपण घ्यावी असें जवळच्या लोकांनीं महाराजांस सुचविलें. त्यांस

दुसऱ्या दिवशीं सकाळीं भाताची पेज घेऊन वाड्यांत रोम्या-करितां घेऊन जाण्यास सरूनें सांवळ्याला सांगितलें. सांवळ्यानें घरांतून पेजेचें भांडें बाहेर आणिलें. परंतु भांड्यांत त्याचीं बोटें गेलीं होतीं. तें पाहून रागाच्या भरांत सरूनें हातांतील पळी त्याच्या हातावर मारिली आणि रागानें त्याच्या हातांतून भांडें घेऊन तें तसेंच बाहेर फेंकून देऊन ती ह्मणाली, " मेल्या घाणेरड्या, घातलास ना हात भांड्यांत ! अशी घाणेरडी वस्तु नेणार का तूं वाड्यांत ! जरासं काम देखील होत नाहीं तुझ्याकडून. मेल्या मरतास तरी सुटतें ! " असें ह्मणून ती रागारागानें दुसरी पेज तयार करण्यास घरांत निघून गेली. सरूला अस्वच्छता बिलकूल खपत नसे. ती आंत गेल्यावर सांवळ्या तेथेंच रडत बसला. जवळच त्याची

महाराज ह्मणाले कीं, " खऱ्या मर्द पुरुषानें कोणा संभावित मनुष्यापाशीं एखादी वस्तु असली तर तिचा अभिलाष धरूं नये. स्यमंतमण्याची गोष्ट पुराणांतरीं आहे ती तुमच्या लक्ष्यांत असेलच ! त्यामुळें उपस्थित झालेलें वैर भगवंतासच निभावतां आलें. आपण मानवांनीं असल्या क्षुल्लक वस्तूसाठीं नसतें वैर माजवूं नये." हा महाराजांचा निस्पृहपणा पाहून लोक गप्प राहिले. इकडे सावंतांच्या कारभाऱ्यांनीं त्यांस सल्ला दिली कीं धोप तरवार शिवाजी महाराजांसारख्या प्रतापी पुरुषास नजर करून त्यांचें मित्रत्व संपादावें. ही मसलत सावंतांस रुचून त्यांनीं तरवार महाराजांस नजर केली. तीबद्दल महाराजांनीं त्यांस तीनशें होन व पोशाख देऊन नोकरीस ठेविलें. ह्या तरवारीचें 'भवानी' असें महाराजांनीं नांव ठेविलें. ती हातीं आल्यापासून महाराजांस प्रत्येक मोहिमेंत यश येत गेलें म्हणून ते तिची नित्य पूजा करीत. नवरात्रांत घटाजवळ ठेऊन तिची पूजाअर्चा करून दसऱ्याच्या दिवशीं ती पुनः हातीं धरून नव्या मोहिमेस निघावें असा त्यांचा क्रम असे.

बहीण कमलजा आपल्या बोबड्या बोलानें त्याची समजूत करीत होती. हा सर्व प्रकार दरवाजाच्या आड उभा राहून एक मनुष्य पहात होता. थोडा वेळ त्या दोघां बहिणभावंडांकडे कौतुकानें पाहून तो पुढें झाला आणि सांवळ्याला ह्मणाला, " मुला, तुझें नांव काय ! "

आपल्या फाटक्या बंडीनें डोळे पुसून त्यानें ' सांवळ्या ' असें उत्तर दिलें.

" आणि ही लहान मुलगी कोण ? "

" माझी बहीण—कमलजा. पण तूं कोण ? आमच्या दुकानावरचें तुला कांहीं पाहिजे काय ? " तो एक गिऱ्हाईक आहे असें समजून सांवळ्यानें विचारलें, " आईला बोलावूं ? "

" नको. " असें ह्मणून त्यानें कमलजेला वर उचललें. त्यानें क्षणभर तिच्या गोंडस चेहऱ्याकडे पाहून तिच्या गालाचें चुंबन घेतलें आणि सांवळ्याच्या तोंडावरून हात फिरविला. बराच वेळ तो मनुष्य आपणाकडे पहात आहे असें पाहून सांवळ्या गोंधळून ह्मणाला, " तुला चिलीम पाहिजे ?—नको. फराळ पाहिजे ?—नको. दारू आणूं ?—होय.—पैसे दे कीं आत्तां आणतों. "

सरूच्या दुकानावर येणाऱ्या गिऱ्हाईकांस सांवळ्या बराकींतून दारू आणून देत असे. बराकींतून दारू नेली म्हणजे बराकींतील गोरा गुत्तेवाला सांवळ्याला प्रत्येक वेळीं एक शिवराई देत असे. याप्रमाणें प्रत्येक दिवशीं दारू आणून देण्यांत सांवळ्याला दोन चार शिवराई मिळत असत.

" बरें तर जा आण." असें ह्मणून त्यानें एक कल्दार रुपया सांवळ्याच्या स्वाधीन केला. सांवळ्यानें धांवत जाऊन आठ आण्याची दारू आणिली. त्या मनुष्यानें सांवळ्याजवळून त्यानें आणलेली दारूची बाटली घेतली आणि बाकीचे पैसे त्याला खाऊकरितां ठेवण्यास सांगितलें. थोडेसें काम केल्याबद्दल कधीं न मिळाले इतके पैसे खाऊकरितां ह्मणून त्याला मिळाले तें पाहून सांवळ्याला अत्यंत आनंद झाला. आणि त्या मनुष्याविषयीं त्याच्या मनांत साहजिक प्रेम उत्पन्न झालें. हा कोणीतरी भला मनुष्य आहे असें त्याला वाटलें. कमलजा अद्यापि त्याच्या मांडीवर आनंदानें खेळत बसली होती. मधून मधून ती त्याची लांब वाढलेली दाढी धरून स्वतःशीं हांसे. तो दारू पीत असतां सांवळ्या त्याच्या जवळच उभा होता. दारू पिऊन झाल्यावर त्यानें चिलीम पेटविली आणि सांवळ्याला विचारलें, " कायरे सांवळ्या, तुझी आई तुला अशी नेहमीं मारते काय ? "

" होय, जेव्हां मी कांहीं चुकी करतों तेव्हां मला मारते. "

" अस्सं चुकी करतोस तेव्हांच फक्त मारते हं ! "

" होय. " क्षणभर थांबून सांवळ्या पुढें ह्मणाला, " पण ती म्हणते, मी नेहमीं चुका करतों आणि मला वाटतं माझ्या हातून चुका होतात—"

" अस्सं—अस्सं ! एकूण तुझ्या हातून चुका होतात त्या तुला कळतात तर ! मग त्या सुधारत कां नाहींस ? " सांवळ्याच्या पाठीवर हात फिरवीत तो ह्मणाला. नंतर कमलजेच्या तोंडावरून हात फिरवून त्यानें विचारलें, "आणि तुलाहि मारते काग तुझी आई ?"

" नाहीं, नाहीं. " सांवळ्या मध्येंच ह्मणाला, " आई तिल कधीं कध्धींहि मारीत नाहीं, उलट तिचे लाड करते आणि—आणि माझे नाहीं करीत. "

त्या मनुष्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. समोरून तुकोबा येत होता त्याकडे त्याचें लक्ष होतें. तुकोबा जवळ आल्यावर त्यानें 'रामराम दादा ' असें ह्मणून सांवळयाला चिलीम आणण्याची खूण केली.

" रामराम दादा, ही घ्या चिलीम. " त्या मनुष्यानें आपल्या हातातील चिलीम तुकोबाकडे केली. एकावर एक झुरके मारीत तुकोबा तेथेंच बसला. नंतर चिलीम परत करून त्या दोन भावंडांकडे पहात तो ह्मणाला, " काय सांगू तुह्माला दादा, हीं दोघं पोरं अशीं गोड आहेत—"

कमलजेच्या गालावरून हात फिरवीत तो मनुष्य ह्मणाला, " आहेत खरीं गोड. पण तिची आई कशी आहे ? "

" काय सांगू तुह्माला दादा, ती आहे थोडी चमत्कारिक स्वभावाची ! मी आज पांच वर्षं पहात आहे पण टापटीप डामडौल फार ! "

तुकोबा काय सांगतो तें लक्ष्यपूर्वक ऐकून क्षणभरानें तो मनुष्य ह्मणाला, " याचं कारण काय बरें असावं असं तुह्माला वाटतें ? "

" काय सांगूं तुह्मांला दादा !—छे बुवा, आपणाला नाहीं कांहीं सांगतां येत. " मान हालवीत तुकोबा ह्मणाला.

" त्याचें कारण पूर्वी ती एका सरदाराकडे दासीचें काम करीत होती—"

" तरीच ! " तुकोबा मान हालवीत ह्मणाला, " आतां आलं

बरं लक्षांत ! हा सर्व सरदारी डामडौल आहे. पण इतकं मात्र ठीक आहे कीं, तिचं वर्तन फार शुद्ध आहे. त्यामुळें तिचा तो चमत्कारिक स्वभाव, तो डामडौल—झालं, ती टापटीप हें सारं तिच्या त्या शुद्ध वर्तनाखालीं झांकलं जातं. "

" असं असेल तर फार चांगलं—मला त्यांत आनंद आहे. कारण असं पहा दादा, एक तर लहान वय, त्यांत नवरा नाहीं जवळ, शिवाय नटण्यामुरडण्याची हौस, तेव्हां अशा बायकोचें पाऊल वाकडें पडण्याचा पुष्कळ संभव. "

" असं तर खरंच ! पण फार काय सांगूं तुह्माला दादा, तिच्याकडे वर मान करून कोणी पाहायाचं नाहीं असा तिनें इथें दरारा बसविला आहे. "

इतक्यांत " सांवळ्या, सांवळ्या " अशा हांका मारीत सरू बाहेर आली. तेथें बसलेल्या मंडळीकडे तिची दृष्टि जातांच " हॅं हे—हे—कोण ? " असे भयाभीत उद्गार काढून ती पट्कन आंत झाली आणि झपाट्यानें तिनें धाड्कन दरवाजा बंद केला. तें पाहून तो मनुष्य मिशावरून हात फिरवीत " हे कोण ! अद्यापि ओळख नाहीं पटली काय ? थांब—थोडा वेळ थांब ह्मणजे आठवण राहील अशीच ओळख पटवितों " असें ह्मणून तो मनुष्य उठला.

" काय दादा, सांवळ्याच्या आईला तुह्मीं ओळखतां काय ? "

" ओळखतां ह्मणजे ! ती माझी बायको. "

वाचकहो, तो गणोबाच होता. त्याचें उत्तर ऐकून तुकोजी उठला आणि ह्मणाला, " खरं कीं काय ! मग तर ही फार दिवसांनीं

नवराबायकोची भेट होते आहे ह्मणायची ! बसा तर राव आ
गोष्टी बोलत. आह्मी येऊं मग, राम राम. ”

तो निघून गेल्यावर गणोबानें कमलजेला बाजूला करून दरव
ज्याला धक्का दिला. थोडा वेळ थांबून दरवाजा उघडत नाहीं अ
पाहून रागानें त्यानें ‘ दरवाजा उघड ’ असें ह्मणून पुनः जोरा
धक्का दिला. तेव्हां सरूला काय वाटलें असेल तें असो, तिनें हळू
दरवाजा उघडला. आंत गेल्यावर क्षणभर थांबून गणोबानें स
घरभर एकदां दृष्टि फिरविली. घरांतील स्वच्छता आणि टापटीप पाहू
जरी त्याला आनंद झाला तरी त्याचा सरूवरील राग मात्र कमी झाल
नाहीं. बराच वेळ कोणी बोललें नाहीं. गणोबा दरवाज्याजवळच्या
बांकावर बसल्यावर सरूनें बायकांचें आवडतें हत्यार पुढें केलें. त
हळु हळू हुंदके देत देत ह्मणाली, “ आज पांच वर्षांवर दिव
होऊन गेले, एकवेळ तरी हीं दोघं सोन्यासारखीं पोरं मेलीं व
जिवंत आहेत याचा शोध करावयाचा होता ! मी—मी—किती दुःखांत
किती हालांत दिवस का—काढले तें त्या पर—परमेश्वराला ठाऊक—
असें ह्मणून तिनें डोळ्याला पदर लाविला आणि जास्त जोरा
हुंदके देण्यास सुरवात केली. परंतु मधून मधून ती चोरदृष्टी
आपल्या पतीकडे पहात होती. गणोबानें तिचें सर्व भाषण शांतप
ऐकून घेतलें. नंतर तो ह्मणाला, “ ह्या सर्व कृत्याला कारण तूं. ”

“मी !” सरूनें डोळ्यावरचा पदर बाजूला करून एकदम विचार

“ होय तूं. चांडाळणी तूंच बरं !”

“ मी ! मी कशी ? ”

" कशी ? थांब सांगतों. पहिल्यानें मी कोण त्याची चांगली ओळख पटवून मग सर्व सांगतों." असें ह्मणून गणोबानें खिशांतून दोन हात लांब तागाचा जाड वळलेला दोर काढला. आणि मारण्याकरितां वर उगारला. आतां आपली शंभर वर्षे भरलीं हें तिला कळून चुकलें. तिनें पळण्याची बरीच धडपड केली परंतु गणोबा दरवाजांतच उभा होता त्यामुळें बिचारी अडली !

" पळतेस कुठें ? मी कोण आहें हें कळलं पाहिजेना ?" दहापांच तडाखे देऊन गणोबा म्हणाला, " पटली ना आतां खूण ? कीं नाहीं ?" पुनः त्यानें तडाखे देण्यास सुरवात केली. "बस्स ! पोटभर झालं आतां. इतकं बक्षीस सरदाराच्या दासीला बस्स आहे. मजजवळून सुटून जाण्याकरितां मला फसवून लांड्यांत नेऊन टाकलेंस काय ? तुझा नवरा खलाशी आहे त्याची तुला लाज वाटते ना ? × × नें माझ्या संसाराची—माझ्या सुखाची माती केली. एखाद्या खलाशाच्याच पोरीबरोबर लग्न करतो तर माझा संसार सुखाचा झाला असतां, पण × × नें मला मोहिनी घातली ! नशीब समज कीं, मघां त्या म्हाताऱ्यानें तुझें वर्तन चांगलें आहे म्हणून सांगितलें, नाहीं तर आतां भलताच प्रसंग येतां."

सरूनें एक चकार शब्दहि मुखावाटें काढला नाहीं. तिनें मुकाट्यानें आपल्या नवऱ्याचा मार सहन केला. गणोबानें आपलें भाषण आटोपून दोर पुनः वळला आणि खिशांत टाकला. कमलजा भयाभीत होऊन आपल्या आईला चिकटून राहिली. परंतु सांवळ्याला मात्र भीति न वाटतां, आजपर्यंत आपणाला जी यथेच्छ मारीत होती तिलाहि मारणारा जगांत एकजण आहे हें पाहून आनंद झाला !

नवराबायकोची भेट होते आहे ह्मणायची ! बसा तर राव आत गोष्टी बोलत. आह्मी येऊं मग, राम राम. "

तो निघून गेल्यावर गणोबानें कमलजेला बाजूला करून दरवाज्याला धक्का दिला. थोडा वेळ थांबून दरवाजा उघडत नाहीं असें पाहून रागानें त्यानें ' दरवाजा उघड ' असें ह्मणून पुनः जोरानें धक्का दिला. तेव्हां सरूला काय वाटलें असेल तें असो, तिनें हळूंच दरवाजा उघडला. आंत गेल्यावर क्षणभर थांबून गणोबानें सर्व घरभर एकदां दृष्टि फिरविली. घरांतील स्वच्छता आणि टापटीप पाहून जरी त्याला आनंद झाला तरी त्याचा सरूवरील राग मात्र कमी झाला नाहीं. बराच वेळ कोणी बोललें नाहीं. गणोबा दरवाज्याजवळच्या बांकावर बसल्यावर सरूनें बायकांचें आवडतें हत्यार पुढें केलें. ती हळु हळू हुंदके देत देत ह्मणाली, " आज पांच वर्षांवर दिवस होऊन गेले, एकवेळ तरी हीं दोघं सोन्यासारखीं पोरं मेलीं कीं जिवंत आहेत याचा शोध करावयाचा होता ! मी—मी—किती दुःखांत-किती हालांत दिवस का—काढले तें त्या पर—परमेश्वराला ठाऊक—" असें ह्मणून तिनें डोळ्याला पदर लाविला आणि जास्त जोरानें हुंदके देण्यास सुरवात केली. परंतु मधून मधून ती चोरदृष्टीनें आपल्या पतीकडे पहात होती. गणोबानें तिचें सर्व भाषण शांतपणें ऐकून घेतलें. नंतर तो ह्मणाला, " ह्या सर्व कृत्याला कारण तूं. "

"मी !" सरूनें डोळ्यावरचा पदर बाजूला करून एकदम विचारलें.

" होय तूं. चांडाळणी तूंच बरं !"

" मी ! मी कशी ? "

" कशी ? थांब सांगतों. पहिल्यानें मी कोण त्याची चांगली ओळख पटवून मग सर्व सांगतों." असें ह्मणून गणोबानें खिशांतून दोन हात लांब तागाचा जाड वळलेला दोर काढला. आणि मारण्याकरितां वर उगारला. आतां आपली शंभर वर्षे भरलीं हें तिला कळून चुकलें. तिनें पळण्याची बरीच धडपड केली परंतु गणोबा दरवाजांतच उभा होता त्यामुळें बिचारी अडली!

" पळतेस कुठें ? मी कोण आहें हें कळलं पाहिजेना ?" दहापांच तडाखे देऊन गणोबा म्हणाला, "पटली ना आतां खूण ? कीं नाहीं ?" पुनः त्यानें तडाखे देण्यास सुरवात केली. "बस्स ! पोटभर झालं आतां. इतकं बक्षीस सरदाराच्या दासीला बस्स आहे. मजजवळून सुटून जाण्याकरितां मला फसवून लांड्यांत नेऊन टाकलेंस काय ? तुझा नवरा खलाशी आहे त्याची तुला लाज वाटते ना ? × × नें माझ्या संसाराची—माझ्या सुखाची माती केली. एखाद्या खलाशाच्याच पोरीबरोबर लग्न करतो तर माझा संसार सुखाचा झाला असतां, पण × × नें मला मोहिनी घातली ! नशीब समज कीं, मघां त्या म्हाताऱ्यानें तुझें वर्तन चांगलें आहे म्हणून सांगितलें, नाहीं तर आतां भलताच प्रसंग येतां."

सरूनें एक चकार शब्दहि मुखावाटें काढला नाहीं. तिनें मुकाट्यानें आपल्या नवऱ्याचा मार सहन केला. गणोबानें आपलें भाषण आटोपून दोर पुनः वळला आणि खिशांत टाकला. कमळजा भयाभीत होऊन आपल्या आईला चिकटून राहिली. परंतु सांवळ्याला मात्र भीति न वाटतां, आजपर्यंत आपणाला जी यथेच्छ मारीत होती तिलाहि मारणारा जगांत एकजण आहे हें पाहून आनंद झाला !

# प्रकरण ३ रें.

## आरमाराच्या मोहिमी.

सरूनें गणोबाला फसवून दारूच्या निशेंत मोगलाई आरमारावर नेऊन टाकल्यानंतर तो पांच वर्षे कोठें होता, तें जाणण्याची वाचकांना उत्कंठा लागली असेल. करितां, आपण त्याकडे वळूं. गणोबा दुसऱ्या दिवशीं चांगला शुद्धीवर आल्यानंतर आपण कोठें आहोंत याची त्याला कांहींच कल्पना होईना. जहाजावर सर्वत्र मोगल ! तेव्हां यांत कांहींतरी कपट असावें असें त्यांला वाटलें. तो शुद्धीवर आला असें कळतांच त्या आरमारावरील मुख्य तांडेलानें त्याला जवळ बोलावून आरमारावरील कोठलें काम करण्याची त्याची इच्छा आहे तें विचारलें. तेव्हां आपण येथें कसें आलों हा पहिला प्रश्न गणोबानें त्याला विचारला. तांडेलानें त्याला खरी हकीकत सांगितल्यावर ह्या कृत्यांच्या मुळाशीं आपली बायको आहे असें त्याला कळलें. त्यावेळीं गणोबाच्या रागाचें वर्णन कोण करील ? त्या संधीला सरू जर त्याच्या तावडींत सांपडती तर त्यानें एखाद्या रानटी जनावराप्रमाणें तिला फाडून मारलें असतें ! असो. तें आरमार म्लेंच्छांचें असल्यामुळें दोन दिवस त्यानें अन्नपाणी घेतलें नाहीं. तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं विरुद्ध दिशेनें महाराजांचें एक मोठें आरमार येतांना त्याच्या दृष्टीस पडलें.

परंतु तें जहाज आपल्यापैकीं आहे किंवा शत्रूचें आहे हें मात्र मोंगलाईच्या आरमारावरील मुख्य तांडेलाला ओळखतां आलें नाहीं. त्यानें महाराजांचें आरमार जवळ येऊं दिलें. मोंगलाईचें आरमार आपल्या माऱ्यांत आलेलें पाहून महाराजांच्या आरमारानें तोफा डागल्या. क्षणभर त्यांची लढाई जुंपल्या सारखी दिसली, तोंच मोंगलाईच्या आरमारानें शीड चढवून जहाजाची दिशा बदलली. त्या गडबडींत गणोबानें हळूच समुद्रांत उडी टाकिली !

गणोबा महाराजांच्या आरमारावर सुरक्षितपणें पोहून आला. तें आरमार रेवदंड्याच्या खाडींतून घोंसाळेगडावर चाललें होतें. शिद्दीनें त्या किल्ल्याला वेढा दिला आहे असें कळतांच दर्यासागर सरदाराबरोबर पांचशें लोकांची कुमक देऊन वेढा उठविण्याकरितां महाराजांनीं तें मोठें आरमार पाठविलें होतें. परंतु दर्यासागराला तेथें युद्ध प्रसंग आला नाहीं. कारण महाराजांनीं अफजुलखानाला मारिलें असें

१ घोंसाळगड किंवा घोंसाळें किल्ला—हा किल्ला रोह्याचे दक्षिणेस ६ मैलांवर रेवदंड्याची खाडी आणि साळव्याची खाडी यांच्यामध्यें एका टेंकडीवर आहे. इ. स. १६३० त हा किल्ला विजापुरच्या बादशहाच्या अमलाखालीं असून जंजिऱ्याच्या शिद्दीच्या ताब्यांत होता. शिद्दीनें त्यावर एक मराठा किल्लेदार नेमला होता. त्यानें इ. स. १६४८ त तो किल्ला शिवाजी महाराजांना दिला. इ. स. १६५९ त विजापुरच्या बादशहाचा सेनापति अफजुलखान शिवाजी महाराजांना धरून नेण्याची प्रतिज्ञा करून इकडे आला, तेव्हां शिद्दीनें ह्या किल्याला वेढा दिला. परंतु पुढें अफजुलखान मारला गेला हें वर्तमान शिद्दीला कळतांच तो वेढा उठवून पळून गेला. पुढें इंग्रजांनीं आपली सत्ता कायम करतांना इ. स. १८१८ त रायगडास वेढा देण्यापूर्वीं कर्नल प्रोथर साहेबानें हा किल्ला घेतला.

कळताच भयाभीत होऊन शिद्दी तेथून पळाला. तरी देखील जातां जातां दर्यासागरानें शिद्दी आरमाराचें बरेंच नुकसान केलें. इकडे थोडे दिवस आरमारावर राहून परत घरीं जावें असा गणोबाचा विचार होता. परंतु गडाची पूर्ववत् व्यवस्था व्हावयास एक वर्ष लागलें आणि तितके दिवस दर्यासागराला तेथें रहावें लागलें. तेथील व्यवस्था लावून आतां तें आरमार परत कुलाब्यास आपल्या ठाण्यावर येणार तोंच महाराजांकडून कोंकण किनाऱ्यावर जाण्याचा दर्यासागराला हुकूम आला. तेव्हां त्यानें कोणालाच जहाज सोडूं दिलें नाहीं. दर्यासागर तांडेल अतिशय कडवा मनुष्य होता. तरी इतर तांडेलापेक्षां गणोबावर त्याचें विशेष प्रेम होतें. एका वर्षाच्या अनुभवावरून गणोबा हा उत्तम तांडेल आहे अशी त्याची पूर्ण खात्री झाली होती. तो आपल्या आरमारावरील प्रत्येक तांडेलाला दाढी राखण्यास लावी. त्यामुळें विशेष प्रसंगीं त्याला फायदा होत असे. एक दोनदां त्यांचें जहाज शत्रूच्या पूर्ण कचाट्यांत सांपडलें असतां, त्या बिकट प्रसंगीं त्याच्या जहाजावरील लोकांच्या एकंदर पेहरावावरून व त्यांच्या दाढी मिशामुळें ते आपणांच पैकीं आहेत असा शत्रूचा समज होऊन त्यांना बिनहरकत निभावून जातां आलें.

दर्यासागराला आरमार घेऊन कोंकण किनाऱ्यावर जावयास सांगितलें त्याप्रमाणें तो गेला परंतु त्याच्या साहाय्याची महाराजांना कांहींच गरज लागली नाहीं. कारण तें काम महाराजांनीं स्वतः

---

१ मुधोळचा बाजी घोरपडे यानें शहाजी राजांस दग्यानें पकडलें. पुढें नजरकैदेंतून सुटतांच राजांनीं शिवाजीमहाराजांस 'तुम्ही आमचे खरे पुत्र

जातीनें केलें. आपल्या पित्याचा वैरी बाजी घोरपडे याचा पुरा सूड उगवून महाराजांनीं कुलाबा किल्ला पुनः मजबूत बांधण्याचा विचार केला. तें काम ( इ. स० १६६२ ) पुरें झाल्यावर तेथें त्यांनीं आपलें आरमार ठेविलें. त्या आरमारावर दर्यासागर यांस मुख्य नेमिलें. तेव्हां त्यानें तेथें चांचेपणाचा धंदा करणाऱ्या पोर्तुगीज लोकांस अतिशय त्रास देण्यास सुरवात केली. शेवटीं पोर्तुगीज लोकांनीं तह करून प्रत्येक वर्षीं तोफा, दारुगोळा वगैरे युद्धोपयोगी सामान महाराजांस देण्याचें कबूल केलें. इतका प्रकार होईपर्यंत गणोबा पांच

असाल तर बाजी घोरपड्यास योग्य शिक्षा कराल.' असा निरोप पाठविला. महाराज घोरपड्याचा सूड उगविण्याची संधी पहात होते. परंतु त्यास पातशहाचा आश्रय असल्यामुळें महाराज गप्प होते. पुढें १६६१ त वाडीचे खेमसावंत व लखमसावंत देसाई यांनीं विजापूरकरांची मदत घेऊन शिवाजी महाराजांशीं लढाई करण्याचा बेत केला. तेव्हां पातशहानें त्यांच्या मदतीस ह्या घोरपड्यास दिलें. तो विजापूरकरांच्या सैन्यासह कोंकणांत यावयास निघाला. हें महाराजांस कळतांच त्यांनीं तेथे सैन्य व आरमार रवाना केलें, परंतु त्यांना कोंकणप्रान्तापर्यंत जाण्याची जरूरी पडली नाहीं, कारण मुधोळ हें घोरपड्याचें गांव असल्यामुळें प्रथम तो तिकडे गेला, ही खबर लागतांच महाराजांनीं मोठ्या वेगानें कूच करून मुधोळावर अकस्मात् छापा घातला. त्यांची निकराची लढाई झाली; तींत घोरपडे पडला. नंतर महाराजांनीं सगळें मुधोळ शहर लुटून जाळून उध्वस्त करून टाकिलें, व घोरपड्याचे सगळे नातलग हातीं लागले तितके लोक पकडून ठार मारिले. असें सांगतात कीं, ह्या वेळीं तीन हजार लोकांचा महाराजांनीं संहार केला! एवढें भयंकर कृत्य ह्यापूर्वी किंवा ह्यानंतर महाराजांच्या हातून कधींहि झालें नाहीं. परंतु यवनांचा पक्ष धरून केवळ आपला तळिराम गार करण्यासाठीं ह्या घोरपड्यानें शहाजीराजांचा जीव धोक्यांत घातला ह्याबद्दल महाराजांच्या मनांत केवढा प्रखर दंश होता हें दिसून येतें, व पितृभक्ति त्यांच्याठायीं किती सोज्वळ होती हेंहि चांगलें व्यक्त होतें.

वर्षे त्या आरमारावर अडकून राहिला. नंतर तो माहिमच्या खाडींत गेला. तेथें त्याला सरू घर विकून कुलाब्यांत राहण्याकरितां गेली असें कळलें. त्याप्रमाणें तो कुलाब्यांत आला.

असो. गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें गणोबानें आपल्या बायकोवर इतक्या दिवसांच्या रागाची शिल्लक काढून घेतली. सरूनें नवऱ्याचा मार मुकाट्यानें सहन केला याचें वाचकांस आश्चर्य वाटेल. कारण तिच्यासारख्या स्त्रीनें अशा वेळीं मुग पेरणें ह्मणजे आश्चर्य खरेंच ! परंतु तिनें निराळाच विचार मनांत योजून ठेविला होता. फंक्त काळोख पडण्याची ती वाट पहात होती.

गणोबा दुपारची थोडा वेळ झोंप घेऊन दुकानावर येऊन बसला होता. दुकानावर येणाऱ्या गिऱ्हाईकांना सांवळ्याकडून सरू जिन्नस देत होती. कमलजा आपल्या बापाजवळ बाहेर चौथऱ्यावर बसून दुकानाची मौज पहात होती. आपल्या मागें चरितार्थाकरितां बायकोनें स्वतःच्या अकलेनें घातलेलें दुकान इतक्या भरभराटीला आलेलें पाहून गणोबाला आनंदच झाला. स्वतःला अशी हुशार बायको मिळाली ह्मणून क्षणभर त्याला धन्य वाटलें. सरूचा स्वभाव थोडा सोशीक असता तर तिच्यासारख्या बायकोबद्दल कोणालाहि धन्यता वाटली असती. हंबीररावांकडे असतांना कमलजाबाईच्या सहवासानें ती चांगली सुशिक्षित झाली होती. वास्तविक त्यावेळीं तिच्या दर्जाच्या बायकांत तिच्या इतका सुशिक्षितपणा आढळणें दुरापास्तच ! एकंदरीनें सरू एखाद्या सरदाराच्या घराण्यांत देखील शोभण्यासारखी होती. असो. थोड्या वेळानें दुकानावरचीं गिऱ्हाइकें कमी होतांच सरू फराळाचे जिन्नस घेऊन

वाड्यांत गेली. गणोबानें चिलीम पेटविली तोंच तुकोजी तेथें आला. चिलीमीचे एक दोन फेर उडाल्यानंतर गणोबानें आपल्या जहाजावरील सर्व हकीकत त्याला सांगितली. आणि विचारलें, " पण राव, येथला टोपीवाल्यांचा त्रास कसा काय आहे, तें तर सांगा ? येथें तर एकजात तीच दिसते आहे ! गेल्या पांच वर्षांत मला तर इथली कांहींच खबर नाहीं. "

येथें वाचकांना एक गोष्ट सांगितली पाहिजे. इंग्रज लोक हे कुशल व्यापारी आणि हुशार दर्यावर्दी आहेत असें महाराजांचें मत होतें. आणि त्यांच्या व्यापारानें आपल्या मुलुखाचें हित आहे असें त्यांस वाटे. दुसरें असें कीं, शिद्दीशीं महाराजांस वारंवार युद्धप्रसंग करावे लागत, यास्तव त्यांच्याकडून आरमाराची वगैरे मदत आपणास मिळेल अशीहि त्यांस आशा होती. त्यांची जहाजें मोठीं व मजबूत असत, तशीं जहाजें आपणास त्यांच्याकडून मिळतील व चांगल्या तोफा, बंदुका व दारूगोळा ते आपणांस पुरवितील असें महाराजांस वाटे. आणखी असें कीं, मोगलांच्या साहाय्यानें शिद्दी हा इंग्रजाच्या मुंबईबंदरांतून आंत शिरून आपल्या कुर्ला वगैरे प्रान्ताला उपद्रव देईल तो टाळण्यास इंग्रजांस आपले स्नेही करून ठेवणें हें होय असेंहि महाराजांचें धोरण होतें. खरें ह्मटलें असतां इंग्रजांस ह्या बेटांतून हांकून देऊन तेथें आपलें ठाणें बसविण्यास महाराजांना कांहीं कठीण नव्हतें. परंतु अशा परदेशांतील व्यापाऱ्यांस विनाकारण त्रास द्यावा, व आपल्या देशाशीं त्यांचा होत असलेला व्यापार बंद पाडावा हें त्यांस बरोबर वाटलें नाहीं. तसेंच महाराजांच्या मनांत

सगळ्या पश्चिम किनाऱ्यावर आपली सत्ता बसवावी असा दृढ हेतु होता, परंतु तो साध्य व्हावयास चांगलें मजबूत आरमार आपणांस तयार केलें पाहिजे व तें तयार करण्याच्या कामीं त्यांच्याकडून मदत होण्याचा संभव होता ह्मणून साधेल तितकें करून त्यांना न दुखविण्याचा महाराज प्रयत्न करीत. अशा कारणास्तव महाराज त्या वेळच्या ह्या परस्थ व्यापाऱ्यांशीं मित्रभावानें वागत. असें जरी होतें आणि पहिल्यानें महाराज ह्या व्यापाऱ्यांशीं मित्रभावानें वागत तरी त्यांच्यांतील धर्मवेडाच्या फैलावामुळें ते लोक हिंदूप्रजेस छळीत हें पाहून महाराजांना, आपल्या प्रजेस छळणारांचा अतिशय राग आला होता. परंतु त्यांच्या रागाला मूर्त स्वरूप येण्यापूर्वींच तेथील वखारीवर अंगिआर नांवाचा एक हुशार व धोरणी गव्हर्नर आला. तो तावडतोब महाराजांशीं कायमची मैत्री करण्याच्या उद्योगाला लागला. त्यांची मर्जी प्रसन्न करण्याकरितां पूर्वीं ठरलेल्या तहाप्रमाणें तो तोफा, बंदुका, आणि दारूगोळा प्रतिवर्षीं नेमानें महाराजांना पुरवूं लागला. एवढ्याच कारणामुळें महाराज गप्प राहिले. अंगिआर हा धोरणी मनुष्य होता ह्मणूनच फिरंगी लोक येथें चिकटून राहिले असें ह्मणतात.

गणोबाचा प्रश्न ऐकून तुकोजीनें एक जोराचा दम मारिला आणि तो ह्मणाला, “ कसला त्रास घेऊन बसला आहांत राव! आपल्या महाराजांपुढें त्यांची काय मात्रा चालणार आहे! बाकी काय सांगूं तुह्मांला दादा, आपल्या महाराजांसारखा धनी होणं नाहीं. अहो राव, परवांचीच गोष्ट ध्याना—महाराज कर्नाटकांत मोहिमेवर गेले असें शिद्दीला

कळतांच त्यानें कोंकण किनाऱ्यावर पुनः धामधूम सुरू केली. त्यांत लोभाच्या आशेनें मोंगलांच्या आरमारानेंहि त्यांना सहाय्य केलें. त्या दोघांनीं मिळून जयतापूर शहरावर हल्ला करून सर्व शहरास आग लावून दिली, हें वर्तमान ठाण्यावरच्या आपल्या लोकांना कळतांच त्यांनीं शिद्दी आरमारावर जोराचा हल्ला करून त्यांना खाडींतच शह देऊन कोंडलें—"

" शाबास बहाद्दर ! " मध्येंच गणोबा ह्मणाला.

" ऐका तर राव,—काय सांगूं तुह्मांला, पुढें महाराजांच्या आरमारानें त्यांचा पुरा धुव्वा उडविला, तेव्हां कुठें त्यांचे डोळे उघडले. त्यांनीं जो तेथून पळ काढला तो मुंबई बंदरांतून माजगांव खाडींत येऊन दडी दिली. "

" पण फिरंग्यानें मुंबई बंदरांत शिद्दी कसा येऊं दिला ? "

" तेंच तर सांगतों ना ! पुढें कुर्ला प्रान्तांतील एक दुष्ट ब्राह्मणानें पैशाच्या आशेनें चार संभावित ब्राह्मण पकडून शिद्दीच्या स्वाधीन केले. हें वर्तमान आपले चेऊलचे जावजी पारळे सुभेदारांस कळलें. तेव्हां त्या बाणेदार सुभेदारांस हा ब्राह्मणांचा अपमान सहन न होऊन त्यानें तेथल्या इंग्रजांस असें जबरेचें पत्र पाठविलें कीं, ' तुमच्या बेटांत आमच्या प्रांतांतले कांहीं ब्राह्मण शिद्दीनें पकडून नेले आहेत, त्यांस सोडवून सुरक्षितपणें एकदम परत पाठवून द्यावें. नाहींतर तुमच्याकडे येथून जाणारा दाणागल्ला व सरपण आह्मी बंद करूं. "

" मग पुढें ? "

" काय सांगूं तुह्मांला दादा, असा धमकीचा निरोप इंग्रजांस गेला तरी ते ही गोष्ट मनावर घेईनात. तेव्हां सुभेदारानें पुनः निरोप पाठविला कीं, 'तुह्मी आपल्या बंदरांत शिद्दी येऊं दिला हा एक गुन्हा; आमच्या प्रजेचा तुमच्या पाद्रीं मंडळीनें चालविलेला छळ हा दुसरा, आणि तिसरा आमच्या पूज्य ब्राह्मणांचा तुमच्या हलगर्जीपणामुळें शिद्दी करीत असलेला छळ वगैरे सविस्तर हकिकतीचें पत्र तेथून महाराजांस रवाना होत आहे त्याचा विचार व्हावा.' हा निरोप पावतांच इंग्रज घाबरला. व बारकाईनें शोध करून शिद्दीकडून ब्राह्मणांची त्यांनीं मोकळीक केली."

" बरं पण अलीकडील महाराजांचा कांहीं मोहिमी करण्याचा बेत कळला का तुह्माला ?"

" वाः—तें तर मोठें वर्तमान आहे राव, काय सांगूं तुह्माला दादा, आता महाराज सुरतची मोहीम सुरू करणार. आणि वसईच्या खाडींत आरमाराची तयारीहि जारीनें चालू आहे."

" काय ह्मणतां राव !" आनंदानें गणोबा ह्मणाला, " तर मग ह्या स्वारीला आपण जाणार !"

---

१ जावजी पारळे सुभेदाराकडून महाराजांस पत्र गेलें आहे असें कळतांच इंग्रजाचें धाबें दणाणलें. त्यांनीं तत्काळ चौकसपणानें शोध करून शिद्दीकडून ब्राह्मणांची मुक्तता केली. आणि ह्या कामांत आपण किती दक्ष आहोंत हें दाखविण्याकरितां आणि महाराजांस खुष करण्याकरितां ज्या पडावांतून ब्राह्मण आणले होते त्यावरील ११ खलाशांस पकडून त्यांपैकीं तिघांस देहान्त शासन देऊन बाकी च्यांस त्यांनीं सेन्ट हेलेना येथें रवाना केलें.

# प्रकरण ४ थें.



## सरूचा मानसिक आजार.



आज आपण जें मुंबई शहर वारुळांतील मुंग्याप्रमाणें अठरा पगड जातीच्या माणसांनी रात्रंदिवस गजबजलेलें पाहतों तेंच दोन अडीच शतकांपूर्वीं कोठल्या स्थितींत होतें बरें ? खरोखरच काळ हा मोठा चमत्कारिक आहे. हा कोणाला काय रूप देईल याचा नेमच नाहीं. प्रत्येक वस्तूंत, प्रत्येत स्थितींत, प्रत्येक मनुष्यांत आणि प्रत्येक प्राणिमात्रांत स्थित्यंतर घडवून आणणारा हा जादुगार काळच आहे ! त्याच्या देशकालवर्तमानस्थितीवरून भवितव्यतेची कल्पना होणें मानवी प्राण्यास अगदीं अशक्य आहे. ज्या मुंबई शहराची सांप्रतची मनोहर आणि ऐश्वर्ययुक्त शोभा पाहून मनाला एक तऱ्हेचा आल्हाद होतो, तेंच शहर पूर्वीं एक लहानसें बेट असून अगदीं भिकार स्थितींत होतें अशी आपणांस कल्पना तरी करवेल काय ? दुसऱ्या प्रकरणांत उल्लेख केलेला, महाराजांनीं रोग्यांकरिता बांधलेला वाडा आतां जाऊन तेथें हजारों रुपयांच्या, शेकडोशें कोसांवरून आलेल्या मालाचें गजबजलेलें मोठें 'वाडीबंदर' सध्यां दृष्टीस पडतें, आपल्या सार्वभौम इंग्रजांनीं प्रथम चंचुप्रवेश करून ज्या विस्तीर्ण ठिकाणीं आपल्या बराकी आणि वखारी घालून सभोंवतीं कोट बांधला होता त्याच जागेला

सांप्रत सावकारी आणि सरकारी कचेऱ्यांनीं गजबजलेलें 'फोर्ट' असें ह्मणतात. सध्यां आपण ज्या ठिकाणीं लाखों रुपयांच्या उलाढाली करणाऱ्या सावकारांच्या पेढ्या पाहतों त्याच ठिकाणीं अडीचशें वर्षांपूर्वी शेतकरी लोक शेतांतला कडबा, तुराट्या, सरमड, धान्याचा भूस वगैरे ठेवित असत, हें त्या चमत्कारिक कालरूपी क्रान्तिकारकाचें विलक्षण स्थित्यंतर नव्हे काय?

असो. अशा त्या वेळच्या त्या भिकार बेटांत एक लहानशा झोंपडींत काय चाललें आहे तें आपण पाहूं. रात्र बरीच झाली होती. बाहेर लख्ख चांदणें पडलें होतें. सर्वत्र अगदीं सामसूम होते. मधून मधून इंग्रजांच्या बराकींतून बंदुकीचे आवाज आणि कुत्र्यांचें भोकणें ऐकूं येत होतें. क्वचित् प्रसंगीं कोल्हे-कुईहि ऐकूं येई. इतकी रात्र झाली तरी सावळ्याला झोंप येईना. तो सारखा घोंगडीवर तळमळत पडला होता. आज संध्याकाळीं बापाच्या जवळ बसून त्यानें तुकोजीच्या तोंडून महाराजांविषयीं ऐकलेल्या अनेक गोष्टी त्याच्या मनांत सारख्या घोळत होत्या. बऱ्याच वेळानें त्याच्या मनांत दुसरा विचार आला. आपला बाप रागानें आईला मारीत आहे आणि आपण स्वस्थपणें ती मजा पहात आहोंत असें चित्र त्याच्या डोळ्यापुढें येऊन उभें राहिलें तोंच बाहेर मोठ्यानें आवाज झालेला त्याच्या कानीं आला. त्याबरोबर तो तसाच धडपडत उठला आणि डोळे चोळीत चोळीत दरवाजाजवळ गेला. पलीकडल्या खोलींत गणोबा दारूच्या पूर्ण निशेंत एका कांबळीवर स्वस्थ घोरत पडला होता. जवळच सरू ओणवी होऊन आपल्या

पतीच्या चेहऱ्याकडे पहात होती. तिनें डावा हात गुडघ्या-वर ठेविला होता आणि उजव्या हातांत एक लहानसा सुरा घेतला होता. अशा अपरात्रीं आपल्या आईच्या हातांत सुरा पाहतांच तो दरवाजांतच जागच्या जागीं थबकला! त्याच्या कों-वळ्या मनांत नानाप्रकारचे भयंकर विचार येऊं लागले. दुपारीं मार मिळाला ह्मणून सूड उगविण्याकरितां कांहीं भयंकर कृत्य कर-ण्याच्या उद्देशानें आईनें हातांत सुरा घेतला आहे असें त्याला वाटलें. त्याचें सर्व शरीर लटलट कांपूं लागलें. कसेंहि करून आपण बापाला जागें करावें ह्मणून त्यानें ओरडण्याचा प्रयत्न केला परंतु त्याची जिव्हा कांहीं काम करेना! इतक्यांत सरूनें आपल्या पतीकडे पाहून थोडेसें विकट हास्य केलें. दरवाज्यांत उभें राहून सांवळ्या आपली कृति पहात आहे हें तिच्या लक्ष्यांत देखील आलें नाहीं, इतकी ती हातीं घेतलेल्या कृतींत एकचित्त झाली होती. क्षणभरानें आपल्या तोंडावर आलेले केस मागें सारून ती हलकेंच ह्मणाली, "काय ध्यान निजलं आहे पण! अहाहा! वा:रे आमचे धनी खलाशी!—मला कारणाशिवाय दुपारीं मार काय?—आणि ही कुठली तुला अवदसा आठवली! चांगला चेहरा ठेवायचा सोडून बोकडासारखी ही दाढी—!" असें ह्मणून तिनें गणोबाची लांब दाढी हातांतील तीक्ष्ण सुऱ्यानें चटकन् कापली. पुनः क्षणभर थांबून तिनें आपल्या पतीच्या मानेखालीं हात घातला. आणि "जसा काय संन्याशी! मेल्या मी जिवंत असतां हा संन्यास!" असें अर्धवट बोलून तिनें त्याच्या केसांचा एक लांब बट कापला.

सरूचें हें सर्व कृत्य पहात सांवळ्या दरवाजाजवळ स्तब्ध उभा होता. क्षणभरानें सुरा आपल्या मिऱ्यांत ठेऊन सरूनें आपल्या निद्रिस्त पतीकडे पाहिलें आणि " इतकं पुष्कळ झालं! आजचा रंग पाहून मला विनाकारण मारल्याचा उद्यां घेतें उगवून सूड ! " असें आपणाशींच पुटपुटत ती पडवींत निघून गेली. बराच वेळ झाला, ती परत येत नाहीं असें पाहून सांवळ्या हळूंच दरवाज्यांतून आंत आला आणि आपल्या बापाला हालवूं लागला. क्षणभर त्यानें गणोबाला हालवावें आणि नंतर डोकें वर करून आई येतें किंवा काय हें पडवींत डोकावून पहावें. असें बराच वेळ चाललें होतें परंतु गणोबा कांहीं केल्या उठेना. शेवटीं त्रासून तो उठला. इतक्यात कोंपऱ्यांत पाण्यानें भरलेल्या लोट्याकडे त्याचे लक्ष गेलें. त्यानें ताबडतोब लोट्यांतून थोडें पाणी हातावर घेऊन गणोबाच्या तोंडावर शिंपलें. त्याबरोबर गणोबा दचकून उठला. त्यानें डोळे उघडतांच सांवळ्यानें त्याच्या केसांचा सरूनें कापलेला बट चटकन् त्याच्यापुढें धरून त्याच्या दाढीकडे आणि केसांकडे बोट दाखविलें.

" काय रे हें सांवळ्या ? "

" हें तुमचें केस बाबा ! आईनें सुऱ्यानें कापले ! "

हें ऐकतांच गणोबा ताडकन् उठून त्यानें सांवळ्याच्या हातातून तो बट घेतला आणि डावा हात आपल्या डोक्यावरून नंतर दाढी-वरून फिरविला. दोन्हीं ठिकाणीं केस नाहींत हें पाहून तो रागानें लाल झाला !

" केव्हां त्या चांडाळणीनें हें काम केलें ? " त्वेषानें हाताच्या मुठी वळून त्यानें सांवळ्याला विचारिलें.

" आतांच बाबा. "

" आतां—इतक्यांत ? मी निजलों असतां ?—कुठें आहे ती आतां ? "

सांवळ्यानें पडवीकडे बोट दाखविलें.

रागाच्या सपाट्यांत गणोबा एकदम पडवींत शिरला. सांवळ्या त्याच्याकडे पहात तेथेंच उभा राहिला. थोड्या वेळानें सरूनें मोठ्यानें मारलेली किंकाळी त्याला ऐकूं आली.त्याबरोबर तो धांवत आंत गेला. आणि पाहतो तों गणोबा सरूला निर्दयपणानें सारखा मारीत आहे. जवळ भयाभीत झालेली कमलजा आरोळ्या फोडीत उभी होती. सरू ओरडून ओरडून दमली, तिचा घसा साफ कोरडा पडला, तरी गणोबाचा हात चालू होता. शेवटीं ती गणोबाच्या असह्य मारानें खालीं पडली. त्यांच्या झोंपडींत इतकी गडबड आणि आरडाओरड झाली तरी आजुबाजूचें कोणीहि सरूच्या मदतीला धांवून आलें नाहीं. त्याच्या आरडण्याओरडण्यानें चोहोंकडे कुत्रे मात्र जास्त जोरानें ओरडूं लागले.

आई जमिनीवर पडलेली पाहतांच सांवळ्या केविलवाण्या स्वरानें बापाचा हात धरून ह्मणाला, " बाबा, बाबा, आई खास मेली असेल हो ! "

गणोबानें तिच्याकडे क्षणभर नीट न्याहाळून पाहिलें.

" बस्स ! इतकी बक्षिसी पुरे आहे, नाहींरे सावळ्या ? " असें

ह्मणून त्यानें नेहमींच्या सवयींप्रमाणें दाढीवरून हात फिरविला. परंतु तेथें दाढी होती कोठें ? तोंच पुनः त्याला त्वेष चढला.

" काय करूं रे ह्या माझ्या कापलेल्या केसांची आठवण झाली कीं, अद्यापि हिला मरेपर्यंत मारावी असें वाटतें !—पण तूं काय ह्मणतोस सांवळ्या ? ती मेली—–बरं झालं, माझा आणि तुझा दोघांचाहि त्रास चुकला ! " असें ह्मणून तो खालीं पडलेल्या आपल्या बायकोकडे एक चित्तानें बराच वेळ पहात उभा राहिला. परंतु तिची कांहींच हालचाल त्याला दिसेना. तेव्हां मात्र गणोबा घाबरला. त्यानें हळूंच आपला हात तिच्या नाकाजवळ नेला परंतु ती जिवंत असल्याचें कोठलेंच चिन्ह त्याला दिसेना. तिचा श्वासोश्वासहि बंद झालेला त्याला आढळला. तेव्हां तर तो जास्तच घाबरून सांवळ्याकडे वळून ह्मणाला, " कायरे सांवळ्या, खरंच कारे ही मेली ? पहा—पहा—लेका—"

सांवळ्यानें आपल्या आईच्या अंगाला हात लावून पाहिला, तिच्या नाकाजवळ हात नेऊन तिचा श्वास पाहिला परंतु खरोखरच तिचा श्वास बंद होता. श्वास नाहीं आणि आंगहि थंड लागलेलें पाहून बिचारें तें पोर घाबरलें. त्याचे भीतीनें हातपाय लटपटूं लागले. तो हुंदके देत अडखळत अडखळत ह्मणाला, " बा—बा पहा हो ही आई थंड—–"

" काय—काय—सांवळ्या ? "

" खरंच मेली हो ! आई—ए आई—ए—"

" काय !—मेली—" भयाभीत होऊन गणोबानेंहि तिच्या छाती-

वर हात ठेऊन पाहिला, नाकाजवळ हात धरून पाहिला परंतु श्वास नाहीं. मग काय ?—गणोबा घाबरला ! " ती—ती—मरावी म्हणून नाहींरे तिला मारलं सांवळ्या ! आतां काय ? सांवळ्या पळ, पळ आणि तात्या वैद्याला आण—जा. त्याला खरी खरी हकीकत सांग आणि हें घे. मी—मी पळतों—पहा सांभाळ—बरं सांवळ्या ! "

गणोबाची भीतीनें अगदीं गाळण उडाली. आपण बायकोला ठार मारलें तेव्हां आतां आपणांस पकडून आपला कडेलोट करतील ही भीति दत्त म्हणून त्याच्यापुढें उभी राहिली. क्षणभरानें त्यानें एक रुपया काढून सांवळ्याच्या हातावर ठेविला आणि एक वेळ जमिनीवर अस्ताव्यस्त पडलेल्या आपल्या बायकोकडे पाहिलें. कमलजा एका कोपऱ्यांत भीतीनें देहभानरहित पडली होती. ती दृष्टीस पडतांच गणोबानें तिला वर उचललें. किंचित्कालानें त्या पोरीनें डोळे उघडले. " आतां पोरी तुझं कसं होईल ? मी चांडाळानें हें काय केलें ! " असें म्हणून तिच्या तोंडावरून त्यानें हात फिरविला आणि तिच्या गालाचा मुका घेऊन तो सांवळ्याला म्हणाला, " सांभाळ—सांवळ्या, आतां—आतां सर्व तुझ्याकडे आहे. "

खोलींतून बाहेर पडतांना तेथें पडलेली कांबळी उचलून गणोबा घराबाहेर पडला. त्यानें एकदांसुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. सांवळ्या बिचारा अगदीं गांगरून गेला होता. गणोबा निघून गेल्यावर त्यानें एकवेळ आपल्या आईकडे पाहिलें. ती अगदीं निचेष्टित पडली होती. आतां काय करावें हें त्या पोराला सुचेना. इतक्यांत त्याला तात्या वैद्याची आठवण झाली. तो कमळजेला म्हणाला, " कमळजे,

ह्मणून त्यानें नेहमींच्या सवयींप्रमाणें दाढीवरून हात फिरविला. परंतु तेथें दाढी होती कोठें ? तोंच पुनः त्याला त्वेष चढला.

" काय करूं रे ह्या माझ्या कापलेल्या केसांची आठवण झाली कीं, अद्यापि हिला मरेपर्यंत मारावी असें वाटतें !—पण तूं काय ह्मणतोस सांवळ्या ? ती मेली——बरं झालं, माझा आणि तुझा दोघांचाहि त्रास चुकला ! " असें ह्मणून तो खालीं पडलेल्या आपल्या बायकोकडे एक चित्तानें बराच वेळ पहात उभा राहिला. परंतु तिची कांहींच हालचाल त्याला दिसेना. तेव्हां मात्र गणोबा घाबरला. त्यानें हळूंच आपला हात तिच्या नाकाजवळ नेला परंतु ती जिवंत असल्याचें कोठलेंच चिन्ह त्याला दिसेना. तिचा श्वासोश्वासहि बंद झालेला त्याला आढळला. तेव्हा तर तो जास्तच घाबरून सांवळ्याकडे वळून ह्मणाला, " कायरे सांवळ्या, खरंच कारे ही मेली ? पहा—पहा—लेका—"

सांवळ्यानें आपल्या आईच्या अंगाला हात लावून पाहिला, तिच्या नाकाजवळ हात नेऊन तिचा श्वास पाहिला परंतु खरोखरच तिचा श्वास बंद होता. श्वास नाहीं आणि आंगहि थंड लागलेलें पाहून बिचारें तें पोर घाबरलें. त्याचे भीतीनें हातपाय लटपटूं लागले. तो हुंदके देत अडखळत अडखळत ह्मणाला, " बा—बा पहा हो ही आई थंड——"

" काय—काय—सांवळ्या ! "

" खरंच मेली हो ! आई—ए आई—ए—"

" काय !—मेली—" भयाभीत होऊन गणोबानेंहि तिच्या छाती-

वर हात ठेऊन पाहिला, नाकाजवळ हात धरून पाहिला परंतु श्वास नाहीं. मग काय ?–गणोबा घाबरला ! " ती–ती–मरावी ह्मणून नाहींरे तिला मारलं सांवळ्या ! आतां काय ? सांवळ्या पळ, पळ आणि तात्या वैद्याला आण–जा. त्याला खरी खरी हकीकत सांग आणि हें घे. मी–मी पळतों–पहा सांभाळ–बरं सांवळ्या ! "

गणोबाची भीतीनें अगदीं गाळण उडाली. आपण बायकोला ठार मारलें तेव्हां आतां आपणांस पकडून आपला कडेलोट करतील ही भीति दत्त ह्मणून त्याच्यापुढें उभी राहिली. क्षणभरानें त्यानें एक रुपया काढून सांवळ्याच्या हातावर ठेविला आणि एक वेळ जमिनीवर अस्ताव्यस्त पडलेल्या आपल्या बायकोकडे पाहिलें. कमलजा एका कोपऱ्यांत भीतीनें देहभानरहित पडली होती. ती दृष्टीस पडतांच गणोबानें तिला वर उचललें. किंचित्कालानें त्या पोरीनें डोळे उघडले. " आतां पोरी तुझं कसं होईल ? मी चांडाळानें हें काय केलें ! " असें ह्मणून तिच्या तोंडावरून त्यानें हात फिरविला आणि तिच्या गालाचा मुका घेऊन तो सांवळ्याला ह्मणाला, " सांभाळ–सांवळ्या, आतां–आतां सर्व तुझ्याकडे आहे. "

खोलींतून बाहेर पडतांना तेथें पडलेली कांबळी उचलून गणोबा घराबाहेर पडला. त्यानें एकदांसुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. सांवळ्या बिचारा अगदीं गांगरून गेला होता. गणोबा निघून गेल्यावर त्यानें एकवेळ आपल्या आईकडे पाहिलें. ती अगदीं निचेष्टित पडली होती. आतां काय करावें हें त्या पोराला सुचेना. इतक्यांत त्याला तात्या वैद्याची आठवण झाली. तो कमळजेला ह्मणाला, " कमळजे,

तूं आईजवळ बैस बरं ! मी आता तात्याला घेऊन येतों. भिऊं नको हो बाळ."

" पण दादा, आईरे कां अशी पडली आहे ?"

" तिला बाबानें मारलें."

त्यावेळची त्या लहान बहीणभावंडांची स्थिति फार केविलवाणी होती. प्रश्न विचारीत असतां कमलजेनें आपल्या दादाच्या कंबरे सभोंवतीं हाताचा वेढा दिला होता, व सांवळ्या तिच्या चिमुकल्या हनुवटीला हात लावून व दुसरा हात तिच्या खांद्यावर ठेऊन तिची समजूत करीत आहे ! हें बहीण भावंडाच्या केविलवाण्या स्थितीचें चित्र रेखाटणें लेखकाच्या शक्तीबाहेरचें काम आहे. सांवळ्यानें आपल्या धाकट्या बहिणीची कशीबशी समजूत करून तिला आई-जवळ बसविलें आणि आपण तात्याला बोलाविण्याकरितां लगबगीनें घराबाहेर पडला. त्यावेळीं मध्यरात्र झाली होती.

तात्या वैद्य सरकारी वाड्याजवळ रहात होता. वाड्याचें काम तोच पहात असे. तात्यावर वाड्यांतील रोग्यांची इतकी श्रद्धा बसली होती कीं, त्यानें कांहीं जरी सांगितलें तरी त्यावर मंडळीचा पूर्ण विश्वास बसे. आणि त्यानें औषध म्हणून माती जरी दिली तरी ती घेऊन श्रद्धेमुळें रोगी बरेहि होत असत. तो वयानें पंचावन वर्षांचा होता. स्वभावानें तो फारच गमती व थट्टेखोर असून आपल्या कामांत फार हुशार होता. त्यावेळीं वाड्यांत तात्या वैद्य म्हणजे एक व्यक्तीच होती. बांध्यानें तो ठेंगणा असून त्याचें तोंड चेंडूसारखें वाटोळें भरगरीत होतें. ही वामनमूर्ति विशेष गमतीची आणि एकदां पाह-

तांच पूर्णपणें लक्ष्यांत राहण्याचें कारण त्याच्या सर्व डोक्याला टक्कल असून त्याच्या पाठीवर कुबड आलें होतें. तात्या वैद्य जरी थट्टेखोर आणि दिसण्यांत बावळट दिसे तरी दुसऱ्यावर आपली छाप कशी बसवावी ह्या कसबांत तो पुरा वाकबदार होता. बोलतांना तो नेहमीं मोठमोठीं वाक्यें सहज बोलून त्यांत पद्याप्रमाणें प्रासहि जुळवीत असे. सांवळ्या त्याच्या घराजवळ जाऊन प्रथम त्याला हांका मारूं लागला. परंतु आंतून कोणीही जबाब देईना. शेवटीं दरवाजावर धक्के देऊन मोठमोठ्यानें ‘ तात्या, तात्या ’ अशा हांका मारण्यास त्यानें सुरवात केली. तेव्हां पुष्कळ वेळानें आंतून ‘ कोण आहे ? ’ असा तात्यानें स्वतः प्रश्न विचारला.

“ मी आहें तात्या. लवकर दरवाजा उघडा. ”

“ मी ह्मणजे कोण ? ”

“ मी ह्मणजे मी. ”

“ गाढवाच्या लेका, मी ह्मणजे कोण ? ”

“ तात्या गाढवाचा लेक नाहीं, मी गणोबाचा लेक. पण पहिल्यानें दरवाजा उघडा. ”

“ खरंच का तूं गणोबाचा लेक कीं, गाढवाचा लेक ? ”

“ च्–च्–तात्या, खरंच हो मी गणोबाचा लेक सांवळ्या. ”

“ असं काय ! तूंच कांरे तो सांवळ्या—जावळ्या ? ”

“ होय तात्या होय मीच तो सांवळ्या. ”

“ मग काय पाहिजेरे तुला कावळ्या—मावळ्या ? ”

“ सांगतों, पण दरवाजा तर उघडा. ”

" सांग पहिल्यानें सांवळ्या, मग उघडतों दरवाजा. "

" अहो तात्या, माझी आई हो–आई–अरेरे–!."

" अरे ' आई अरेरे ' काय ?–आजारी आहे होय ? "

" आजारी कसली हो ! पण दरवाजा उघडा. "

" मानसिक आजार आहे कीं शारिरिक आजार आहे तो ? "

" दोन्ही–दोन्ही आहेत पण एकदांचा दरवाजा उघडा ! "

" अरेरे ! दोन्ही आहेत तर मग फारच वाईट. पण कायरे सांवळ्या, त्वचा रोग आहे कीं, मांस रोग आहे कीं, रक्तरोग आहे कीं, हाड रोग आहे–आहे तरी काय ? "

" अहो तात्या सर्व सर्व आहेत पण तुह्मी दरवाजा उघडून बाहेर या एकदांचे. "

" अरेरे ! सर्व रोग आहेत तर मग अतिशयच वाईट. पण कायरे सांवळ्या, पाठीवर आहे कीं, पोटावर आहे रोग ! "

" पाठीवर आहेत पाठीवर आणि पोटावर थोडे आहेत. पण पाठीवरचे वळ फार मोठे आहेत. "

" पाठीवर आहे, तर मग कांहीं विशेष हरकत नाहीं. पण पोटावर आहे ह्मणतोस तेव्हां जुलाबाकरितां त्रिफळा चूर्ण गरम पाण्यांत दिलें पाहिजे. त्यानें जर झालें नाहीं तर बस्तीचा उपयोग केला पाहिजे. त्याचाहि गूण नच आला तर मग शेवटचा–शस्त्राचा प्रयोग केला पाहिजे—"

" तात्या, तुमच्या मी पायां पडतों पण एकदांचे दरवाजा उघडून बाहेर या. "

सांवळ्यानें इतकी जेव्हां माथेफोड करून कटकट केली तेव्हां एकदांचा दरवाजा उघडून तात्याची स्वारी बाहेर आली. अद्यापि तात्याचे प्रश्न विचारून पुरे झाले नव्हते. त्यानें सांवळ्याचा हात धरून पुनः विचारलें, " पण कायरे सांवळ्या, तुझी आई आजारी झाल्यापासून हिंडते फिरते कीं, अगदीं चेप पडून आहे !—हो, तें एकदां कळलं कीं, त्याप्रमाणें औषध योजनेला ठीक. काय समजलास सांवळ्या ? तुझं नांव सांवळ्याच ना ? "

हा तात्याचा प्रश्न ऐकून सांवळ्या त्रासून आणि चिडून ह्मणाला, " समजलों, समजलों सर्व समजलों. इतक्या अवकाशांत माझी आई खरीं मेली देखील असेल ! "

" अरे काय ह्मणतोस काय सांवळ्या ! इतक्यावर का गोष्ट आली ?—गोप्या, ए गोप्या, टोप्या, बोक्या—लेका उठ, माझा बटवा कुठें ठेवलास ?" असें ह्मणून तेथें कोपऱ्यांत निजलेल्या आपल्या नोकराला तात्यानें हातांतील काठीनें जोरानें ढुसकलें. गोपाळा धडपडत उठला आणि त्यानें फळीवरील बटवा तात्याच्या हातीं दिला.

" अरे पण ह्यांत त्रिफळा चूर्ण कुठें आहे लेका ? जा दगड्या, त्या फडताळावरचें घेऊन ये—हं—हं—त्यांत नाहीं, त्यांत नाहीं गाढवा; तो बेलफळाचा मुरंबा आहेना ? "

तात्या इतकें ह्मणेपर्यंत गोप्यानें मुरंबाच्या डब्यांतील एक कापटी तोंडांत टाकलीच ! नंतर दुसऱ्या फडताळावरील बरणींतून त्रिफळा चूर्ण आणून तात्याच्या हातीं दिलें. तें बटव्यांत टाकून ' जोडा, जोडा,' करीत तात्यानें दोन्हीं कोपरे शोधले.

सांवळ्या तात्याला घेऊन झपाट्यानें निघाला. वाटेंत " अरे लेका सांवळ्या, थांब ना ! माकडासारखा पटापट . उड्या मारीत चाल्लास पण मला म्हाताऱ्याला येऊं तर देशील ! " अशी तात्याची सारखी बडबड चालू होती. सांवळ्याचें सर्व चित्त घरीं लागलें होतें. त्यानें तात्याच्या बडबडीकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. घरीं येतांच त्यानें पडवीचा दरवाजा एकदम उघडला आणि तात्याला आंत ढकलून " पहा आतां डोळे उघडून माझ्या आईची अवस्था काय आहे—" इतकेंच अर्धवट बोलून तो एकदम थांबला. आपली आई निचेष्टित पडली असून बापाच्या मारामुळें मृत्युपंथाला लागली आहे असें त्याला वाटलें होतें, परंतु दरवाजा उघडून पाहतो तों काय ! सरू आरशासमोर उभी राहून आपले अस्ताव्यस्त झालेले केस सारखे करीत होती आणि तोंडानें—

छळिलें छळिलें मजशीं यानें । सखेग बाई ॥
किती यानें छळिलें छळिलें ॥ धृ० ॥

अशी गुणगुणत होती.

दरवाजा उघडून एकदम तात्या आंत आलेला पाहून ती क्षणभर त्यांच्याकडे पहात राहिली. नंतर रागानें ह्मणाली, "वाः तात्या, आजपर्यंत तुह्मांला मी फार सज्जन मनुष्य समजत होतें ! अशा अपरात्रीं एकट्या बायको मनुष्याच्या घरांत एकदम यायला तुह्माला कांहींतरी—आणि मेल्या तुला--" असें ह्मणून तिनें पटकन् सांवळ्याचा हात धरला आणि त्याच्या पाठीवर जोराजोरानें तडाखे देण्यास सुरवात केली. हा सर्व प्रकार काय आहे हें तात्याच्या कांहींच लक्ष्यात येईना. तो आश्चर्यचकित होऊन टकमक पहात तेथेंच उभा

राहिला होता. शेवटीं आईच्या मारामुळें सांवळ्या ओरडण्यास लागलेला पाहून त्यांनीं मोठ्या शिकस्तीनें तिच्या हातून त्याची सुटका केली आणि त्याला पडवीबाहेर आणिलें.

" उगा बाळ उगा ! रडूं नको बरं. अरे हा सर्व प्रकार मानसिक रोगाचा. तूं मला सांगितल्याप्रमाणें तुझ्या आईला हा मानसिक रोगच झाला होता. त्यावर रामबाण मात्रा ह्मणजे चौदावें रत्नच ! त्याचा प्रयोग तुझ्या पाठीवर करून तिनें आपला महाजालिम रोग घालविला. काय समजलास बाळ सांवळ्या ? आतां ती अगदीं निरोगी झाली, तूं बिलकूल काळजी करूं नकोस. मी आतां जातों बरं ! " असें ह्मणून हातवारे करीत तात्याची स्वारी बाहेर पडली.

" सांवळ्या, मी मेलें होतें कायरे चांडाळा ? "

" म—मला तसं—तसं वाटलं आई—" रडत रडत सांवळ्यानें उत्तर दिलें.

" मला तसं वाटलं आई ! " असें वेडावीत सरूनें कोपऱ्यांत भयाभीत होऊन बसलेल्या कमलजेला वर उचललें आणि तिच्या तोंडावरून हात फिरवीत ती ह्मणाली, " माझं गुणाचं बाळ तें !— म्यालंग बाई माझं पोर ! "

कमलजेला जास्तच रडण्याचा हुंदका आला. तिची समजूत करीत सरू पुनः सांवळ्याला ह्मणाली, " आन् तो चांडाळ खलाशी गेला कुठं ? पळाला वाटतं मला मारून ! बरं झालं, माझ्या मागचा त्रास तरी चुकला ! मेल्यानें दोन दिवसांत माझी दशा दशा करून टाकली ! अन् मेल्या, तूं काय कमी आहेस ? नाशील आपल्या बापाच्या वळणार ! "

# प्रकरण ५ वें.



## सांवळयाविषयीं नवीन व्यवस्था.



"काय बगा नकसीम्रावानी प्वोर! अन् ती बया त्येला घरां-तबी उभी करना! म्यां तर तिला त्यो दिसा म्हंगलं, तर बघा राजाऊ, माझ्या अंगावर जनू वाघ्रावानी वस्सा वस्सा वोरडूं की लागली! काय बघा कुनबी होऊनशानी शिरीमंती दाखविती!"

"कसली आलीया शिरीमंती गजाऊ! परवां माझ्या घरामंदी मीठ न्हाई का मिरचीबी न्हाई असा वखूत आला, तवा गेले मी तिच्याकड, पन् रांडन् उलिस कोडर्चीसबी न्हाई दिलं, तवा काय म्हंगावं ही शिरीमंती व्हय? मोठी बघा कंजुस हाई ती बया." राजाऊ म्हणाली.

"त्यो वाड्याकडचा तुकोजीचा कडू न्हवका, त्यो आमच्या घरधन्यास सांगत व्हता कीं बघा, तिचा धनी अस्सल म्हराठा हाई पन् ही बया कुठं त्यास नादवती!" गजाऊ म्हणाली.

"अन् त्योबी काई कमी न्हाई बरं, मार मारुशानी तिचं पिट्ट काढतुया!"

आजचा बाजाराचा दिवस. सर्वत्र गडबड उडाली होती. गरीब-गुरीब गुळ, तांदुळ, मिठमिरची वगैरे जिन्नस घेण्यास दुकानदारांसभो-

वतीं एकच गराडा घालून उभे होते; तर कोणी कापडाच्या दुकानावर आपल्या मुलांसाठीं अंगडीं, बंड्या घेण्यांत गर्क होते. कोणी फार दिवसांनीं बाजारांत भेट झाली म्हणून परस्परांच्या खुशालीच्या व इतर गोष्टी बोलत होते, अशी एकच गडबड उडाली होती. वर दिलेला संवाद अशाच प्रकारचा होता. बाजार करून परत जात असतां त्या दोन बायकांना सरूच्या दुकानावरून जाण्यास रस्ता होता. तेव्हां अर्थात त्या दुकानाकडे पाहून त्यांचें भाषण सुरू झालें. त्यांच्या भाषणाचा आशय वाचकांच्या लक्ष्यांत आलाच असेल!

मागील प्रकरणांत घडलेल्या गोष्टीच्या दुसऱ्या दिवशीं तुकोबा चिलीम ओढण्याकरितां सरूच्या दुकानावर आला. त्यावेळीं गणोबा त्याच्या दृष्टीस पडला नाहीं म्हणून त्यानें सांवळ्याजवळ त्याच्या बापाची चौकशी केली. तेव्हां आदल्या दिवशीं घडलेल्या सर्व गोष्टी सांवळ्यानें त्याला सांगितल्या. ती हकीकत तो सांगत असतां दुकानावर आलेली बरीच मंडळी सांवळ्याच्या सभोंवतीं जमा होऊन ऐकत होती.

"मग खरंच का, तुझ्या बापानें संन्यास घेतला आहे?" सांवळ्या सांगत असलेली हकीकत ऐकून एकानें सांवळ्याला विचारिलें. तेव्हां सांवळ्या गोंधळला. संन्यास म्हणजे काय? हें त्याला कळेना. गणोबाची दाढी आणि केस कापतांना "जसा काय संन्यासी! मेल्या मी जिवंत असतांना हा संन्यास!" असें आई रात्रीं म्हणाली होती तेच तिचे शब्द त्यानें आतां मंडळीला सांगितले.

"वेड्या, बायको जिवंत असतां तो संन्यास कसा घेईल!"

तुकाबानें त्याला उत्तर दिलें, "काय सांगूं राव, गणोबा आहे दर्यासागर सरदाराच्या आरमारावर; त्याच्या आरमारावर तर सर्वांना दाढी केस ठेवावे लागतात."

इतक्यांत सरूनें सांवळ्याला आंतून हांक मारिली. तेव्हां एकानें "ए सांवळ्या, तुला संन्याशाचा मार खाऊ बोलाविते आंत," असें म्हटलें. तें आंतून सरूनें ऐकलें. मग काय ? तिनें आकाशपाताळ एक केलें ! इतकेंच नव्हे तर सांवळ्या आंत येतांच तिनें त्याला यथेच्छ बडविलें ! ह्या गोष्टीला दोन दिवस झाले, तितक्या अवधींत सरूला नवऱ्यानें मारल्याची हकीकत सर्व वाड्याभर पसरली. आणि जो तो 'संन्याशाचा मार खाऊ' अशी तिला हांक मारूं लागला- 'खलाशाची बायको' असें म्हटलें असतां जिला चीड येऊन अनावर राग येत असे, तिला हें नवीन विशेषण मिळाल्यावर काय विचारतां ?

"मेल्या निर्लज्ज बेरड्या, घरांतल्या गोष्टी बाहेर सांगितल्यास कायरे कारट्या ? मी संन्याशाची बायको काय !–उठ–माझ्या घरीं नकोस तूं–नीघ, चालता हो येथून. आलास तर मेल्या तंगड मोडीन ! हो चालता. आज पासून तुझें मला दर्शन नको. मेल्या, आज तूं मेलास असेंच मी समजेन–"

त्या दिवशीं एका उडाणटप्पूनें सरूला तिच्या तोंडावर 'संन्याशाची आवा' असें म्हटलें. तेव्हां इतकी आग पेटली कीं, त्या दिवशीं सांवळ्याला बेदम मार बसून त्याला आपल्या घराला मुकावें लागलें ! सरूनें त्याला मारून घराबाहेर ढकलून दिलें आणि दरवाजा लावला.

तेव्हां सांवळ्या रडत रडत वाड्यांत तुकोजीजवळ गेला. दुसऱ्या दिवशीं तो परत घरीं आला परंतु सरू त्याला घरांत घेईना. कमळजेनें भावाकरितां रडून आकांत केला परंतु सरूनें त्याकडे लक्षच दिलें नाहीं. अशा रीतीनें एक आठवडा लोटला. सरू त्याला घरांत घेईना. हें पाहून हळूंच आईच्या नकळत घरीं जाण्याची म्हाताऱ्या तुकोबानें त्याला मसलत दिली. परंतु सरू किती हेकेखोर बायको आहे याची त्याला कल्पना नव्हती. आठ पंधरा दिवस झाल्यावर ती आपल्या मुलाला घरांत घेईल असें त्याला वाटत होतें. परंतु सरूच्या बाबतींत कल्पना करण्यांत आपण खास चुकलों हें त्याच्या लवकरच प्रत्ययास आलें. त्यानें दिलेल्या मसलतीप्रमाणें सांवळ्या त्या दिवशीं आपल्या आईच्या नकळत घरीं गेला. पण लवकरच रडत रडत त्याला परत वाड्यांत यावें लागलें ! ज्यावेळीं तो घरीं गेला तेव्हां सरू स्वयंपाक करण्यांत गुंतली होती. त्यामुळें घरांत जाण्यास त्याला रस्ता मोकळा मिळाला. भाऊ घरीं आलेला पाहतांच कमळजेला अतिशय आनंद झाला. ते दोघे एकत्र आंत गोष्टी बोलत बसले. थोड्या वेळानें सांवळ्याचा शब्द सरूला ऐकूं गेला. त्याबरोबर उठून ती दरवाजाच्या फटींतून पाहूं लागली. सांवळ्याला कमळजेजवळ बसलेला पाहतांच तिचें डोकें फिरलें ! ती तशीच रागानें आंत गेली आणि चुलींतील जळकें लाकूड घेऊन धाडकन् दरवाजा उघडून आंत आली. आईला पाहतांच सांवळ्या घाबरला. तो पळण्याकरितां मार्ग शोधूं लागला. परंतु सरू दरवाजांत एखाद्या वाघिणीप्रमाणें चवताळलेली उभी होती. तरी देखील मनाचा मोठा

हिय्या करून सांवळ्या तिच्या अंगावरून पळाला. तितक्यात सरूनें हातांतील जळकें लाकूड त्याच्या पाठींत जोरानें मारिलें. आणि प्रत्यक्ष आपल्या पोटच्या मुलावर आपलें मातृप्रेम किती आहे हें दाखविणारी अशी जन्माची खूण त्याच्या पाठीवर करून ठेविली !

पाठीवर जबरदस्त भाजल्यामुळें एक महिना सांवळ्या वाड्यांत खाटेवर पडला होता. परंतु सरू एकदां देखील त्याला पाहण्याकरिता गेली नाहीं. तेव्हां तिच्या स्वभावाची तुकोबाला चांगली ओळख पटली ! प्रकरणाच्या आरंभी बाजारांत भेटलेल्या बायकांच्या भाषणावरून सरूच्या स्वभावाची ओळख तेथें प्रत्येकाला झाली होती हें वाचकांच्या लक्ष्यांत येईलच ! एका महिन्यानें सांवळ्या बरा झाला तेव्हां तुकोजीला चिंता उद्भवली. त्याला बापाकडे पाठवावा तर त्याचा पत्ता नाहीं, आणि आई घरांत थारा देत नाहीं अशा समयीं जर आपण त्याच्यावर नजर ठेविली नाहीं तर वाईट संगतीनें तो बिघडून त्याचें आयुष्य फुकट जाईल असे विचार त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळूं लागले. त्यावेळीं सांवळ्या अवघा अकरा वर्षांचा होता. शेवटीं त्याला दर्यावर्दीपणाची माहिती करून देऊन महाराजांच्या आरमारावर त्याला कामास आणावें असा तुकोजीनें विचार केला. परंतु हें व्हावें कसें हा एक प्रश्न होता !

सहा महिने सांवळ्या वाड्यांत तुकोजीजवळ होता. तितक्या अवधींत त्यानें सांवळ्याला अनेक हितोपदेशाच्या गोष्टी सांगून चांगलें कोठलें, वाईट कोठलें, आईबापाशीं आपलें वर्तन कसें असावें,

त्याचप्रमाणें महाराजांविषयीं आपलें कर्तव्य काय वगैरे अनेक गोष्टींची चांगली माहिती करून दिली.

एके दिवशीं एक वृद्ध तांडेल तुकोजीचा शोध करीत वाड्यांत आला. त्यावेळीं तुकोजी सांवळ्याला घेऊन आपल्या खोलींत बसला होता. त्या तांडेलाला आंत येतांना पाहून तुकोजी एकाएकीं चपापला.

" कोण सुभानजी !–छेः ! " क्षणभरानें कांपऱ्या आवाजात तुकोजी म्हणाला, " सुभानजी जिवंत कोठून असणार ! तो तर बायकोसह बुडून मेला !–पण माझे डोळे मला चकवीत तर नाहींत ना ! "

" नाहीं. तुकोजी, तुम्हीं जें पाहतां तें सर्व खरें आहे. तुमचे डोळे तुम्हांला खात्रीनें चकवीत नाहींत; कारण मीच तो दुर्दैवी सुभानजी नाईक. "

" खरंच काय ! " असें म्हणून तुकोजी ताडकन् उठला आणि त्यानें सुभानजीला कडकडून मिठी मारिली. क्षणभर दोघेहि अगदीं स्तब्ध होते. सांवळ्या हातांत चिलीम धरून त्या दोघांच्या तोंडाकडे टकमक पहात उभा होता. थोड्या वेळानें त्याच्या हातांतील चिलीम घेऊन तुकोबानें सुभानजीच्या पुढें केली. ती त्यानें हातांत घेतल्यावर तुकोबा म्हणाला, "काय सांगू तुम्हांला सुभानजी, मी तर समजत होतो कीं, तुम्हीं आणि तुमच्या बायकोनें त्या तुफानात जलसमाधी घेतली म्हणून ! कारण पुढें आम्हीं शोध केल्यावर आपल्या जहाजावरील फक्त चौवेजण वांचले असें मला समजलें–"

" आणि मी समजत होतों कीं आम्हीं दोघे—मी आणि एक लहान दोन वर्षांची मुलगी अशीं दोघेंच वांचलों—!"

" खरं कीं काय ? त्या तुफान दर्यांतून दोन वर्षांची मुलगी वाचली म्हणतां ? कोण ती मुलगी ? "

सुभानजी म्हणतो ती मुलगी कोण, वादळ कोठलें व केव्हां झालें, त्याचें येथें स्फटिकरण करून कथानक पुढें चालवूं. विजापुराहून अफजुलखान येण्यापूर्वीं महाराज कोंकण किनाऱ्यावरील मोहिमींत[1] गुंतलें होते. ही मोहिम पुरी करून परत येत असतां जावळीचा चंद्रराव मोरे त्याच्या आश्रयानें शिवतर खोरींत बाबाजी कोंडदेव[2], त्याचप्रमाणें हिरडस

१ ( इ. स. १६५४–५८ ) विजापूरकराचे अंकित असलेले सर्व किल्लेदार आपले अंकित करून त्यांच्या साहाय्यानें स्वराज्याचा विस्तार करावा अशी महाराजांची प्रबळ इच्छा होती. ती फलद्रुप होण्याकरितां महाराजांनीं पुष्कळ किल्लेदारास सामोपचारानें वळवून, कित्येकांस जहागिरीचें मिष दाखवून तर प्रसंगीं कैकांबरोबर युद्ध करून त्यांना अंकित करून घेतलें; शिवाय महाराजांची दिगंत कीर्ति ऐकून अशा महापुरुषाचें अंकित व्हावें म्हणून बरेच किल्लेदार आपण होऊन त्यांना येऊन मिळाले, परंतु ज्यांच्याबरोबर युद्धप्रसंग झाले त्यांपैकीं जावळीचा चंद्रराव मोरे हा एक होता. महाराजांनीं अनेक वेळां त्याच्याशीं सलोख्यानें बोलणें लावून पाहिलें परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. तेव्हां युक्तीनें जेर करून त्याचा महाराजांनीं वध केला आणि त्याच्या ताब्यांतले सगळे कोटकिल्ले हस्तगत केले.

२ चंद्रराव मोरे याच्या आश्रयानें शिवतर खोरींत बाबाजी कोंडदेव ह्या नांवाचा एक ब्राह्मण होता. मोऱ्याचा नायनाट करून महाराज त्या प्रान्तांत अंमल बसवूं लागले तेव्हां हा ब्राह्मण शिरजोर होऊन महाराजांस मुळींच जुमानिना. त्यानें आसपासच्या प्रान्तांत धुडगूस आरंभिला. त्यावरून त्यास महाराजांनीं पकडून कैद केलें.

मावळांतील बांदल देशमुख यांचा पाडाव करीपर्यंत पावसाळा सुरू झाला म्हणून महाराजांनीं मोहीम बंद केली. त्या मोहिमीकरितां महाराजांचें जें आरमार गेलें होतें, त्यावर सुभानजी नाईक हा मुख्य तांडेल आणि तुकोजी कडू हा दुय्यम प्रतीचा तांडेल होता. त्या जहाजावर सुभानजीची बायको होती. मोहीम पुरी करून येत असतां आठ दिवस वारा चांगला होता. नवव्या दिवशीं सोसाट्याचा वारा सुटून वादळास सुरवात झाली. तो दिवस आरमारावरील खलाशांनीं मोठ्या शिकस्तीनें काढला. दुसऱ्या दिवशीं पहाटेच्या सुमाराला तें आरमार एका खडकावर जाऊन आपटलें ! त्या वेळीं खलाशांचा मरणकाळचा एकच हलकल्लोळ उडाला ! त्यांत पुष्कळ प्राणहानि झाली. तुकोजी कडू आणि दुसरे कांहीं खलाशी मोठ्या प्रयासानें वांचले. त्या भयंकर तुफानांतून आपण चौघेच वांचलों असें तुकोजीला वाटलें. परंतु खरी वस्तुस्थिति तशी नव्हती. इतर साधनांनीं

---

१ मावळांत रोहिडा किल्ल्यांत बांदल देशमुख हा फार प्रबळ होऊन बसला होता, त्याच्याकडे महाराजांनीं मोर्चा फिरविला. प्रथम त्याच्याशीं समोपचाराचें बोलणें लावून पाहिलें परंतु सौम्य उपायानें तो वश होईना. शेवटीं त्याच्याशीं युद्धप्रसंग करावा लागला. अखेरीस त्याचा मोड होऊन तो समरांगणांत पडला. तेव्हां त्याचे उरलेले लोक महाराजांस शरण आले. त्यांत बांदलाचा दिवाण बाजी प्रभु देशपांडे, सेना सरदार आणि दुसरे अनेक हुशार व शूर पुरुष महाराजांच्या पदरीं राहिले. त्यापैकीं ह्या बाजी प्रभूची मर्दुमकी पाहून महाराज फार खूष झाले आणि त्याला आपल्या एका पायदळ तुकडीचा सरदार केलें. ह्या स्वामिभक्त सरदारानें आमरण मोठ्या इमानानें महाराजांची नोकरी करून शेवटीं अलौकिक रीतीनें स्वामीकार्याकरितां महाराज पन्हाळ्यावरून पळून जात असतां शत्रूला मोठ्या हिमतीनें रोखून भरण्यांत आपला देह खर्ची पाडला.

जे इतर खलाशी वांचले त्यांत सुभानजी देखील एका फळीला धरून मोठ्या संकटानें वहात चालला होता. ह्या तुफानांतून आपण वांचत नाहीं असें त्याला क्षणोक्षणीं वाटत होतें. आणि आपण वांचावें अशी त्याची इच्छाहि नव्हती. त्याची इतकी निराशा होण्याचें कारण जहाज फुटतांच क्षणभर मोठ्यानें जी आरडाओरड झाली त्यांत त्यानें त्याचें हृदयभेद करणारी एक किंकाळी ऐकिली होती. आवाजावरून ती किंकाळी आपल्या प्रिय पत्नीची आहे असें त्यानें ओळखलें. तत्काळ त्यानें त्या बाजूला वळून पाहिलें तों काय? खवळलेल्या समुद्रानें जहाजाच्या त्या बाजूची सर्व मंडळी केव्हांच आपल्या विशाळ उदरांत घेतली होती! आपण जहाजाचे मुख्य तांडेल असून संकटसमयीं आपल्या जीवास जीव देणाऱ्या आपल्या हाताखालच्या खलाशांना आपणांस वांचवितां येऊं नये, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष आपली प्रिय पत्नीहि आपल्या डोळ्यादेखत वादळांत सांपडली ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागली! सुभानजी फळीवरून वहात असता संध्याकाळच्या सुमारास बाजूनें बऱ्याच अंतरावर कांहीं तरी वहात आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. पुष्कळ धडपड केल्यावर तें वहात जाणारें, लहान मुलाच्या लाकडी पाळण्याप्रमाणें कांहीं असावें असें त्याला आढळून आलें. इतक्यांत बाजूनें तरंगत असलेली त्या पाळण्याची दोरी त्याच्या नजरेस पडली. ती धरून स्वतःचा तोल सांभाळून त्यानें हळुहळू पाळणा जवळ ओढला. त्यांत उंची वस्त्रांत गुंडाळलेली दोन वर्षांची मुलगी होती. मुलीला गुंडाळलेले सर्व कपडे साफ भिजून गेल्यामुळें ती मुलगी गारठलेली होती.

मध्यरात्रीच्या सुमारास वादळ थोडें कमी झालें तेव्हां सभानजीला धीर येऊं लागला. परंतु सबंध दिवस आणि रात्र पाण्यांत राहिल्यामुळें थंडीनें आपण गारठणार अशी त्याला भीति वाटली. तेव्हां त्यानें पाळण्याच्या लांब दोरीनें स्वतःला फळीबरोबर घट्ट बांधून घेतलें. आतां लवकरच वादळ बंद होईल मग आपण हरप्रयत्नानें किनाऱ्याला लागण्याचा प्रयत्न करूं असे त्याचे विचार चालू होते. परंतु असह्य थंडीमुळें व पाण्याच्या भयंकर मारामुळें तो इतका निर्बल झाला होता कीं त्याला ग्लानी येऊन तो लवकरच बेशुद्ध झाला!

" ईश्वराची लीला किती अगाध आहे पहा ! " वादळांत सांपडलेल्या प्रसंगाची आपली सर्व हकीकत सांगून सुभानजी तुकोबाला पुढें म्हणाला, " अशा भयंकर वादळांतून दोन वर्षांची लहान मुलगी सुरक्षित रहावी हें त्याचें कौतुक नाहीं का ? "

" तें काय विचारतां राव, तुमचा आमचा अहंपणा घालविण्याकरितां तर ईश्वराचे हे खेळ आहेत, खरंना ? बरं पुढें काय झालं ?"

" दुसऱ्या दिवशीं आम्हीं दोघें वहात वहात वसईच्या खाडींत गेलों. तिकडे आम्हांला मंडळींनें किनाऱ्यावर ओढून घेतलें. त्या वादळांत सांपडून वहात आलेले अठ्ठावीस लोक तिकडच्या मंडळींनें किनाऱ्यावर ओढून काढले, परंतु त्यांपैकीं आम्हीं दोघेंच जिवंत होतो."

" मग त्या मुलीच्या आईबापाचा पत्ता नसेल लागला तुम्हाला ?"

" नाहीं. मी पुष्कळ शोध केला, परंतु शोध कांहीं लागला नाहीं. बहुतकरून आमच्या सारखेंच दुसरें एखादें महाग त्या वादळांत सांपडलें असावें. बाकी कपड्यांवरून आणि त्या अंकडी रंगीत

पाळण्यावरून ती मुलगी कोणी तरी थोर घराण्यांतील असावी असें वाटतें. " सुभानजी ह्मणाला, " तुकोबा, वादळांत माझी बायको गेली पण ईश्वरानें वादळांतून ही मुलगी मला दिली. आतां ह्या माझ्या मोहनेशिवाय मला दुसरें कोणीहि नाहीं ! "

सांवळ्या जवळ बसून त्यांच्या गोष्टी लक्षपूर्वक ऐकत होता. सुभानजीनें आपली हकीकत सांगितल्यावर पुनः एक वेळ चिलीम पेटविली. तुकोबानें चिलीम ओढतां ओढतां विचारलें, " काय सांगूं तुह्माला सुभानजी, ईश्वराच्या मनांत असलं ह्मणजे अशी अकल्पित रीतीनें भेट होते. पण मी ह्मणतों राव, तुह्माला इतक्या वर्षांनीं माझी आठवण तरी कशी झाली ? "

" तुकोबा, ही माझी बायको गेल्यापासून सर्व गोष्टींविरून माझं चित्त अगदीं उडालं आहे. ह्या सहा सात वर्षांत मी वसईची खाडी सोडून एकदांहि कुठें गेलों नाहीं. "

" खरं खरं ! पण काय सांगूं राव तुह्माला, मलाहि आहे त्याचा पूर्ण अनुभव ! एकदां चित्त उडालं कीं निव्वळ वैराग्य येतें ! "

" सध्यां महाराजांचं आरमार आमच्या वसईच्या खाडींत उतरलं आहे. तुह्मांला माहित असेलच कीं, महाराज सुरतेवर मोहिम करण्याच्या विचारांत आहेत तें !—त्या आरमारावरील तांडेल रोज मजकडे येतात. ह्या सहासात वर्षांत मी वसई कांहीं सोडली नाहीं तेव्हां बाहेर काय चाललं आहे याची मला माहिती कोठून असणार ! होतां होईल तों मी ह्या दुसऱ्या गोष्टी टाळत असें. परंतु परवा गोष्टी करतांना एका तांडेलानें ही तुमच्या वाड्याची



मुंबईचें इंग्रजी आरमार.

आणि तुमची माहिती मला सांगितली. तेव्हां मात्र माझा जीव राहीना. किती झालं तरी आपण एका जहाजावर सुखासमाधानानें दिवस काढलेले ! तेव्हां माझा जीव तरी कसा रहावा ! मोहनेला घरांत ठेवून मी तसाच निघालों. आतां तुमची काय खबर आहे ती कळूं द्या." असें ह्मणून सुभानजीनें चिलीम हातांत घेतली.

तुकोबानें आपली हकीकत क्रमाक्रमानें सांगून तो सांवळ्याची हकीकत सांगूं लागला, " काय सांगूं राव तुह्मांला, हें पोर तर आहे असं चुणचुणीत ! तेव्हां मी ह्या पोराविषयीं योजलेल्या गोष्टीची कशी व्यवस्था करावी, तें मला कांहींच सुचत नाहीं ! "

" तुम्हीं काय व्यवस्था केली आहे ? मला सांगा, म्हणजे मी पाहीन मला काय करतां येईल तें ! "

" व्यवस्था म्हणजे दुसरी कांहीं नाहीं. फक्त त्याला दर्यावर्दी बनवून महाराजांच्या आरमारावर कामास आणावें."

" इतकंचना ? मग त्यांत काय आहे ? द्या कीं पाठवून त्याला मजकडे मी जातों त्याला बरोबर घेऊन. कां सांवळ्या आहे कां तुझा विचार ? "

" हो. "

" माझ्या घरीं राहशील ना ? "

" हो. "

# प्रकरण ६ वें.

## सांवळ्याचें साहस.

पौर्णिमेची रात्र. सर्वत्र अगदीं स्वच्छ प्रकाश पडला होता. उंच वाढलेल्या समुद्राच्या पाण्यावरून आरोग्यदायक शान्त वारा मनाला आल्हाद देत होता. अशा शान्त वेळीं वसईच्या खाडीजवळ आपल्या लहान झोंपडीपुढें एका घात्रळी-वर सुभानजी चिलीम ओढीत बसला होता. जवळच मोहना आणि सांवळ्या एकचित्तानें सुभानजी सांगत असलेल्या गोष्टी ऐकत होते. सांवळ्या आतां चवदा वर्षांचा झाला होता. मोहना त्याच्यापेक्षां थोडी लहान होती. ती सुभानजीला आपला बाप असें समजत असे. तिच्यावर लहानपणीं आलेल्या प्राणांतिक समयाची अद्यापि सुभानजीनें तिला ओळख करून दिली नव्हती. आमचा कथानायक सुभानजीकडे येऊन जवळ जवळ तीन वर्षें झालीं. तितक्या अवधींत मोहनेची आणि त्याची अगदीं घट्ट मैत्री जमली. रोज सकाळीं सुभानजी त्याला जहाजावर नेऊन वल्ही कशीं मारावीं, सुकाणू कसें धरावें, नक्षत्रावरून दिशा कशा ओळखाव्या, शीड कसें पाडावें, पाण्याची खोली कशी पहावी वगैरे अनेक दर्यावर्दीपणाच्या कामाची माहिती देत असे. दोन वर्षांत तो त्या कामांत बराच तरबेज झाला. अलीकडे तो समुद्रांत

एकटाच जहाज हांकारूं लागला होता. कधीं कधीं तो मोहनेला घेऊन दोन चार मैलांची पाण्यावरची सफर करून येत असे. अशा रीतीनें जरी त्याच्या नवीन आयुष्यक्रमाला सुरुवात झाली होती, तरी त्याला घरची आठवण नेहमीं होत असे. दोन चार महिन्यांनीं त्याला घेऊन सुभानजी कुलाब्यास येत असे. पहिल्या तीन चार खेपेस सुभानजी त्याच्याबरोबर होता, परंतु पुढें तो एकटाच कुलाब्यास जाऊं येऊं लागला. ह्या दोन अडीच वर्षांत सात आठ वेळां सांवळ्या कुलाब्यास गेला. परंतु एकदांच त्या बहिणभावंडांची ओझरती भेट झाली. सांवळ्या घरांत येऊं नये, ह्मणून सरूनें पक्का बंदोबस्त करून ठेविला होता. आपल्या मुलाचा तिला इतका तिट्कारा यावयाला काय कारण असेल तें तिचें तिलाच ठाऊक ! सांवळ्या जेव्हां जेव्हां कुलाब्यास येई, तेव्हां तेव्हां तो बराच वेळ आपल्या आईच्या दुकानासभोंवतीं घिरट्या घाली. एक वेळ देखील सरूनें त्याला जवळ बोलाविलें नाहीं. उलट कमळजा जर जवळपास असेल तर ती त्याच्या दृष्टीस पडूं नये ह्मणून तिला ती घरांत घालवून देत असे. अशा रीतीनें बराच वेळ घिरट्या घालून झाल्यावर बिचारा सांवळ्या वाड्यांत जाऊन तुकोजीजवळ बसे.

असो. आज सुभानजीजवळ सांवळ्या बसला असतां त्यानें कुलाब्यास जाण्याची गोष्ट काढिली. तेव्हां सुभानजी ह्मणाला, " तुझी इच्छा आहे तर जा. मी कुठें नको ह्मणतों ! पण तुझ्या जाण्याचा कांहींएक उपयोग नाहीं. आजपर्यंत तूं आठ दहा वेळां गेलास. पण एकदां तरी तुला आईनें जवळ केलें काय ! "

इतक्यात शंभू गोंधळी लंगडत लंगडत तेथें आला.

" राम राम सुभानदादा, काय ह्मंगता मग, बसूं या कीं, आज थोडा वखुत ! चांदनबी लख्ख पडलिया. तवां ह्मंगलं बसूं या महाराजांच गून गात थोडा बखुत ! "

" ठीक आहे; बसूं थोडा वेळ. हीं पोरंहि ऐकतील आणि ह्या सांवळ्यानें तर केव्हांपासून तुझे पोवाडे ऐकण्याचा छंद घेतला आहे. पण कायरे शंभू, तुझा पाय कसा आहे आतां ? "

" वाईच बरा हय की. पन घरामधीं बसूनशान करमना बगा, अक्षी जीव कंटाळला, तवां ह्मंगलं चला सुभानदादाकडं ! "

असें ह्मणून शंभू उठला. आणि आपलें हत्यार आणण्याकरितां घराकडे लंगडत लंगडत परत जाऊं लागला. शंभू हा महाराजांच्या सैन्याबरोबर अनेक मोहिमी फिरला होता. जयपूरचा मिर्झाराजा जयसिंग

१ महाराजांनीं आपल्या आरमाराच्या साहाय्यानें मक्केस जाणाऱ्या मोंगल व मुसलमान यात्रेकरूंचीं जहाजें पकडून लुटण्याचा धूमधडाका चालविला. तेव्हां औरंजेब बादशहास अतिशय संताप आला. आपल्या धर्माविरुद्ध अशी आगळीक करणाऱ्याचा एकदम नाश करून टाकावा असा निश्चय करून मिर्झाराजा जयसिंग आणि दिलेरखान यांस इ. स० १६६५ त दिल्लीहून पाठविलें. जयसिंगाबरोबर ऐंशी हजार फौज असून तींत चांगले कडवे व कसलेले शिपाई होते. आणि तो स्वतःहि मोठा हुषार योद्धा होता. जयसिंगासारख्या दक्ष, चाणाक्ष व युद्धकर्मांत कसलेल्या वीरापुढें आपला कांहींएक हुन्नर चालणार नाहीं अशी महाराजांची खात्री होती. तेव्हां पुढें काय करावें, ह्या विचारांत महाराज असतो त्यांच्या अंगांत देवी संचारली व तिनें असें सांगितलें कीं, " अरे बाळा, ह्यावेळीं प्रसंग मोठा दुर्धर आहे. जयसिंगाचा पराभव तुझ्या हातून होत नाहीं. त्यांस तुला भेटावें लागेल, आणि दिल्लीस बादशहाचे भेटीस जावें लागेल. तेथें कठीण प्रसंग प्राप्त होईल. पण मी तुजसमागमें संरक्ष-

याच्या विश्वासावर महाराज दिल्लीस जाण्यापूर्वी त्याच्याबरोबर आलेल्या दिलेरखान सरदारानें पुरंदर किल्ल्यास वेढा घातला होता. त्या झटापटींत शंभू गोंधळ्याच्या पायावर मोठी जखम झाली. पुढें महाराज दिल्लीस गेल्यावर शंभू आपल्या घरीं आला होता. त्यानें आपल्या आंगच्या गुणांनीं पुष्कळ सरदारांकडून बक्षिसें मिळविलीं. होतीं. शास्ताखान--बादशहाचा मामा--पुण्यांत छावणी देऊन राहिला असतां महाराजांनीं शहरांतून वाजत गाजत लग्नसमारंभ आहे असें सांगून वरात काढली. त्या वरातींत शंभूनें आपल्या पोंवाड्यानें प्रत्येकाला स्फूर्ति आणून महाराजांचीं काढलेली वरात यशस्वी केली होती.

णास येतें. तुला संकटांतून सोडवून पुनः स्वराज्यास घेऊन येतें. राजा, तुला विजयी करीन. याविषयीं तूं अणु मात्र चिंता करूं नकोस." ही सगळी वाक्यें चिटणीस व वांकनीस यांनी लिहून ठेविलीं, व महाराज सावध झाल्यावर त्यांना वाचून दाखविलीं.

२. दिल्लीहून महाराजांनीं आपली सुटका कशी केली ती सर्व हकीकत बहुश्रुत आहेच.

३ दिलेरखान ह्या सरदारास जयसिंगाबरोबर, तो हिंदु असल्यामुळें महाराजां-बरोबर मिलाफी होईल त्यावर नजर टेवण्याकरितां औरंगजेबनें मुद्दाम पाठविलें होतें. पुढें जयसिंगानें महाराजांबरोबर तह करून त्यांना दिल्लीस नेण्याचें ठरविलें. परंतु ही गोष्ट त्याला पसंत पडली नाहीं. त्यानें महाराजांच्या पुरंदर किल्ल्याला वेढा दिला. ह्या किल्ल्याचा हवाला मुरार बाजी नांवाच्या सरदाराकडे होता. त्यानें लढतांना आपल्या शौर्याची अगदीं शिकस्त केली. त्यानें खानाचे लोकांना कैक वेळां पळावयास लाविलें. परंतु खानाजवळ सैन्याचा भरणा मोठा असल्या-मुळें त्याचा इलाज चालेना. तरी तो पुरुषसिंह मोठ्या आवेशानें लढत होता. त्याच्याविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं, त्याचें शिर तुटल्यावर नुसत्या कबंधानें कित्येक यवनांची कत्तल उडविली.

त्यावेळीं महाराजांनीं आपल्या मंडळीला जीं बक्षिसें वांटलीं त्यांत शंभूला शेलापागोटें मिळालें होतें.

असो. थोड्या वेळानें शंभू आपलें तुणतुणें आणि कडें घेऊन आला. त्याच्या हातांत कडें पाहतांच खाडींतील बरीच मंडळी त्याच्यासभोंवतीं गोळा झाली. थोड्या वेळानें सर्व साज जमल्यावर शंभूनें पोवाड्याला सुरुवात केली—

माझें गायन आधीं गणा। सकळिक ऐका चित्त देउन ॥ नमियेली सारजा। त्याली जडिताचें भुषण ॥ अज्ञान दासाचें वचन। नमिला सद्गुरु नारायण ॥ सद्गुरुच्या प्रसादें संपूर्ण अंबेचें वरदान ॥ गाईन वजिराचें भांडण। भोंसल्या सरजा दलभंजन ॥ फौजेवर लोटतां। यशवंत खंडेश्वरी प्रसन्न ॥ अज्ञानदास बोले वचन। गाईन राजाचें भांडण ॥ देश इलाइत। काबिज केलें तळ कोंकण॥१॥ (ऐतिहासिक पोवाडे)

अशा रीतीनें मध्यरात्र होईपर्यंत शंभूनें बरेच पोवाडे म्हणून मंडळीचें मनोरंजन केलें.

---

१ चाल—सांग सखे सुंदरी। कोण्या ग सुभागाची मदनमंजरी ॥
२ गणपतीस. ३ शारदा, सरस्वती. ४ वि. विस्तारांत 'अभिनदास' असें आहे. ५ अबदुल्लखान हा विजापुरकराचा वजीर होता. ६ सिंह. शिवाजीस 'सरजा' म्हटलेलें पुष्कळ प्राचीन लेखांत आढळतें. ७ सैन्य फोडणारा. ८ शिवाजीचे. ९ म्लेच्छ देश. १० वि. विस्ताराच्या १८७३च्या १० व्या अंकांत या पोवाड्याचा आरंभ असा आहे:-" सकळा देव आदीदेवू शिव नमन धरूनी भावू। जैसा शिवाजीचा भावू कलिमधीं प्रगम महादेवू। सांबाचा अवतार छत्रपती राजा शिवू शिवाजीच्या तळ्यां पाणी पिती सर्व जीवू। पाणी पूर्ण पीकले न्हावू भाकेंत गुंतला महादेवू। रायगडसारिखा जैसा देवें दिला ठावू। रगतगड रोपला आवळी प्रतापगड मंडण। सोनयासहीत्या राजगडावरी सुवर्ण। गड हुडा दुर्ग बांधले भाग मी राज्याचे गाईन ॥ १ ॥"

दुसऱ्या दिवशीं सांवळ्या कुलाब्यास गेला. परंतु आईनें त्याची भेट घेतली नाहीं किंवा कमलजेलाहि त्याला भेटूं दिलें नाहीं. एक दोन वेळां तुकोबानें स्वतः जाऊन सरूची समजूत करण्याचा प्रयत्न केला, परंतु तिनें 'सांवळ्या माझा मुलगा नाहीं किंवा मी त्याची आई नाहीं' असा जबाब दिला. तेव्हांपासून त्यानें तिचें नांव टाकलें. आईच्या विशीवर टेहळणी करून कंटाळल्यावर सांवळ्या वाड्यांत आला. त्याच वेळीं कुर्ला प्रान्तांतील मुमंताकडून एक जासूद खलिता घेऊन वाड्यांत आला होता. महाराज दिल्लीस गेल्यानंतर कोंकण प्रांतावर फिरंगी आणि शिद्दी यांचा पुनः सुळसुळाट झाला होता. ते बेधडक गांवांत शिरून बायकामुलें धरून गुलाम म्हणून विकूं लागले. कुर्ल्याच्या सुमंतानें जासुदाबरोबर खलिता पाठविला. त्यांत हीच हकीकत होतीः—"फिरंग्यांनीं कुर्ला प्रांतांत शिरून कांहीं ब्राह्मण व इतर मिळून वीसबावीस लोक पकडले आहेत. आणखी पकडण्याची त्यांची खटपट चालू आहे. गांवांतील लोक घराबाहेर पडण्यास धजत नाहींत, करितां ठाण्यावरून त्याचा बंदोबस्त व्हावा व आमच्या कुमकेला आरमार पाठवावें."

खलिता वाचून वाड्यांतील जबाबदार मंडळी एकत्र बसून विचार करूं लागली. त्यावेळीं मुंबई बंदरांत एकहि आरमार नव्हतें असा चमत्कारिक तो वेळ होता! शेवटीं वाड्यांतील सात आठ मंडळी जहाज घेऊन जाण्यास सिद्ध झाली. त्यांत तुकोबानें सांवळ्यालाहि घेतलें. तेव्हां सांवळ्याला किती तरी आनंद झाला! महाराजांच्या आरमारावरील तांडेल म्हणवून घेण्यास तो फारच उत्सुक झाला

होता, इतका त्याला महाराजांचा अभिमान होता. अशा रीतीनें जहाजावर जाण्याचा त्याचा हा पहिलाच प्रसंग होय. थोड्याच वेळांत जहाज तयार करून त्यावर युद्धोपयोगी सामान भरलें. वाड्यांतील एक तोफहि जहाजावर चढविली. त्या जहाजावर एकंदर दहाजण होते. शीड वर करतांच तुकोबा सांवळ्याला म्हणाला, "सांवळ्या, आज तीन वर्षें तूं सुभानजी नाईकाजवळ आहेस. आतां पाहतों तुझी जहाजावरील कितपत तयारी आहे ती ?"

सांवळ्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपणाला जें करावयाचें तें करून दाखवावें, बोलून दाखवूं नये, असा त्याला त्याच्या गुरूचा उपदेश होता. संध्याकाळच्या सुमारास त्यांचें जहाज माजगांवच्या खाडींत आलें. तेथें फिरंग्याच्या जहाजाची आणि त्यांची गांठ पडली. शत्रूचें जहाज पाहतांच थोड्या अवकाशांत आपल्या जहाजावरील व्यवस्था करून तुकोबानें तोफ डागण्यास सांगितलें. त्याबरोबर एक तांडेल पुढें झाला. तो तोफ डागणार इतक्यांत तो थोडा चुकत आहे असें पाहून सांवळ्याला गप्प राहवेना. तो पुढें होऊन म्हणाला, " थांबा, थांबा. अशी डागून तोफ फुकट जाईल. मजजवळ द्या, मी बरोबर दिशेंत डागतों. "

एवढ्याशा पोरानें आपली चुकी काढावी हें त्या तांडेलाला खपलें नाहीं. त्यानें सांवळ्याला रागानें बाजूला ढकललें. परंतु हा सर्व प्रकार तुकोबा पहात होता. तो म्हणाला, " डागूं दे त्याला ! तो पोर तोफ कशी डागतो तें तरी पाहूं. गेली फुकट तर गेली ! हुं— सांवळ्या आटप—"

सांवळ्यानें तोफेची दिशा किंचित् फिरवून तिला डाग दिला. त्याबरोबर जवळचें पाणी उंच उसळलें आणि फिरंग्यांच्या जहाजाला बरोबर मध्यमागीं भोंक पडलें! तें पाहून जहाजावरील प्रत्येकाला, त्यांतल्या त्यांत तुकोबाला तर विशेष आनंद झाला. पुनः दारूगोळा भरून तोफ तयार होईपर्यंत शत्रूचें जहाज बरेंच जवळ आलें. त्यांच्या जहाजाला भोंक पडल्यामुळें शत्रूची बरीच गडबड उडाली होती, तरी देखील नेटानें त्यांनीं आपलें जहाज मराठ्यांच्या जहाजाला भिडविलें. दोघांचीहि हातघाईवर गोष्ट आली! शत्रूचे लोक पुष्कळ असल्यामुळें त्यांपैकीं बऱ्याच जणांनीं समुद्रांत उड्या टाकून चाऱ्हीं बाजूंनीं मराठ्यांच्या जहाजावर चढण्यास सुरुवात केली. सांवळ्या मोठ्या हिंमतीनें आपली बाजू सांभाळूं लागला. त्यानें थोड्याच वेळांत आपल्या हातांतील शस्त्रानें आठ दहा लोक घायाळ करून समुद्रांत ढकलून दिले. इतक्यांत शत्रूंपैकीं एकानें पाठीमागून त्याच्या हातावर फटका मारून त्याला निःशस्त्र केलें. सांवळ्या मागें वळून पाहूं लागला तों काय! आपणांपैकीं सहाजण पडले असून बाकीचे तुकोबासह तिघे आपणाप्रमाणेंच निःशस्त्र!

मोठ्या शिकस्तीनें फिरंग्यांनीं आपलें फुटकें जहाज नुकतेंच पाडाव केलेल्या मराठ्यांच्या जहाजाला बांधून माजगांवच्या खाडींत आणलें. त्यांच्या जहाजावर कुर्ले प्रांतांतून पकडून आणलेले बावीस पुरुष आणि तीन बायका शिवाय दोन गाड्या मूल्यवान् वस्तूंची लूट होती. त्यांनीं तें सर्व सामान आणि कैदी किनाऱ्यावर उतरविले. आतां जहाज दुरुस्त होईपर्यंत कैदी आणि लूट कोठें ठेवावी हा

त्यांना प्रश्न पडला. तशांत रात्रहि झाली. शेवटीं जवळच असलेल्या देवळांत—रोमन कॅथोलिक चर्चमध्यें—रात्रभर कैद्यांना ठेवण्याचा त्यांनीं विचार केला. तें चर्च खाडीपासून पाव मैलावर असून त्याच्या भिंती तीस पस्तीस फूट उंच होत्या. त्याच्या चाऱ्हीं बाजूला गज लावलेल्या चार मोठ्या खिडक्या आणि पुढून एकच दरवाजा होता. सर्व कैदी नीट व्यवस्थेनें आंत आणल्यावर एका कोंपऱ्यांत त्यांनीं लुटीचें सामान आणून ठेविलें. नंतर पाहऱ्याची व्यवस्था करून कांहींजण पुनः जहाज दुरुस्त करण्याकरितां गेले. इतका सर्व विधि होईपर्यंत आमचा कथानायक कांहीं गप्प बसला नव्हता. त्यानें पळून जाण्यास कोठें मार्ग आहे किंवा नाहीं, प्रत्येक खिडकीखालीं किती जणांचा पाहरा आहे, त्यांच्या लुटींच्या सामानांत काय काय मूल्यवान् जिनसा आहेत वगैरे सर्व तपास केला.

" सांवळ्या, काय सांगू रे तुला, प्रसंग मोठा बिकट आला आहे ! फिरंग्यांचें जहाज दुरुस्त होईपर्यंत जर आपणांस कुमक आली किंवा आपण येथून पळण्याचा मार्ग शोधून काढला तरच आपली सुटका होईल. नाहीं तर सांवळ्या, प्रसंग मोठा—मोठा कठीण आहे ! ! " कुर्ले प्रान्तांतील कपाळावर हात देऊन बसलेल्या कैद्यांत निराश होऊन बसलेला तुकोजी ह्मणाला.

" मदत येणं तर शक्य नाहीं. आपणच जर कांहीं हातपाय हालवूं तर ! " सांवळ्या ह्मणाला, " पण तुकोजीबाबा चकमक आहे कां तुमच्याजवळ ! "

"अरे सांवळ्या, कसली चकमक घेऊन बसलाहेस! कायरे सांगूं तुला पोरा, झिलिमीसाठीं तर जीव वेडा झाला आहे, पण आतां—" तुकोबाच्या तोंडून अगदीं निराशेचे उद्गार बाहेर पडले!

सांवळ्यानें बाकीच्या कैद्यांजवळ चकमक आहे काय म्हणून शोध केला. सुदैवानें एकाजवळ चकमक मिळाली. तें पाहून तुकोबाला आनंद झाला. आतां सांवळ्या कोणाजवळून तंबाखूहि मिळवील असें त्याला वाटलें. परंतु सांवळ्याचा कांहीं निराळाच उद्योग सुरू होता. त्यानें सर्व कैद्यांना जवळ बोलाविलें आणि विचारलें, "सध्यां आपण संकटांत सांपडलों आहोंत. आज रात्रीं जर आपण येथून सुटका करून घेतली नाहीं, तर उद्यां हे फिरंगी दूर देशांत आपणांस नेऊन गुलाम म्हणून विकतील. तेव्हां तुमची काय इच्छा आहे? येथेंच राहून गुलाम व्हावयाचें किंवा येथून पळून जावयाचें?"

सर्वांनीं तत्काळ पळून जाण्यास आपली संमति दिली. गुलाम होण्यापेक्षां स्वातंत्र्याकरितां जीव गेला तरी पतकरला असें प्रत्येकाचें म्हणणें पडलें! प्रत्येकजण अनुकूल आहे असें पाहून सांवळ्या म्हणाला, "बरें तर, माझा विचार काय आहे तो मी सांगतों. आपण एकंदर तीसजण आहोंत. परंतु आपणांस फक्त आपली सुटका करून घेऊन चालावयाचें नाहीं. हें येथें आपल्या प्रान्तांतून फिरंग्यांनीं लुटून आणलेलें महाराजांचें मूल्यवान् सामान आहे, तें देखील आपणास बरोबर नेलें पाहिजे. बाहेर प्रत्येक खिडकीखालीं दोन दोन पाहरेकरी असून दरवाजावर पांचजण आहेत. तेव्हां प्रत्येकानें नेववेल तितकें सामान त्या मागच्या खिडकीजवळ नेऊन तयार

असलें पाहिजे. आह्मी हीं येथें कोपऱ्यांत पडलेलीं जुनीं लांकडें दरवाजाजवळ रास करून आग लावून देतों. आग चांगली पेटतांच आपण सर्व एकदम मोठ्यानें दरवाजाजवळ ओरड करूं, ह्मणजे सर्व पाहरेकरी दरवाजाजवळ येतील; तोंच सात आठ जणांनीं मिळून मागची खिडकी उखळून काढावी. प्रथम ह्या नायका सुरक्षित बाहेर घेऊन महाराजांचें हें सामान बाहेर घ्यावें आणि देवळाला मागून वळसा देऊन डाव्या बाजूनें आपलें जहाज गांठावें. ”

सांवळ्याची ही सरळ युक्ति ऐकून खात्रीनें ती सफल होईल असें प्रत्येकाला वाटूं लागलें. तुकोबा मुकाट्यानें कोपऱ्यांत बसून हें त्याचें भाषण ऐकत होता. त्याला सांवळ्याची ही बुद्धिमत्ता पाहून आनंद झाला. इतका वेळ तो अगदीं निराशेनें बसला होता. तोच आतां सांवळयाची युक्ति ऐकून खाड्‌कन् उठला. थोड्याच वेळांत आमच्या नायकानें योजलेली युक्ति अमलांत आणण्याची सुरुवात झाली. सर्व तयारी अगदीं मुकाट्यानें होऊन सांवळ्यानें इतर मंडळीच्या साहाय्यानें लांकडें पेटविण्यास सुरवात केली. थोड्याच अवकाशांत आगीचा भडका झाला. तोंच एकदम ‘आग, आग’ असा त्या मंडळीनें एकच हलकल्होळ उडविला! तेव्हां सांवळ्यानें भाकीत केल्याप्रमाणें खिडकीजवळचे पाहरेकरी दरवाजाजवळ येतांच आंतील मंडळींनी खिडकीवर हल्ला करून क्षणांत आपला मार्ग मोकळा केला. तो मोठा आणीबाणीचा वेळ होता. नायकांना बाहेर काढून बाकीची मंडळी लुटीचें सामान घेऊन पटापट बाहेर उड्या

मारूं लागली. फिरंग्यांची एकच त्रेधा उडाली. इतक्या श्रमानें मिळविलेली लूट प्रथम आगींतून बाहेर काढण्याची त्यांची आरीनें खटपट चालली होती. आगीच्या उंच ज्वाला दिसतांच व त्यांची ओरड ऐकून खाडींत जहाज दुरुस्त करण्यांत गुंतलेले सर्व लोक हातांतील काम टाकून देवळाजवळ धांवत आले. तितक्या वेळांत आमचा कथानायक दुसऱ्या बाजूनें आपल्या मंडळीसह सुरक्षितपणें जहाजावर आला.

"ठेवा तें सामान आपल्या जहाजावर, आणि येथें या. ह्या फिरंग्यांच्या जहाजावर काय आहे तें पहा, लुटा आणि टाका बुडवून त्यांचें जहाज !" सांवळ्याला मोठा उत्साह आला होता. त्याचा हुकूम ऐकतांच फिरंग्याचें जहाज लुटण्यास आरंभ झाला. हां हां म्हणतां फिरंग्यांचें जहाज लुटून बुडविण्यास सुरुवात झाली !

पाठलाग होण्याची त्यांना आतां बिलकूल भीति नव्हती. थोड्या वेळानें त्यांचें जहाज मोठ्या डौलानें खाडींतून जाऊं लागलें. आपण शेवटीं जिंकलों हें दाखविण्याकरितां जहाजावरून 'श्रीशिवाजी महाराज की जय' असा मंगल जयघोष सुरू झाला. त्याच्या जहाजावर पंचवीस हजारांवर लुटीचें परत मिळविलेलें महाराजांचें सामान आणि शिवाय फिरंग्यांच्या जहाजावरील सर्व दारूगोळा आणि शत्रूंच्या एकशेंसाठ बंदुका होत्या. सूर्योदयाच्या सुमारास जहाज कुलाब्याच्या किनाऱ्यावर आलें. सर्व मंडळी वाड्यांत येतांच सांवळ्याच्या साहसाची गोष्ट हां हां म्हणतां सर्वत्र वाऱ्यासारखी पसरली. जो तो त्याच्या अचाट साहसाची प्रशंसा करूं लागला. फिरंग्यांच्या

ह्यातून सोडविलेल्या बायकांत जनाबाई नांवाची तीस पस्तीस वर्षांची एक स्त्री होती. तिनें प्रेमभरानें सांवळयाच्या तोंडावरून हात फिरवून आपल्या कानशीलावरून कडाकड बोटें मोडिलीं. आणि त्याला अवळ घेऊन ती ह्मणाली, "बाळा, आमच्यावर तूं जे उपकार केले आहेस, त्याची फेड आमच्याकडून कधींहि व्हावयाची नाहीं; तरी मी मात्र तुला मरेपर्यंत विसरणार नाहीं. मी आतां ह्या मंडळीबरोबर परत कुर्ल्यास जाईन, पण तूं कधीं चेऊलच्या खाडींत आलास तर मला भेटल्याशिवाय राहूं नकोस."

सांवळ्यानें तिचें ह्मणणें कबूल केल्यावर ती पुढें ह्मणाली, "जा बाळ, अशींच परोपकाराचीं कामें करण्यास तुला ईश्वर दीर्घायुषी करो!"

त्या दिवशीं सांवळ्यानें दाखविलेलें साहस आणि त्यानें योजलेली युक्ति पाहून तुकोबानें सांवळयाविषयीं खूणगांठ मारून ठेविली. सांवळया हा असामान्य धीराचा आणि युक्तिवान् आहे. त्याला महाराजांच्या आरमारावर असामी मिळाली तर तो खात्रीनें नांवलौकिकास चढेल अशी त्याला खात्री वाटूं लागली.

---

# प्रकरण ७ वें.

## आरमारावर असामी.

आपल्या साहसानें सांवळ्यानें सर्वांना थक्क करून सोडलें, यांत शंका नाहीं. कुल्यांच्या सुमंतानें सर्व हकीकतांचें पत्र लिहून पंत सचीवाकडे पाठविलें. त्यांत सांवळ्यानें केलेल्या कामगिरीची माहिती होती. परंतु वाडयांतून तुकोबाचें जें पत्र गेलें, त्यांत त्यानें स्वतः पाहिलेली सांवळ्याच्या धाडसाची आणि कल्पकतेची इत्थंभूत हकीकत होती. त्यावेळीं महाराज रायगडास होते. त्यांना वरील पत्रांतील हकीकत सचिवाकडून कळल्यावर आमच्या बाल तांडेलाविषयीं कौतुक वाटलें. थोडयाच दिवसांत त्यांच्याकडून सांवळ्याला शंभर मोहोरांचें इनामपत्र आणि मायनाक सरदाराच्या आरमारावर तांडेलाची असामी सांगून आली.

आपणास महाराजांनीं इनाम आणि असामी दिली हें सांवळ्याला कळतांच अत्यंत आनंद झाला. सुमानजीनें त्याला आपल्या घरीं आणतांना, त्याच्या चुणचुणीतपणाविषयीं तुकोबानें अनेक गोष्टी त्याला सांगितल्या होत्या. त्याचवेळीं सुमानजीनें सांवळ्याविषयीं शकुनगांठ मारिली होती कीं, पुढें मागें हें पोर खात्रीनें चांगलें रंगारूपास चढेल. त्याची सत्यता पटविण्याकरितांच कीं काय, सांवळ्यानें गेल्या प्रकरणांत वर्णन केलेलें धाडस करून महाराजांकडून इनाम

आणि असामी मिळविली. थोड्या दिवसांनीं सांवळ्याचें इनामपत्र आणि असामीचें आज्ञापत्र घेऊन तुकोबा सुभानजीकडे आला. परस्परांचे कुशल प्रश्न झाल्यावर सांवळ्याला जवळ ओढून तुकोबा म्हणाला, " काय सांगूं रे सांवळ्या, येथें येण्यापूर्वीं हीं महाराजाकडून आलेलीं दोन पत्रें घेऊन मी तुझ्या आईला मुद्दाम जाऊन भेटलों. आणि तिला त्या दिवसाची सर्व हकीकत सांगितली, परंतु त्यापासून तिला बिलकूल आनंद झालेला दिसला नाहीं. उलट ती मला म्हणाली, " त्या कारट्याला इनाम मिळालें काय आणि मोठी सरदारी मिळाली काय, मला अगदीं सांगूं नका. " इतकेंच म्हणून ती थांबली नाहीं–"

"पण कायहो तुकोबा, हें तरी आश्चर्य नाहीं का ? आपल्या मुलाचा इतका गौरव झालेला पाहून आईला आनंद होत नाहीं, तेव्हां त्या आईला, आई तरी कसं म्हणावं ?" सुभानजी मध्येंच म्हणाला. "आणि राव पुढें तर ऐका–" तुकोबा म्हणाला, "काय सांगूं राव तुम्हांला, पुढें ती कपाळाला आंठ्या घालून म्हणाली, 'त्या मेल्या खलाशाला एकदां इनाम मिळालें म्हणून मी त्याच्यावर भाळलें आणि त्याच्याबरोबर लग्न करून हा जंजाळ मात्र मागें लावून घेतला.' काय समजलास सांवळ्या, हे तुझ्या आईचे शब्द बरं !"

सांवळ्याला अतिशय वाईट वाटलें. वाचकहो, सांवळ्याला इनाम आणि असामी मिळाली हें ज्याला ज्याला कळलें, त्या प्रत्येकाला आनंद झाला, परंतु त्याच्या आईला त्याविषयीं आनंद न होतां उलट विषाद वाटावा हें ऐकून त्याला कां बरें वाईट वाटूं नये ! एखादा

वेडा, कुरूप किंवा व्यंगी जरी मुलगा असला तरी तो आईला प्रियच असतो. असें असतां आमचा कथानायक चांगला सदृढ, सुंदर, साहसप्रिय आणि प्रत्येकाच्या प्रेमाला लायक असतां तो आईला आवडूं नये हा चमत्कार नव्हे काय ! सांवळ्यासारखा पुत्र पोटीं येण्यास आईनें पूर्वजन्मीं चांगली जोड करून ठेविली पाहिजे. तेव्हांच ती असें पुत्ररत्न प्रसवणार ! असो. सांवळयाला आईबापांपासून कांहींच सुख नव्हतें. आई त्याचा कंटाळा करीत होती. बापानें तर मुलांना वाऱ्यावर सोडून दिलें होतें. अशी वस्तुस्थिति जरी होती, तरी तुकोबानें सांवळयाच्या मनांत आपल्या आईबापांविषयीं बिलकुल तिरस्कार उत्पन्न होऊं दिला नाहीं. नुकतीच आपण सांगितलेली त्याच्या आईची हकीकत ऐकून सांवळ्याला वाईट वाटलेलें पाहून तो ह्मणाला, " सांवळ्या अशा वेळीं तुला वाईट वाटणें अगदीं योग्य आहे. पण कायरे सांगू तुला, अशा आईची प्रीति संपादन करण्यास तुला असंच नांव मिळवीत गेलं पाहिजे. आणि कांहीं जरी झालं, तिनें कितीहि जरी तिरस्कार केला तरी ती तुझी आई आहे हें लक्षांत ठेव. नऊ मास तिनें तुझ्याकरिता कष्ट सहन करून मर्मांतक वेदना सहन केल्या आहेत, याची तुला सदोदित आठवण असली पाहिजे. तुझ्या आईला जरी आनंद झाला नाहीं तरी तुझ्या धाकट्या बहिणीला मात्र खराखरा आनंद झालेला दिसला. तिच्या मनांतून तुझ्याविषयीं सर्व हकीकत मला विचारावी असें होतें, पण आई जवळ असल्यामुळें तिचा इलाज चालेना."

आपल्या बहिणीला आनंद झाला हें ऐकून सांवळ्याच्या दु:खी

मनाचें समाधान झालें. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर सुभानजीनें मोहनेला खूण करून सांवळ्याला नेण्याकरितां सांगितलें. थोड्या वेळानें तीं मुलें उठून नेहमींप्रमाणें समुद्रकिनाऱ्यावर गेलीं. तेथें गेल्यावर मोहनेच्या आग्रहावरून सांवळ्यानें आपली आवडती ल्हान नाव पाण्यांत ढकलली !

मुलें उठून गेलेलीं पाहून सुभानजी ह्मणाला, "तुकोजी, आज फार दिवस झाले, माझ्या मनांत एक गोष्ट घोळत आहे. ती तुह्मांला सांगावी व तुमचें मत घ्यावें अशी माझी फार इच्छा आहे, काय समजलां ! आपल्या सांवळ्याविषयीं बोलावयाचें म्हणजे तें तुमच्याजवळ. आई तर त्याला विचारीत नाहीं, आणि त्याच्या बापाचा कांहीं पत्ता नाहीं. तेव्हां तुह्मी व आह्मी मिळून काय तो विचार करूं. काय समजला ! यदाकदाचित् त्याचा बाप परत आला तर तुह्मी सांवळ्याच्या हिताविषयीं जी गोष्ट कराल ती त्याला पसंत पडेल अशी माझी खात्री आहे. माझी मोहना तर तुह्मी पहातच आहांत, काय समजलां ! शिवाय ती कोणा तरी थोर आईबापांची आहे असें देखील तुह्मी ह्मणालां होतां. मला तरी आतां तिच्याशिवाय दुसरें कोण आहे ! हें घर, हीं मालकीचीं दोन जहाजें आणि आहे जवळ थोडीशी पुंजी, ही सर्व तिचीच आहे—"

"होय. आतां आलें लक्ष्यांत तुह्मी काय ह्मणतां तें ! " तुकोबा ह्मणाला, "काय सांगूं राव तुह्मांला, माझ्याहि मनांत तेंच होतें. मधां मी त्या दोघांना तुमच्याजवळ एकत्र पाहिल्यावर- -"

"काय ह्मणतां ! आहे तर एकूण तुमच्या मनांत ! "

ह्याच विषयावर बराच वेळ त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. सांवळ्या आपल्या आंगच्या हुशारीनें लवकरच महाराजांच्या आरमारावर मुख्य तांडेलहि होईल असें त्यांना वाटूं लागलें. दोन चार वर्षांत तो दुय्यम प्रतीचा तांडेल झाल्यावर त्याचें मोहनेबरोबर लग्न करावें असा त्या दोघां हितचिंतकांनीं विचार केला. त्यांचा हा विचार ज्या आमच्या कथानायकाविषयीं चालला होता, तो आपल्या भावी पत्नीसह आनंदानें नावेंत बसून त्यावेळीं सहल करीत होता. घरीं आपणाविषयीं काय गोष्टी चालल्या आहेत, याची त्या दोघांना कल्पनाहि नव्हती.

" सांवळ्या, आतां तूं येथून आपल्या असामीवर गेलास म्हणजे माझी किंवा बाबाची तुला आठवण तरी होईल कायरे ! "

" वाः कां नाहीं होणार ? मी एकदां येथून आपल्या महाराजांच्या आरमारावर गेल्यावर इकडे कधीं येणारच नाहीं असं का तुला वाटतें मोहने ! आमचं आरमार ह्या खाडीला आल्यावर मी दुसरीकडे कुठें जाणार ! "

" तें खरंच ! पण सांवळ्या, तूं परत कधीं तरी घरीं येशील, तेव्हां येतांना कायरे आणशील मजकरितां ! "

" काय आणूं ? तूं सांगशील तें आणीन. "

" वाः रे वाः ! मी सांगून का तूं आणणार ! मग रे काय उपयोग ! "

" बरं तर मग, तुला जें अत्यंत प्रिय होईल, तेंच घेऊन येईन. मग तर झालं ? " किंचित् काळ विचार करून सांवळ्या म्हणाला.

संध्याकाळ झालेला पाहून सांवळ्यानें आपली नाव परत फिरविली. ते दोघे परत आले तरी तुकोबा आणि सुभानजी गोष्टी बोलत बसले होते. रात्रीं जेवण आटोपल्यावर सांवळ्या जाण्याच्या तयारीला लागला. मधून मधून मोहनाहि त्याला मदत करीत होती. थोड्या वेळानें त्यांना कुलाब्यास नेण्याकरितां ठरविलेल्या मचव्याचा नावाडी आला. तेव्हां सुभानजी आणि मोहना यांचा निरोप घेऊन सांवळ्या जावयास निघाला. तें पाहून मोहनेच्या डोळ्यांतून पाणी आलें. आजपर्यंत तीन वर्षें ते एकत्र असतां मध्यंतरीं कैक वेळां सांवळ्या कुलाब्यास गेला होता, त्यावेळीं एकदांहि मोहनेला इतकें वाईट वाटलें नव्हतें. आणि आजच तिच्या डोळ्यांतून पाणी कां यावें ! हें प्रेमाचें चिन्ह आहे काय ? आतांच ह्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. असो. थोड्या वेळानें तिची समजूत करून सावळ्या जड अंतःकरणानें तुकोबाबरोबर निघाला.

उषःकालच्या सुमारास त्यांचा मचवा कुलाब्यास सुरक्षितपणें येऊन पोंचला. त्यावेळीं बहुतेक सर्वत्र सामसूम होती. एखाद्या झोंपडीजवळून जातांना क्वचित् ठिकाणीं जात्याचा घर्र घर्र असा आवाज मात्र ऐकूं येत होता. ते दोघे वाड्याजवळ येतांच एक मनुष्य झट्कन् वाड्यांत शिरतांना त्यांच्या दृष्टीस पडला. इतक्या पहांटेस वाड्यांत जाणारा कोण असावा हें पाहण्याच्या उद्देशानें तुकोबानें दरडावून विचारलें, " कोण रे तो ! उभा रहा. "

" मी मुरारी. " तुकोबाचा आवाज ऐकतांच नाइलाजास्तव मुरारी उभा राहिला.

" कोण मुरारी ! आणि इतक्या सकाळीं वाडा सोडून गेला होतास कुठें ? "

" खाडींत—गेलों—गेलों होतों जरा—"

" होय समजलों, पण कां—वाड्यांत जागा नाहीं ! " रागानें तुकोबानें विचारलें.

" आहे—पण—मी—"

" आहे, मग वाड्याबाहेर जाण्याचें कारण काय ? हुकुमाशिवाय रोग्यानें वाड्याबाहेर जाऊं नये हें तुला ठाऊक नाहीं काय ? पुनः जर गेलास तर वाड्यांतून जावें लागेल हें लक्षांत ठेव. जा. "

मुरारी वाड्यांत निघून गेल्यावर तो कोण असें सांवळ्यानें तुकोबाला विचारलें. तेव्हां तो म्हणाला, " हा वाड्यांत एका महिन्यापूर्वी आलेला एक रोगी आहे. तो सांगतो कीं, मी महाराजांच्या लष्करांत आहें. पण काय सांगूं सांवळ्या तुला, अलीकडे मला त्याचा संशय येऊं लागला आहे. "

सावळ्यानें त्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. क्षणभरानें मुरारीबद्दल सर्व गोष्टी तो साफ विसरला. त्याच्या मनांत निरनिराळे विचार येत होते. आज येथून असामीवर रुजूं होण्याकरितां जाण्यापूर्वीं कमलजेची हरप्रयत्नानें भेट घ्यावयाची असा त्याचा विचार चालला होता. त्याप्रमाणें तो तुकोबाला विचारून सकाळीं घरीं जाण्याकरितां निघाला. आपली आणि बहिणीची आज भेट होईल कीं नाहीं, अशी जी त्याला काळजी होती, ती लवकरच दूर झाली. अलीकडे सरूची प्रकृति नादुरुस्त असे. गेल्या दोन रात्रीं तिला

ताप आला होता, ह्मणून कमलजा दुकानांतील व्यवस्था पाहत होती. त्यामुळें तिची भेट होण्यास सांवळ्याला फारशी अडचण पडली नाहीं. भावाला पाहतांच कमलजेला फार आनंद झाला. घटकाभर बहिणभावंडें इतक्या दिवसांच्या हितगुजाच्या गोष्टी बोलत बसलीं. परस्परांनीं एकमेकांची हकीकत सांगितल्यावर कमलजा ह्मणाली, " दादा, त्या दिवशीं तुकोजीबाबा, तुला मिळालेल्या शंभर मोहरा आईला देण्याकरितां आले होते परंतु आईनें त्या घेतल्या नाहींत. नंतर ते निघून गेल्यावर ती किती वेळ तरी एकटीच रडत होती. अलीकडे महिना पंधरा दिवसांनीं ती अशीच एकटी रडत असते. मी तिला पुष्कळ विचारतें, पण मला ती कांहींच सांगत नाहीं. पण दादा, आपल्या बाबाचा कांहीं शोध लागला कां तुला ? "

" कांहीं नाहीं. पण आतां मी लावीन बाबांचा शोध. महाराजांच्या आरमारावर कुठेंना कुठें तरी तो असेलच ! "

नंतर सांवळ्या जावयास निघाला, तेव्हां कमलजेनें दुकानांतून बरेच फराळाचे जिन्नस त्याला बांधून दिले आणि वरचेवर येऊन भेटण्याचें अभिवचन घेऊन त्याला प्रेमाचा निरोप दिला. वाड्यांत आल्यावर त्यानें कमलजेच्या भेटीचें सर्व वृत्त तुकोजीला सांगितलें. तीन वर्षांनीं बहिणीची भेट होऊन घरची सर्व हकीकत कळली ह्मणून त्याच्या जिवाची तळमळ शांत होऊन त्याच्या मनाला बराच उत्साह वाटूं लागला. थोड्या वेळानें त्यानें जाण्याची तयारी केली. मायनाक सरदाराचें आरमार जवळच चेऊलच्या खाडींत आहे असें त्याला वाड्यांत आल्यावर कळलें. तेव्हां त्याला जनाबाईची आठ-

वण झाली. ' चेऊलच्या खाडींत आल्यास आपली भेट घेण्यास विसरूं नये ' असें तिनें सांगितलें होतें, त्याची त्याला चांगली आठवण होती. आरमारावर रुजूं होतांच तिची भेट घेण्याचा त्यानें निश्चय केला.

मायनाक सरदाराचें आरमार बहुतेक कुर्ले प्रान्ताच्या रक्षणा-करितां कुर्ल्याच्या आसपास चेऊलच्या खाडींत असे. सांवळ्या त्या दिवशीं संध्याकाळीं आरमारावर जाऊन पोंचला. तेथें त्यानें आपणास मिळालेलें महाराजांचें आज्ञापत्र सरदारच्या हातीं दिलें. सरदारानें तें आज्ञापत्र वाचून सांवळ्याकडे निरखून पाहिलें. त्याला त्या बालमूर्तीचें फार कौतुक वाटलें. त्यानें क्रमाक्रमानें फिरंग्यांनीं उडविलेल्या दंगलीची हकीकत विचारून घेतली. आमच्या कथा-नायकानें पहिल्याच दिवशीं आपल्या मुख्य तांडेलावर आपली छाप बसविली. सांवळ्याला त्यानें शिडावरचें काम दिलें. वास्तविक तें काम बरेंच अवघड आणि धोक्याचें असें होतें. परंतु सांवळ्याला अशाच कामाची मनापासून आवड ! तीनचार दिवस झाल्यावर जहाजावरील कांहीं खलाशी जहाजावर दाणापाण्याची तरतूद कर-ण्याकरितां गांवांत जाण्याकरितां निघाले. त्यांच्याबरोबर सांवळ्याहि तांडेलाला विचारून निघाला. ह्या दोन तीन दिवसांत सांवळ्यानें जहाजावरील सर्वांचें प्रेम संपादन केलें होतें. तें इतकें कीं, सांवळा ह्या त्यांच्या एक करमणुकीचें साधन होऊन बसला !

गांवांत आल्यावर मनाबाईचा शोध करण्यास सांवळ्याला फारसा वेळ लागला नाहीं. ती बामाराजवळ राहात असे. पांचव्या प्रहर-

ज्यांत वर्णिलेल्या वादळांत अनेक जहाजें फुटून जीं दुर्दैवी माणसें निराधार आणि संकटांत पडलीं, त्यांपैकीं जनाबाई ही एक होती. त्या वादळांत आपलें सौभाग्य हरण झालें असें ती समजत होती. वादळांत सांपडून जीं माणसें घेऊलच्या खाडींत वाहत आलीं, त्यांत ती एक होती. त्यावेळीं ती आपल्या भर तारुण्यांत असल्या-मुळें तिला प्रथम बराच त्रास सोसावा लागला. परंतु ती जात्याच खंबीर मनाची बायको असल्यामुळें गेलीं आठ नऊ वर्षे तिनें त्याच ठिकाणीं मोठ्या अब्रूनें काढिलीं. तिच्या अंगावर हजारबाराशें रुप-यांचे दागिने होते. त्यावर तिनें कांहीं वर्षे गुजारा करून अलीकडे ती बाजाराच्या दिवशीं मुलांच्या कानटोप्या, पैरणी करून विकीत असे. सांवळ्याला तिच्या घराचा पत्ता लवकरच लागला हें वर सांगितलेंच आहे. त्याला पाहतांच जनाबाईला अतिशय आनंद झाला. जणूं काय आपल्याजवळचा एक मायेचा मनुष्य आपणाकडे आला असें सांवळ्याला पाहून तिला वाटूं लागलें. कुशल प्रश्न झाल्यावर तिनें मोठ्या प्रेमानें सांवळ्याला जेवायला ठेवून घेतलें.

" जनाबाई, तुमचा एवढा आग्रह ह्मणून नाहीं ह्मणतां येत नाहीं, पण मला लवकर जहाजावर गेलें पाहिजे. आतां आमची मंडळी बाजारांतून येतील. "

जनाबाईनें त्याला लवकर लवकर वाढलें. इतक्यांत तिच्या शेजारची वृद्ध भीमा तेथें आली. जनाबाईकडे कोणी पाहुणा आला आहे असें तिला कळतांच ती मुद्दाम त्याला पाहण्याकरितां आली होती. कारण आजपर्यंत तिच्याकडे एखादा पाहुणा आलेला तिनें

पाहिला नव्हता. ती दरवाजांत येऊन बसल्यावर जनाबाईनें तिची आणि सांवळ्याची ओळख करून दिली. ती म्हणाली, "मीनाबाई, त्या दिवशीं मी ज्या मुलाविषयीं सांगितलें, तोच हा बरं ! यानेंच आमचे जीव वांचविले. नाहीं तर आज मी कुठें हो असतें !"

थोडा वेळ सांवळ्याकडे पाहून ती म्हातारी म्हणाली, "खरंच जना, याचे आईबाप धन्य होत हो ! नाहीं तर मी पहा. आहे का मला म्हातारीला मुलाकडून कांहीं सुख ! मला असा मुलगा असता जना, तर त्याचे नाना कोड किंग पुरविले असते."

"खरंच आजीबाई, तुम्हांला माझ्यासारखा मुलगा असता तर तुम्हीं त्याचे नाना कोड पुरविले असतेत, पण ज्यांना माझ्यासारखीं मुलें आहेत तीं तर त्यांचा कंटाळा करितात. मला आई आहे, पण आईचें सुख नाहीं हें तरी दुर्दैव नाहीं का ?"

"म्हणजे ! मी नाहीं समजलें बाबा ?"

इतक्यांत बाजारांतून धान्य घेऊन आरमारावरील त्याचे सोबती आले आणि बाहेरून त्याला हांका मारूं लागले. सांवळ्यानें घाईघाईनें जनाबाईचा आणि त्या म्हातारीचा निरोप घेतला. आणि पुढल्या खेपेस आपली हकीकत त्यांना सांगण्याचें कबूल करून तो आपल्या मंडळीबरोबर निघाला. त्या दिवसापासून आठ पंधरा दिवसांनीं सांवळ्याची जनाबाईकडे एखादी फेरी होऊं लागली. दुसऱ्या खेपेस त्यानें म्हातारीला आपली हकीकत सांगितली तेव्हां तिला अत्यंत वाईट वाटलें. तिला एक मुलगा होता—त्याची, हकीकत क्रमाक्रमानें पुढें येणार आहे, त्याच्यावर म्हातारीचें अत्यंत

प्रेम होतें. परंतु त्या प्रेमाचा मोबदला मुलाकडून तिला मिळाला नाहीं. त्यानें वेळोवेळीं म्हातारीला फार छळलें. त्यामुळें घरदार सोडून ती तेथें येऊन राहिली होती.

" सांवळ्या, ही माझी एक आठवण तुझ्याजवळ असूं दे. " म्हातारी उठून गेल्यानंतर जनाबाईनें एक दुर्बीण आणि एक होका-यंत्र पदरांतून काढलें आणि ती पुढें म्हणाली, " आज आठ नऊ वर्षें झालीं, ह्या दोन वस्तु मी जीवापलीकडे सांभाळून ठेविल्या, पण आतां ह्या तुला माझी आठवण म्हणून देत आहे. ह्या वस्तूंचा उपयोग करण्यास तूंच एक योग्य आहेस असें मला वाटतें. "

सावळयानें अशा चमत्कारिक वस्तु कधींहि पाहिल्या नव्हत्या, तेव्हां त्यांचा कसा उपयोग करावा हें त्याला कोठून माहीत असणार ? त्यानें त्या वस्तु हातांत घेऊन उलट सुलट करून पुष्कळ वेळ पाहिल्या. परंतु तें काय आहे, त्याचा काय उपयोग असावा, याची त्याला कांहींच कल्पना होईना. तेव्हां जनाबाई म्हणाली, " अशा वस्तु तूं कधीं पाहिल्या नाहींस, म्हणून यांची तुला किंमत वाटत नसेल. परंतु यांचा उपयोग कळतांच तुला त्यांची किंमतही करतां येणार नाहीं किंवा एक क्षणाहि तूं ह्या वस्तु विसरणार नाहींस. हें पाहिलेंस का ? याला होका म्हणतात. ही जिन्नस इतकी लहान दिसते, पण हिचा उपयोग फार मोठा आहे. आपण मोठ्या दर्यांत असलों आणि आपल्या जहाजाची दिशा चुकली तर हें यंत्र असें धरलें असतां तावडतोब उगवती

आणि मावळती दिशा दाखविते. पहा आतां ह्या कांट्याकडे—ही बाजू कांट्यानें दाखविली पहा, आहेना उगवती बाजू ?"

यंत्रांतील कांटा आपोआप फिरतांना पाहून सांवळ्याला मोठें आश्चर्य वाटलें. हा कांटा फिरला कसा, हा मोठा प्रश्न त्याच्या मनांत उद्भवला. तो त्याची जिज्ञासा जास्त वाढविण्याकरितां मनाबाईनें दुर्बीण हातात घेऊन त्याला विचारलें, "तें पहा खाडींत काय दिसत आहे तें ?"

सांवळ्यानें क्षणभर निरखून पाहून उत्तर दिलें, "तें एक जहाज आहे असें वाटतें."

"तें जहाज आहे खरं ना ! तें आपणाणसून किती बरं दूर आहे ! तें जहाज आहे, तेव्हां त्यावर माणसंही असणारच. परंतु तीं कोण आहेत तें आपणास येथून ओळखतां येणं शक्य नाहीं. पण आतां हें पहा—" असें ह्मणून तिनें सांवळ्याच्या डोळ्यांपुढें दुर्बिण धरिली. त्याबरोबर "अर्रर्र जहाज जवळ आलं !" असे आश्चर्याचे उद्गार त्याच्या तोंडांतून बाहेर पडले. तें ऐकून तिला हंसू आलें. नंतर तिनें त्या दोन वस्तूंचा उपयोग कसा करावा तें त्याला नीट समजावून सांगितलें, तेव्हां त्यांचें महत्व लक्ष्यांत येऊन सांवळ्याला अतिशय आनंद झाला.

सावळ्यानें त्या दोन वस्तु आपल्या जहाजावर नेतांच त्या पाहण्याकरितां त्याच्यासभोंवतीं एकच गर्दी झाली. जो तो आपणांस त्या पहिल्यानें पहावयास मिळाव्या ह्मणून धडपड करूं लागला. इतक्यांत मुख्य तांडेल मायनाक तिकडे आला.

" सांवळ्या, पोरा काय आहेरे गडबड ! तूं ह्मणजे स्वतः एक गडबडच आहेस. तें काय हातात आहे पाहूं ? "

सांवळ्यानें मुख्य तांडेलाच्या हातांत सर्वांच्या जिज्ञासेचें मूळ अशा त्या दोन वस्तु दिल्या. क्षणभर त्याच्याकडे पाहून तो ह्मणाला, " सांवळ्या, अशाच प्रकारची एक दुर्बीण पुष्कळ वर्षांमागें महाराजांच्याच एका जहाजावरील तांडेलाला इंग्रजाच्या एका जहाजावरील तांडेलानें त्याचा जीव वांचविल्याबद्दल बक्षीस दिली होती. पण तोहि बिचारा थोड्या वर्षांपूर्वी जहाजासह वादळांत सांपडून मेला ! "

" मला हें जिनें दिलं, तिचाहि मी संकटांतून जीव वांचविला आहे ! " सांवळ्या एकदम ह्मणाला.

" मग सांभाळ पोरा. तूंहि वादळांत सांपडून मरशील कदाचित् ! " मायनाक तांडेल थट्टेनें ह्मणाला.

परंतु सांवळ्याला तितका पोंच कुठला ? तांडेलाचें भाषण ऐकून तो विचारांत पडला. आपण एका बाईचा जीव वांचविल्याबद्दल तिनें ह्या दोन वस्तु आपणास दिल्या, तेव्हां आपणहि त्या तांडेलाप्रमाणें वादळांत सांपडून मरणार कीं काय अशी त्याला क्षणभर भीति वाटली !

# प्रकरण ८ वें.



## खुनाचा शोध आणि संकट.



आतां सांवळ्याला दुर्बिणीशिवाय दुसरें कांहींच सुचत नसे. ती हातांत घेऊन समुद्रांत निरीक्षण करण्यांत त्याचा सर्व दिवस जात असे. परंतु जेव्हां त्याला तांडेलानें सांगितलेल्या गोष्टीची आठवण होई, तेव्हां मात्र त्याचें मन अस्वस्थ होत असे. जनाबाईजवळ त्या दोन वस्तु कशा आल्या, त्याविषयीं चौकशी करण्याच्या उद्देशानें त्यानें एके दिवशीं तिला विचारलें. तेव्हां डोळ्यांत पाणी आणून ती म्हणाली, "सांवळ्या, त्या दुःखकारक आणि भयंकर प्रसंगाची आठवण करून काय उपयोग ! त्याविषयीं तूं मला विचारूं नयेस आणि मी तुला सांगूं नये हेंच चांगलें ! ह्या दोन वस्तु माझ्या घरधन्याच्या आहेत, इतकं तुला कळलं म्हणजे पुष्कळ आहे." अशा रीतीनें जनाबाईनें डोळ्यांत पाणी आणून उत्तर दिल्यापासून सांवळ्यानें तिला त्या विषयावर पुनः कधींही विचारलें नाहीं.

महाराजांच्या आरमारावर रुजूं झाल्याला सांवळ्याला जवळ जवळ तीन वर्षें होऊन गेलीं. तितक्या काळांत त्यांची आणि शिद्यांची मधून मधून झटापट होत असे. आणि ती हकीकत वेळोवेळीं महाराजांकडे लिहून जात असे. महाराज दिल्लीहून परत आल्यानंतर

मोंगलांनीं घेतलेले सर्व किल्ले आणि प्रान्त परत मिळविण्याच्या खट-पटींत असल्यामुळें त्यांना आपल्या आरमाराकडे लक्ष पुरविण्यास दोन वर्षें बिलकुल वेळ मिळाला नाहीं. परंतु लवकरच महाराज स्वतः जंजिऱ्यावर स्वारी करण्यास येणार आहेत अशी आरमारावर सर्वत्र गुणगुण पसरली. महाराज स्वतः येणार असें कळल्यापासून सांवळ्याला अतिशय आनंद झाला होता. आपण मोठी शौर्याची व धाडसाचीं कामें करावीं व महाराजांनीं आपणास शाबासकी द्यावी अशी त्याची उत्कट इच्छा होती. महाराज येण्यापूर्वी एक वेळ कुलाब्यास जाऊन आई आणि कमलजा त्याचप्रमाणें वाड्यांतील आपला हितचिंतक तुकोबा आणि साधल्यास वसईच्या खाडींत जाऊन सुभानजी आणि मोहना यांना भेटून यावें असे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. एके दिवशीं त्यानें हळूच आपल्या मनांतील विचार मायनाक तांडेलाजवळ प्रकट केले, तेव्हां त्यानें सांवळ्याला पंधरा दिवसांची रजा दिली.

घरीं जाण्यापूर्वी प्रथम जनाबाईला भेटावें, म्हणून सांवळया तिच्या घरीं गेला. त्यानें रजा घेतली आहे असें तिला कळल्यावर त्यानें निदान दोन दिवस तरी आपल्या घरीं रहावें अशी जनाबाईची इच्छा होती. तिचा अतिशय आग्रह झाल्यामुळें सांवळयाला नाहीं म्हणतां येईना. त्या दिवशीं रात्रीं तीं दोघे बराच वेळ बाहेर गोष्टी बोलत बसलीं होती. मध्यरात्रीच्या सुमारास सर्वत्र सामसूम झाली असतां एकाएकीं झालाच्या भीमच्या घरांत मोठ्यानें आरडाओरड होऊन झालारीनें

फोडलेली किंकाळी त्यांच्या कानीं आली. त्याबरोबर जवळच पडलेला दांडका उचलून सांवळ्या एकदम उठला. जनाबाईनें चटकन् घरांत जाऊन दिवा आणिला. इतक्यांत भीमेच्या घरांतून एक मनुष्य धांवत येऊन त्यानें जनाबाईच्या हातावर फटका मारून दिवा विझविला आणि सर्वत्र काळोख पडला. तोंच ‘ चोर चोर ’ अशी ओरड करीत कांहींजण तेथें धांवत आले. त्यांना पाहतांच दिवा विझविणारा मनुष्य जीव घेऊन तेथून पळाला. सर्वजण त्याच्यामागें लागले. परंतु चोर कांहीं त्यांच्या हातांत मिळाला नाहीं. दिव्यावर झडप घालण्यापूर्वी सांवळया जवळच असल्यामुळें चोराचा चेहरा त्याच्या दृष्टीस पडला होता. त्याबरोबर तो विचारांत पडला. सर्व मंडळी चोराच्या मागें लागली. परंतु सांवळया मात्र जागेवरून हालला नाहीं. तो तेथेंच विचार करीत राहिला. आपल्या पुढून जो मनुष्य दिवा विझवून गेला, त्याला कोठें तरी आपण पाहिलें आहे असें त्याला वाटूं लागलें. त्यानें पुष्कळ विचार केला, परंतु त्या मनुष्याला आपण कोठें व केव्हां पाहिलें, याची त्याला आठवण होईना.

“ सांवळ्या तूं असा कां घाबरला आहेस ? ” जनाबाईनें विचारलें.

घाबरलों नाहीं मी. मला वाटतें, मी त्या मनुष्याला कुठें तरी पाहिला आहे. पण आतां आठवत नाहीं. ”

इतक्यांत म्हातारीचा कुंथण्याचा स्वर त्यांना ऐकूं आला. दोघेहि आंत गेले. आणि पाहतात तों म्हातारी भीमा अस्ताव्यस्त पडली असून बाजूला रक्ताचा पाट वाहत आहे !

" अरेरे, म्हातारीला मेल्यानें मारली वाटतं ! कोण तरी मेला चांडाळ हा ! " असें म्हणून जनाबाईनें म्हातारीला सांवळयाच्या सहाय्यानें बाजूच्या बाबळीवर निजविलें. ती बेशुद्ध स्थितींत होती. इतका प्रकार होईपर्यंत चोराच्या मार्गे गेलेली मंडळी परत आली. त्या मंडळींत गांवचा महालकरी आणि सुभेदार असे महाराजांचे दोघे अधिकारी होते. त्यांनीं म्हातारीला नीट तपासून पाहिलें. जनाबाईनें म्हातारीचें रक्तानें भिजलेलें वस्त्र बदललें, तेव्हां तिच्या पाठीवर दोन मोठ्या जखमा झालेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. म्हातारीची अगदीं कठीण अवस्था होती. महालकऱ्यानें एका मनुष्याला पाठवून तिच्या जखमा बांधण्याकरितां न्हाव्याला बोलाविण्याकरितां पाठविलें. किंचित् कालानें ती किंचित् शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडून सभोंवार पाहिलें तों तिच्यासमोरच बसलेला सांवळया तिच्या दृष्टीस पडला.

"सांवळ्या, अरे धर त्याला. तो पहा तो पहा—आला चांडाळ—मेला मला ठार मारतोय—धरा—धरा—आया-ई—मारलं ग मेल्यानें—" असें भ्रमांत बोलून म्हातारीला पुनः मूर्च्छा आली. इतक्यांत न्हाव्याला घेऊन मनुष्य परत आला. त्यानें तिची जखम पाहिली. आणि आतां तो तिच्या जखमेवर मलमपट्टी बांधणार तों म्हातारीनें एक मोठा श्वास सोडला !—अरेरे ! ! बिचारीचें देहावसान झालें ! ! !

म्हातारीनें शेवटचा श्वास सोडतांना पाहून प्रत्येकाला वाईट वाटलें. परंतु सांवळ्याच्या आणि जनाबाईच्या मनाला विशेष चटका बसला.

विषाऱ्या निरपराधी वृद्धेचा अशा रीतीनें खून व्हावा आणि खून करणारा चांडाळ शिक्षेशिवाय पळून जावा हें सांवळ्याच्या मनाला चमत्कारिक वाटूं लागलें. आपणाकडून होईल तितकी शक्य खटपट करून खुनी मनुष्य शोधून त्याला महालकऱ्याच्या स्वाधीन करावयाचें असा त्यानें निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं महालकऱ्यानें पंच जमविले. त्यांनीं ' चोरीच्या उद्देशानें म्हातारीचा अमानुष रीतीनें खून केला ' असा अभिप्राय दिला. ती सर्व हकीकत त्यानें हुजूरास कळविली. नंतर त्यानें पंचासमक्ष तिच्या सर्व घराची झडती घेतली. त्यांत पांचसातशें रुपयांचा ऐवज आणि दीड हजार रोकड निघाली. खुनी पकडून देणारास पंचांनीं पन्नास मोहरांचें बक्षीस ठेविलें.

दुसऱ्या दिवशीं जनाबाईचा निरोप घेऊन सांवळ्या कुलाब्यास आला. त्याला तीन वर्षांनीं पाहून तुकोबाला फार आनंद झाला. आतां सांवळ्या बराच मोठा दिसूं लागला होता. त्याला किंचित् मिसरूडहि फुटली होती, त्यामुळें त्याचा गोरावर्ण विशेष खुलत होता. त्याचा मूळचा बांधा चांगला असल्यामुळें आतां तो धिप्पाड व सशक्त पुरुष दिसे. सांवळ्यानें प्रथम भिमेच्या खुनाची हकीकत सांगून खून करणाऱ्या मनुष्याविषयीं आपल्या सर्व शंकाहि तुकोबाला सांगितल्या. परंतु सांवळ्या सांगत असलेला मनुष्य कोण असावा तें त्याच्या लक्ष्यांत येईना. नंतर आपण आरमारावर गेल्यापासून घडलेल्या प्रत्येक गोष्टी त्यानें मोठ्या अभिमानानें सांगून जनाबाईकडून बक्षीस मिळालेल्या दोन अपूर्व वस्तु त्याला दाखविल्या. बराच वेळ लक्षपूर्वक त्या वस्तु अवलोकन करून तुकोजी

म्हणाला, " काय सांगूं रे तुला सांवळ्या, अरे ह्या दोन्ही वस्तु तर ओळखीच्या दिसतात. मला वाटतं, सुभानजी नाईकाच्या ह्या असाव्यात ! त्यानें एकदां तुफानांत सांपडलेल्या इंग्रज तांडेलाला मोठ्या शर्तीनें वांचविलें तेव्हां त्या तांडेलानें एक दुर्बीण आणि असं एक दिशायंत्र सुभानजीला दिलं. तीच ही जर दुर्बीण असेल, तर काय सांगूं रे तुला सांवळ्या, मी कैक वेळां जहाजावरून ह्या दुर्बिणींतून शत्रूच्या जहाजाची टेहळणी केली आहे. "

तुकोबाचें भाषण ऐकून सांवळ्या विचारांत पडला. त्याच्या मनांत निरनिराळे विचार येऊं लागले. जनाबाईनें दुर्बिणीसंबंधानें सांगितलेली हकीकत, मायनाक तांडेलानें सांगितलेली हकीकत आणि आतां तुकोबानें सांगितलेली हकीकत, ह्या तिन्हीं हकीकतींचा तो आपल्या मनाशीं मेळ बसवूं लागला. शेवटीं त्याला वाटूं लागलें कीं, जेव्हां सुभानजीची आणि तुकोबाची वाड्यांत भेट झाली, तेव्हां आपली हकीकत सांगतांना, आपली बायको वादळांत सापडून मेली, असें जें सुभानजीनें सांगितलें तें निराधार असून जनाबाई हीच त्याची बायको असावी असें त्याला वाटूं लागलें. जसजसा तो जास्त विचार करी, तसतशी आपणांस वाटत आहे त्याचप्रमाणें गोष्ट असली पाहिजे, अशी त्याला अधिकाधिक खात्री वाटूं लागली. आणि खरोखरच आपणांस खात्री वाटते, त्याप्रमाणें जनाबाई ही आपल्या उपकारकर्त्या सुभानजीची बायको असली आणि आपण त्याची भेट करून दिली, तर त्याना किती आनंद होईल, याचें चित्रहि त्याला डोळ्यापुढें दिसूं लागलें. पुष्कळ वेळ

हे विचार त्याच्या मनांत आल्यावर आतां आपण कसें वागावयाचें त्याचा सर्व मेळ स्वतःशीं जमवून खरी हकीकत बाहेर पडेपर्यंत यांतील एक अक्षरहि कोणाला कळूं द्यावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला.

वाड्यांतील सर्व मंडळींना भेटून सांवळ्या सायंकाळच्या सुमारास आपल्या घरीं जाण्यास निघाला. इतक्या उशीरानें जाण्याचा त्याचा उद्देश इतकाच होता कीं, काळोखांत आपणास बहिणीची भेट सहज घेतां येईल. अलीकडे आपली आई नेहमीं आजारी असते असें त्याला तुकोबाचकडून कळलें होतें. गेल्या पांच सहा वर्षांत त्यानें आईला पाहिली नव्हती. त्यामुळें सध्यां ती दुखणाईत आहे असें कळल्यांपासून त्याचें मन फळवळूं लागलें. आज तरी आई आपली भेट घेईल किंवा नाहीं याची त्याला शंकाच होती. तो विचार करीत हळुहळूं चालला होता. त्यावेळीं काळोख पडण्यास नुकतीच सुरवात झाली होती. वाड्याचें कुंपण ओलांडून तो आपल्या आईच्या दुकानाकडे जाणाऱ्या रस्त्यावर वळसा घेणार तोंच कुंपणावरून उडी टाकून मागून त्याला कोणीं घट्ट धरिलें.

" सांभाळ, ओरडलास तर मेलास म्हणून समज ! मुकाट्यानें मी विचारतों तें सांगशील तर तुला न दुखवितां सोडून देईन. बोल—सांग लवकर, ती म्हातारी आतां कशी आहे ? "

इतक्या गोष्टी घडून यावयाला एक क्षणहि लागला नाहीं. सांवळ्या क्षणभर गोंधळला. परंतु तो घाबरला मात्र नाहीं. त्याचें

प्रसंगावधान मोठें दांडगें होतें. त्यानें चटकन् मागें वळून पाहिलें. त्याबरोबर मागून धरणारा मनुष्य कोण हें त्यानें ओळखलें. तीन वर्षीपूर्वीं वाड्यांत रोगी म्हणून राहिलेला मुरारी आणि तीन दिवसापूर्वीं म्हाताऱ्या भिमेच्या द्रव्यासाठीं खून करणारा दरोडेखोर हा एकच असें त्याच्या तत्काळ लक्षांत आलें.

"बोलतोस की मारूं !" असें म्हणून मुरारीनें हातांतील कट्यार उगारली.

सांवळ्या क्षणभर स्तब्ध राहिला. आतां आपण हातपाय हालविले नाहींत तर कट्यार आपल्या छातीवर येऊन आदळेल हें तो समजून चुकला. कारण मुरारी खून करण्यास मागें घेणारा मनुष्य नव्हे हा त्याला एक वेळ अनुभव आला होता. त्यानें चपळाई करून मुरारीनें उगारलेल्या हातावर जोराचा फटका मारला आणि त्याला धाडकन् जमिनीवर आदळलें. इतक्यांत मागून एक मनुष्य कुंपणावरून उडी टाकून मुरारीच्या साह्याला आला. तोंच 'पकडा, पकडा, धांवा—चोर—' अशी सांवळ्यानें मोठ्यानें आरोळी फोडली. मुरारीच्या साहाय्याला आलेल्या मनुष्यानें सांवळ्याच्या पाठीवर हत्यार चालविलें, तरी सांवळ्यानें मुरारीला सोडलें नाहीं. दोन्हीं गुढघ्यांनीं त्यानें मुरारीला इतकें घट्ट दाबून धरलें होतें कीं, त्याला किंचित्हि हालतां येत नव्हतें. पुनः एक वेळ सांवळ्यानें मदतीकरितां मोठमोठ्यानें आरोळ्या फोडल्या. तेव्हां वाड्यांतील मंडळी काय गडबड आहे तें पाहण्याकरितां धांवली. ती मंडळी येत आहेत असें पाहून तो दुसरा मनुष्य कुंपणाला पर्ववत वळसा देऊन पळाला. थोड्या वेळानें

मंडळी धांवून आली. त्यांत तुकोबाही होता. सांवळ्याच्या हातावर, पाठीवर आणि मांड्यांवर लहान मोठ्या आठ दहा जखमा झाल्या होत्या.

" हा पहा भिमा म्हातारीचा खून करणारा, तुमच्या वाड्यांत राहिलेला मुरारी ! पकडा त्याला—" इतकें म्हणून सांवळ्याला मूर्च्छा आली. तुकोबानें त्याला पडतां पडतां सांवरलें. आणि इतर मंडळीनें मुरारीला पकडलें.

निश्चय केल्याप्रमाणें सांवळ्यानें खुनी मनुष्य पकडला. परंतु त्या झटापटींत ज्या जखमा झाल्या त्यामुळें चार महिने त्याला वाड्यांत अंथरुण धरून रहावें लागलें. त्यावेळीं पूर्वी ठरल्याप्रमाणें महाराज,जंजिऱ्यांस स्वतः वेढा देण्याकरितां आले आहेत,असें त्याला तुकोजीकडून कळलें. त्याला आतां किंचित् आराम वाटूं लागला होता.

१ महाराज दिल्लीहून परत आल्यानंतर मोंगलांनी घेतलेले सिंहगड, पुरंदर माहुली, पन्हाळा, लोहगड, शिवनेरी इत्यादि किल्ले आणि सगळा कल्याण प्रान्त पुनः काबीज करून ते स्वतः जंजिऱ्यावर स्वारी करण्याकरितां गेले. तेथें त्यांनीं जंजिऱ्याला जमिनीवरून वेढा घालून तोफांचा सारखा मारा सुरू केला. तेव्हां जंजिऱ्याचा मुख्य फत्तेखान याचा धीर सुटला. तो महाराजांस शरण यावयास तयार झाला. परंतु त्याच्या हाताखालचे तीने सरदार स्वधर्माचे कडे अभिमानी होते. ते मराठ्यांचा अतिशय तिरस्कार करीत. फत्तेखान महाराजांस शरण गेल्यास आपलें धडगत लागणार नाहीं अशी त्यांची खात्री होती म्हणून त्यांनी फत्तेखानाला कैद करून किल्ला लढण्याचें काम नेटानें चालू ठेविलें. इतकेंही करून महाराजांपुढें आपला टिकाव लागणार नाहीं. असें पाहून त्यांनी सुरतच्या मोंगल सुभेदाराकडे मदत मागितली. ती मदत आल्यावर महाराजांनीं वेढा उठविला परंतु सुरतच्या सुभेदारानें शिद्याला मदत केल्याबद्दल त्याची महाराजांनी लवकरच रग जिरविली. ती हकीकत पुढें येणार आहे.

महाराज आलेले ऐकतांच त्याचा जीव एकसारखा तळमळूं लागला. अशा वेळीं महाराजांच्या आरमाराबरोबर असावें अशी त्याची फार इच्छा होती. परंतु करतो काय ? महाराज आले त्यावेळीं तो इतका अशक्त झाला होता कीं, दुसऱ्याच्या साहाय्यावांचून त्याला उठतांच येत नव्हतें. पुढें लवकरच पंचांनीं मुरारीचा खटला चालविला. त्यांत तो खुनाशिवाय भयंकर राजद्रोही ठरला. त्या खटल्यांत बऱ्याच गोष्टी बाहेर पडल्या. म्हातारी भीमा ही त्याची आई असून तिच्या फाजील लाडामुळें तो लहानपणीं अतिशय बिघडला. त्याचा बाप तो लहान असतांना मेला होता. त्यामुळें त्याच्यावर कोणाचा दाब न राहून आणि आईच्या फाजील लाडाची त्यांत भर पडल्यामुळें तो इतका स्वतंत्र आणि खुनशी बनला कीं, चांचे लोकांच्या संगतीनें जहाजांची लूट, दरवडे वगैरे कामें त्याला हलकीं वाटूं लागलीं. वेळोवेळीं त्यानें आपल्या आईला पैशाकरितां फार छळलें. शेवटीं ती त्याच्या त्रासानें मालवणचें आपलें घरदार व शेतवाडी विकून चेऊलास येऊन राहिली. त्यावेळीं मुरारी मोंगलांच्या आरमारावर मराठ्यांच्या आरमाराचा भेद काढून देणारा हेर ह्मणून राहिला. वाड्यांत रोम्याचें सोंग घेऊन तो कांहीं दिवस राहिला होता, तो इतक्याच करितां ! गेल्या प्रकरणांत त्याविषयीं थोडा उल्लेख केलाच आहे. पुढें वाड्यांतील लोकांना त्याचा संशय येऊं लागतांच तो तेथून पळाला. अद्यापि तो मोंगलाच्या आरमारावरच होता. मधून मधून तो आपल्या आईचा शोध करित असे. पुढें अकस्मात एके दिवशीं चेऊलच्या खाडींत त्याला आईचा शोध लागला. तेव्हां रात्रीं तिची गांठ घेऊन तिच्याकडून त्यानें पैसे उपटण्याची शिकस्त

केली. परंतु म्हातारीनें त्याला दाद लागू दिली नाही. तो राग मनांत ठेऊन पैशाकरितां आपल्या मातेला मारण्याचा त्यानें विचार केला. त्यानंतर घडलेली हकीकत वाचकांना माहित आहेच !

अशा भयंकर द्रोही मनुष्याला सावळ्यानें मोठ्या शौर्यानें पकडलेली हकीकत सचिवाकडून महाराजांना कळतांच त्यांनीं आमच्या कथानायकाला पूर्वी ठरलेल्या बक्षिसाच्या दुप्पट बक्षीस देण्याचा हुकूम करून मुरारीचा विश्रामगडाच्या बुरजावरून कडेलोट करण्याची आज्ञा केली.

असो. सांवळ्या वाड्यांत आजारी पडला असतां त्याला भेटण्याकरितां प्रत्येक दिवशीं कमलजा वाड्यांत येत असे. वाचकहो, हें वाचून तुह्मांला आश्चर्य वाटेल, आणि आईच्या नकळत तिला प्रत्येक दिवशीं वाड्यांत येण्यास संधि कशी मिळत असे असें कोडें पडेल. परंतु आह्मी इतकेंच सांगतो कीं, ती आपल्या आईच्या न कळत न येतां उलट आईच्या आग्रहावरून वाड्यात सांवळ्याच्या भेटीला येत असे. एखादे दिवशीं वाड्यांत जाण्यास तिला उशीर झाला तर तिला रागहि येत असे. वाचकहो, सखूच्या स्वभावांत असा फरक पडणें हें आश्चर्य नव्हे काय ? परंतु खरोखरच तिच्या स्वभावांत फरक पडला होता. अलीकडे सतत वर्ष दीड वर्ष तिच्या मागें दुखणें लागल्यापासून हळुहळू तिचा हेकेखोर स्वभाव पालटून तिच्या मनाला आतां पूर्ण उपरती झाली होती. ती मुलाबरोबर इतक्या कठोरतेनें वागली असतां, त्यानें वेळोवेळीं तिच्याविषयीं दाखविलेलें प्रेम हेंच तिचा स्वभाव पालट-

ण्याला मुख्य कारण झालें ! जेव्हां जेव्हां आपल्या कठोर वर्तनाची तिला आठवण होई, त्याचप्रमाणें त्याच्या क्षुल्लक अपराधासाठीं आपण त्याला क्रूरपणानें मारलें, याचें तिला स्मरण होई आणि एक वेळ त्याला निर्दयपणें भयंकर भाजल्याचें चित्र तिच्या दृष्टीपुढें राही, त्या त्या वेळीं तिच्या अंतःकरणाला पीळ पडून तिला भडभडून येत असे. स्वतः वाड्यांत जाऊन आपल्या मुलाला भेटावें असें तिच्या मनांत फार येई, परंतु ती स्वतः बिछान्याला खिळली होती. आतां सांवळ्याच्या सर्व जखमा बऱ्या होऊन तो हिंडूं फिरूं लागला असें तिला कमळजेकडून कळतांच तिनें सांवळ्याला घरीं येण्याचा निरोप पाठविला. सांवळ्याला देखील घरीं केव्हा जाऊं असें झाले होतें. दुसऱ्या दिवशीं आपल्या दादाला नेण्याकरितां कमलजा वाड्यांत आली. त्या वेळीं तुकोजी जवळच होता, तो ह्मणाला, " काय सांगूं रे सांवळ्या तुला, पाहिलंस ना हें ! अरे, पूर्वी आई तिरस्कार करीत होती, तीच आतां तुला प्रेमानें घरीं बोलाविते. अरे, सतत धार सोडली तर दगडाला देखील भोंक पडतं, मग हें तर काय ? आईचं मन ! परंतु सांवळ्या, तोच जर तूं, आईनें घालवून दिल्यावर आडमार्गानें जातांस तर आजच्या ह्या आईच्या खऱ्या प्रेमाला मुकून तुझा त्या मुरारीप्रमाणें अंत झाला असतां. काय—खरंना ?"

आईच्या प्रेमाची खरी किंमत सांवळ्याला लवकरच कळली. तो घरीं येतांच, इतकीं वर्षें हेकेखोरपणानें दडपून टाकलेल्या सख्-ख्या मातृप्रेमाला एकदम भरती येऊन तिनें त्याच्या गळयाला मिठी मारिली आणि त्याला पोटाशीं धरून बराच वेळ मनसोक्त अ-

श्रुमोचन केलें. अहाहा! मातृप्रेम किती गोड असतें याची सांवळ्याला आज खरी खरी कल्पना झाली! आज इतकीं वर्षे आईच्या प्रेमाला आंचवलेल्या दादाला आईनें हृदयाशीं घट्ट धरलेलें पाहून कमळजेला गहिंवर आला. तिच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या!

आठ दिवस सांवळ्या मोठ्या आनंदांत घरीं राहिला. स्वगृह ह्मणजे काय, तें त्याला आतां चांगलें कळलें. सर्व दिवस तो आईच्या उश्याजवळ बसून तिला आपल्या आरमारावरील गोष्टी सांगत असे. गृहकृत्यांत जाई तितका वेळ खेरीज करून कमळजाही आपल्या दादाच्या गोष्टी ऐकण्यास त्यांच्या जवळ बसत असे. आतां ती बरींच मोठी दिसत होती. तिला नुकतेंच सोळावें वर्ष लागलें. परंतु ती बावीस वर्षांच्या वयाची दिसत होती. स्वरूपानें ती थेट आईच्या वळणावर गेली होती. तिच्याकडे पाहून सांवळ्याला वरचेवर मोहनेची आठवण होई. ती देखील कमळजेप्रमाणें मोठी वाढली असेल असें त्याला वाटत होतें. घरांत आठ दिवस पूर्ण विश्रान्ति घेतल्यावर त्याला पूर्ववत् हुशारी वाटूं लागली. आतां त्याचें सर्व चित्त आरमाराकडे लागलें. घरांत आळशासारखें बसून राहणें त्याला आवडेनासें झालें. त्या दिवशीं रात्रीं तो आईजवळ बसला असतां त्यानें उदईक आरमारावर जाण्याची गोष्ट काढिली. सरूनें त्याला कोठल्याच गोष्टीचा अडथळा केला नाहीं. आतां तिला पूर्वीप्रमाणें खलाशांचा राग न येतां उलट आपला मुलगा महाराजांच्या आरमारावर आपल्या बापाप्रमाणें तांडेल आहे, याचा अभिमान वाटूं लागला होता.

दोनप्रहरीं सांवळ्या तुकोबाला भेटण्याकरितां वाड्यांत गेला. क्षणभर इतर गोष्टी झाल्यावर सांवळ्यानें आपण उद्यां आरमारावर जाणार असें त्याला सांगितलें, तेव्हां तुकोबा ह्मणाला, " काय उद्यां जाणार ? ठीक, जा. पण काय समजलास सांवळ्या, तूं उद्यां जाणार, तेव्हां तुला एक गोष्ट सांगतो. आतां तूं मोठा झाला आहेस. तेव्हां एखादी नाजूक गोष्ट तुझ्याजवळ सांगायला कांहीं हरकत नाहीं. मी तुला वसईच्या खाडींत तीन वर्षांपूर्वीं महाराजांच्या आरमारावर असामीचें आज्ञापत्र देण्यास आलों होतों, त्या वेळीं सुभानजीनें तुझ्याविषयीं मोहनेची गोष्ट काढिली. तो नाईकाचा विचार मला पसंत पडून मी त्याला ' होय ' ह्मटलें आहे. परंतु आतां तुझें आणि आईचें जुळलें आहे, तेव्हां तिची ह्या गोष्टीला संमति मिळाली पाहिजे."

सांवळ्याच्या विचाराला अगदींच नवीन विषय मिळाला. तुकोबाचें भाषण ऐकतांच मोहनेची रम्य मूर्ति त्याच्या डोळ्यापुढें खाडकन् उभी राहिली. बऱ्याच वेळानें तो ह्मणाला " तुह्मी वडील आहांत, तेव्हां तुह्मीच आईजवळ गोष्ट काढून तिचा विचार घ्या. मी यांत काय सांगणार ! "

" काय सांगणार ! तूं नाहीं सांगणार तर कोण सांगणार ? " सांवळ्यानें खालीं मान घातलेली पाहून तुकोजी हांसत हांसत ह्मणाला, " बरं, बरं, मी येऊन विचार घेतों तुझ्या आईचा ! "

बरीच रात्र झाली. उद्यां आरमारावर जावयाचें ह्मणून लवकर झोंपून पूर्ण विश्रांति घ्यावी अशा उद्देशानें सांवळ्या बिछान्यावर

पडला होता. परंतु तुकोबानें सांगितलेल्या मोहनेच्या विचारानें त्याच्या निद्रेला मोह पडून त्याला निद्रा येईना. बराच वेळ झाला, इतक्यांत बाहेरून कोणी हांका मारीत आहे असा त्याला भास झाला. परंतु तो भास नव्हता. बाहेरून खरोखरच त्याला कोणी हांका मारीत होता. कमलजेनें धडपडत उठून दरवाजा उघडला, तेव्हां सांवळयाला वाटलें कीं, वाड्यांतील सर्व कामकाज आटोपून तुकोजी आपल्या आईजवळ मोहनेची गोष्ट काढण्याकरितां आला आहे. त्याबरोबर तोहि धडपडत उठून बसला.

" सांवळया तांडेल येथेंच राहतो काय ? " बाहेरच्या मनुष्यानें दरवाजाजवळ येऊन विचारलें.

सांवळयानें चट्कन् पुढें होऊन " होय " म्हणून उत्तर दिलें.

" तुह्मी जर थोडा वेळ माझ्याबरोबर याल तर ठीक होईल. " क्षणभर विचार करून सांवळया किंचित् बाजूला झाला. तेव्हां तो मनुष्य पुढें ह्मणाला. " तुमचे वडील गणोबा तांडेल, सात आठ वर्षांपूर्वी घरांतून गेले होते, त्यांचा तुह्मांला कांहीं शोध लागला आहे काय ! "

" नाहीं "

" तुह्मीं जर मजबरोबर आतां येत असाल तर मी त्यांची भेट करून देतों. सध्यां ते आमच्या जहाजावर अतिशय बेमार आहेत. संध्याकाळपासून तर त्यांची प्रकृति फारच—"

" काय ह्मणतां !—बाबा बेमार आहेत !—चला मी आलों—"

असें म्हणून सांवळया घाईघाईनें कपडे करण्याकरितां घरांत आला. इतक्या रात्रीं त्यांची जाण्याची तयारी पाहून त्या मायलेकीला आश्चर्य वाटलें. कदाचित् आरमारावरून त्याला बोलावणें आलें असावें असें प्रथम सरूला वाटलें. परंतु ती उघड बोलली नाहीं. सांवळयाचे कपडे घालून झाल्यावर तो आईच्या बिछान्याजवळ गेला आणि नुकतीच बाहेर आलेल्या मनुष्यानें सांगितलेली बापाविषयींची हकीकत त्यानें तिला थोडक्यांत सांगितली. शेवटीं बाहेर पडतां पडतां तो म्हणाला, " आई, आतां जाऊन मी बाबाची प्रकृति पाहतों. आणि तो येण्यासारखा असल्यास त्याला संभाळून मी घरीं घेऊन येतों. तुम्हीं त्या पलीकडच्या खोलींत त्याची व्यवस्था करा. "

सांवळया त्या मनुष्याबरोबर निघून गेल्यावर खोली स्वच्छ करून त्या दोघी मायलेकी सांवळयाच्या येण्याची वाट पहात बसल्या. मध्यरात्र झाली, पहाट होऊं लागली शेवटीं दुसरा दिवस उगवला, तरी सांवळया परत येईना ! तेव्हां सरूनें कमलजेला वाड्यांत पाठवून तुकोजीच्या कानावर ती सर्व गोष्ट घातली. सर्व सांवळयाची वाट पहात राहिले. एक दिवस झाला, दुसरा दिवस आला, चार दिवस गेले, आठवडा लोटला, पंधरा दिवस निघून गेले तरी सांवळया परत आला नाहीं. तुकोबानें शक्य तितका शोध केला परंतु सांवळ्याचा पत्ता लागला नाहीं. तो गेला कुठें ! त्याचें काय झालें ! याशिवाय त्या मायलेकीला विचारला विचाराला दुसरा विषय नव्हता. जसजसे दिवस जाऊं लागले तस तशी त्यांची चिंता वाढूं लागली.

---



" अरेरे ! कोणीतरी त्या दुर्दैवी प्राण्याला वांचवा ! " मराठ्यांच्या जहाजावर हुकमी परंतु गंभीर असा ध्वनि झाला.

# प्रकरण ९ वें.

## महाराजांचें दर्शन.

निमिषार्धांत भवितव्यतेची गति बदलली! क्षणापूर्वी शांत आणि सौम्य दिसणारा समुद्र एकाएकी खवळला. मनाला आल्हाद देणाऱ्या वाऱ्यास झंझावाताचें स्वरूप आलें. निरभ्र नील आकाश कृष्णमेघांनीं आच्छादित होऊन त्याचा भयंकर गडगडाट सुरू झाला. वृष्टीला सुरवात होऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच मुसळधार पाऊस पडूं लागला, व आतां आकाश कोसळतें कीं काय असें जहाजावरील प्रत्येकाला वाटूं लागलें. क्षणापूर्वी वाऱ्याच्या लहरींबरोबर जें शीड आनंदानें डुलत होतें, त्याला त्या सोसाट्याच्या वाऱ्याचा असह्य मारा सहन न होऊन त्याच्या चिंधड्या फडफडूं लागल्या. जहाजाला भयंकर हेलकावे बसूं लागले. सोसाट्याच्या वाऱ्याला टक्कर देत असतां अविश्रांत श्रमामुळें समुद्राला फेंस आला, तरी देखील त्याच्या भयंकर गर्जना सारख्या चालू होत्या. मधून मधून जहाजावरून "या अल्ला—तोबा," असा अस्पष्ट निराशयुक्त शब्द ऐकूं येत होता. आतां लवकरच आपणाला जलसमाधि घेण्याचा प्रसंग येतो हें प्रत्येकजण जाणून होता. इतक्यांत "तोबा, तोबा, सैतानका जहाज आया," असा त्या जहाजावर एकच गलबला झाला. सर्वजण

भीतियुक्त दृष्टीनें त्या खवळलेल्या समुद्रांत चोहोंबाजूला पाहूं लागले. जवळच त्यांच्यासारखें तुफानांत सांपडलेलें मराठ्यांचें एक मोठें डोलकांठीचें जहाज त्यांच्या दृष्टीस पडलें. शत्रू इतक्याजवळ आलेला पाहतांच मोठ्या शिकस्तीनें त्यांनीं आपल्या जहाजाचें सुकाणूं फिरविलें.

त्या जहाजावर एका कोपऱ्यांत एक दुर्दैवी कैदी बसला होता. मराठ्यांचें जहाज जवळ आलें ह्मणून त्या जहाजावरील खलाशांची ती धांदल पाहून आपल्या सुटकेला ही संधि उत्तम आहे असें त्याला वाटलें. त्यानें किंचित् वर दृष्टि करून पाहिलें तों महाराजांचा भगवा झेंडा वातावरणांत फडकतांना त्याच्या दृष्टीस पडला. तें महाराजांचें एक आरमार आपल्या जहाजाप्रमाणें वादळांत सांपडून हेलकावे खात आहे आणि आपल्या जहाजाप्रमाणें त्या जहाजावर देखील मोठा दुर्धर प्रसंग आहे हें जरी तो जाणून होता, तरी मोंगलाच्या जहाजावर त्या वादळांत सांपडून परतंत्रतेंत मरण्यापेक्षां आपल्या मंडळींत स्वतंत्रतेनें मरणें त्याला अधिक प्रिय वाटूं लागलें. तरी देखील विश्वासघात करून मोंगलांनीं आपणास कैद केल्याबद्दल त्याचा पुरा सूड उगविल्याशिवाय तें जहाज सोडून स्वतःची सुटका करण्यास त्या कैद्याचें स्वाभिमानी मन तयार होईना.

इकडे खलाशांची एकसारखी धडपड चालू होती. आपला सूड कसा उगवून घ्यावा, याविषयीं तो कैदी क्षणभर विचार करीत राहिला. बाहेर भयंकर वादळ, असह्य वारा, मुसळधार पाऊस आणि कानाला दडपा बसविणारी मेघगर्जना याकडे त्या कैद्याचें

बिलकूल लक्ष नव्हतें, इतका तो सूड उगविण्याच्या विचारांत विचारमग्न झाला होता! तितक्यांत त्याला एक विचार सुचला. त्यानें हळूंच आपल्या कंबरेसभोंवती फडक्यांत बांधलेली चकमक बाहेर काढली. आणि सभोंवार एक वेळ दृष्टि फेंकली, तेव्हां जहाजावर सामान अस्ताव्यस्त पडलें असून शीड सोडण्याच्या खटपटींत सर्व खलाशी गुंतले आहेत असें त्याला दिसून आलें. क्षणभर तो थांबला, पुनः त्यानें एकवेळ चोहोंकडे पाहिलें. कोणाचेंहि आपणाकडे लक्ष नाहीं असें पाहून तो हळूंच उठून बाजूच्या कोपऱ्यांत असलेल्या दारूच्या पोत्यावर त्यानें जोरानें हातांतील चकमक झाडली. पुनः तो क्षणभर उभा राहिला. दारूच्या पोत्यावर धूर दिसतो न दिसतो तोंच मोठ्यानें ' हर हर महादेव, ' अशी गर्जना करून जीवाचीहि पर्वा न बाळगतां स्वातंत्र्यासाठीं त्या खवळलेल्या भयंकर समुद्रांत त्यानें धाडकन् उडी टाकिली! आणि क्षणार्धांत आकाशाला आलिंगून पाताळाची जणूं भेट घेण्याकरितां तळीं जाणाऱ्या भयंकर लाटेंत तो एकदम दिसेनासा झाला! कैद्यानें पाण्यांत उडी टाकून एक क्षण झाला असेल नसेल तोंच मोंगलांच्या जहाजावर भयंकर स्फोट झाला आणि खवळून गेलेल्या त्या विशाल उदराच्या समुद्रानें आपल्या उदरांत एका कोपऱ्यांत त्या जहाजाला अक्षय्यची जागा दिली! त्या कैद्यानें आपल्या इच्छेप्रमाणें पुरा सूड उगविला!

" अरेरे! कोणी तरी त्या दुर्दैवी प्राण्याला वांचवा!" मराठ्यांच्या जहाजावर हुकुमी परंतु गंभीर असा ध्वनि झाला.

त्याबरोबर पांचपंचवीस जणांनीं धडाधड पाण्यांत उड्या टा किल्या. अहाहा ! शाबास !! काय हें लोकोत्तर धाडस !!! मराठे गडी हो ! धन्य आहे तुमची !! प्रत्यक्ष मृत्यूच्या जबडयांत असतां देखील फक्त धन्याच्या शब्दाकरितां असें भयंकर साहस करणारे निधडया छातीचे वीर पुरुष जवळ असतां यशाची तेजस्वी माळ तुमच्या पुण्यप्रतापी धन्याकरितांच असणार यांत बिलकूल शंका नाहीं !!! थोडयाच वेळानें त्याची सत्यता दाखविण्याकरितां कानाला दडे बसविणाऱ्या भयंकर समुद्रगर्जनेंतून 'श्रीशिवाजी महाराजकी जय,' अशी मंगल गर्जना ऐकूं आली.

हां हां ह्मणतां जहाजावरील लोकांनीं मोंगलांच्या जहाजावरून स्वातंत्र्याकरितां पाण्यांत उडी टाकणाऱ्या त्या दुर्दैवी प्राण्याला बेशुद्ध स्थितींत वर उचलून घेतलें.

"हा माझा सांवळ्या !" आश्चर्यानें जहाजावरील एका तांडेलाच्या तोंडून उद्गार निघाले.

"कोण सांवळ्या तांडेल ! हाच का तो बालवीर ?"

"होय, सरकार." आश्चर्यानें प्रथम उद्गार काढणारानें लीनतेनें उत्तर दिलें.

"हा तुझा मुलगा काय ?"

"होय, सरकार." असें लीनतेनें ह्मणून पुत्रवात्सल्यानें वेडा झालेल्या गणोबानें—तो गणोबाच होता हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल !—सांवळ्याला तशा अर्धवट बेशुद्ध स्थितींतच क्षणभर आपल्या हृदयाशीं घट्ट धरिलें !

" मग मला अत्यंत आनंद वाटतो. जंजिऱ्याचा वेढा उठवून मी आलों त्याचें खरोखर सार्थक झालें, कारण माझा एक विश्वासु बाळवीर मला ह्या तुफानांतून वांचवितां आला."

महाराजांचा सहानुभूतीपर गंभीर शब्द कानीं पडतांच अर्धवट शुद्धीवर आलेल्या आमच्या कथानायकानें डोळे उघडले, तोंच समोर उंच आसनावर बसलेल्या महाराजांकडे त्याचें लक्ष गेलें. त्याबरोबर, त्यांचा तुरा लावलेला मंदिल, भव्य पोषाख, उजव्या हातांत, त्यांना सदैव विजय देणारी भवानी तरवार इत्यादि अलौकिक वस्तु पाहून वंदनीय महाराज ते हेच असें त्याला वाटलें. तो ताडकन् उठला आणि चिंतारहित होऊन कृतज्ञतापूर्वक त्यानें महाराजांच्या पायावर डोकें टेंकलें. ज्या महापुरुषाच्या आरमारावर रहावें म्हणून अगदीं लहानपणापासून त्याची इच्छा होती, ज्या प्रतापशाली वीराच्या वेळोवेळीं ऐकलेल्या प्रौढ कीर्तीवर लुब्ध होऊन तो ज्याचा पुरा अभिमानी बनला होता, त्या स्वातंत्र्यप्रिय महाराजांचें आज प्रत्यक्ष दर्शन होऊन त्यांच्या चरणावर आपणास डोकें ठेवावयास मिळालें म्हणून सांवळ्याला इतका आनंद झाला कीं, त्याच्यानें त्या वंद्य चरणावरून आपलें डोकें काढावें असें त्याला वाटेना.

" ऊठ, सांवळ्या ऊठ. गणोबा ने ह्याला तिकडे, आणि नवीं वस्त्रें देऊन घेऊन ये."

तुफान आतां बहुतेक शान्त झालें होतें. थोड्या वेळानें भिजलेलीं वस्त्रें बदलून गणोबानें सांवळ्याला महाराजापुढें आणून उभें केलें. क्षणभरानें "मोंगलांच्या जहाजावर तूं कसा आलास ?" असा

महाराजांनीं त्याला पहिला प्रश्न केला. तेव्हां, बापानें कपडे बदलतांना शिकवून ठेवल्याप्रमाणें महाराजांना प्रणिपात करून सांवळ्या लीनतेनें आपली हकीकत सांगूं लागला.

गेल्या प्रकरणांत सांवळ्याला रात्रीच्या प्रहरीं एका मनुष्यानें गणोबा आजारी आहे त्याची भेट करवितों, असें सांगून फसवून नेलें ती हकीकत वाचकांना आठवत असेलच. सांवळ्याला त्या मनुष्याचा बिलकूल संशय आला नाहीं. बऱ्याच वर्षांनीं बापाची भेट होत आहे ह्या विचारांत तो मुकाट्यानें त्या मनुष्याच्या मागून एका जहाजावर गेला. तें जहाज मोंगलांचें होतें. सांवळ्याला जहाजावर आणलेला पाहून जहाजाचा मुख्य तांडेल त्याच्याजवळ येऊन त्याला दरडावून विचारूं ह्मणाला, " आमचा मुरारी कुठें आहे ? त्याला तूं पकडून दिलेंस ह्या तुझ्या हरामखोरीबद्दल तुला येथें आणलें आहे. आतां तुला येथून सुटका करून घ्यावयाची असेल तर कुलाब्यांत मराठ्यांचा खजिना कोठें ठेवला आहे तें ठिकाण आह्मांला सांग. नाहीं-तर आमच्या मुरारीचा जसा तुह्मीं शेवट केला तसा आह्मी तुझा शेवट करूं." तांडेलाचें हें भाषण ऐकतांच आपण कोठें आहोंत याची सांवळ्याला ताबडतोब कल्पना झाली. त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर शेवटपर्यंत कोणाबरोबर बोलावयाचें नाहीं असा त्यानें मनाशीं दृढनिश्चय केला. त्या जहाजावर कांहीं मराठे कोळी होते. त्यांनीं सांवळ्याला सामोपचाराच्या गोष्टी सांगून वळविण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अशा रीतीनें पंधरा दिवस गेले. इतक्यांत " जंजिऱ्याच्या

शिद्दीनें शिवाजी महाराजांचा वेढा उठविण्याकरितां मदत मागितली आहे तर आपलें आरमार येऊन शिद्दीच्या मदतीस जावें, " असा सुरतच्या मोंगल सुभेदाराकडून त्या जहाजाच्या मुख्य तांडेलाला हुकूम आला. त्याचप्रमाणें तें जहाज निघालें असतां वाटेंत तुफानांत सांपडलें. त्याचवेळीं महाराजांचेंहि आरमार जंजिऱ्याच्या वेढा उठवून शिद्दीला साहाय्य करण्यास तयार झालेल्या सुरतच्या सुभेदाराचा सूड उगविण्याकरितां जात होतें. तों वाटेंत तुफान झालें. अशा रीतीनें हा तुफानाचा वर वर्णन केलेला प्रसंग होय.

वरील हकीकत आपल्या शब्दानें सावळ्यानें सांगितल्यावर आपण शेवटीं जहाजावरील दारूच्या पोत्यांना आग कशी लाविली तें त्यानें सांगितलें. तेव्हां महाराज हांसत आनंदानें म्हणाले, "प्रथम आम्हांला वाटलें कीं, तूं समुद्रात उडी टाकल्यानंतर तें जहाज तुफानांत सांपडून बुडालें परंतु तें तसें न बुडतां तुझ्या सूडाला बळी पडलें काय! शाबास, ही तूं आमची मोटीच कामगिरी केली आहेस. एवढ्या मोठ्या शत्रूचा तूं एकट्यानें एका क्षणार्धात समाचार घेतलास याचा लवकरच योग्य विचार होईल. जा आतां कांहीं वेळ स्वस्थ विश्रान्ति घे."

आठ वर्षांनीं आज पिता पुत्राची भेट होत आहे. दोघेहि एकमेकांस भेटण्याकरितां अत्यंत उत्सुक झाले होते. महाराजांनीं सर्व हकीकत विचारून घेतल्यावर सांवळ्याला जावयास सांगितल्यानंतर आरमाराच्या खालच्या भागावर येतांच त्यांना एकान्त मिळाला. सावळ्यानें 'बाबा' असें म्हणून गणोबाच्या गळ्याला घट्ट मिठी

मारिली! परंतु त्यानें उच्चारलेल्या 'बाबा' ह्या एका शब्दानें गणोबाच्या हृदयाचें पाणी करून सोडलें. त्याच्या अंतःकरणाला पीळ पडला. बराच वेळ त्या दोघां बापलेकांनीं मनसोक्त अश्रू गाळले. नंतर क्रमाक्रमानें सांवळ्यानें आपली घरची व आरमारावरील सर्व हकीकत बापाला सांगितली. ती ऐकून आपल्या मुलाच्या साहसाबद्दल आणि शौर्याबद्दल त्याला आनंद झालाच परंतु आपली हेकेखोर बायको आतां सुधारली हें ऐकून तर अतिशय आनंद झाला.

वाचकहो, सांवळ्याचा बाप गणोबा महाराजांच्या जहाजावर कसा आला त्याचा येथें उल्लेख करून आपण कथानकाकडे वळूं. आपली बायको मारामुळें मेली असें समजून गणोबा पळाला ती हकीकत चवथ्या प्रकरणांत येऊन गेली आहे. पुढें गणोबा कुलाब्याहून पळाला तो लपत छपत दुसऱ्या दिवशीं ठाण्याच्या खाडींत येऊन पोंचला. आपल्या मारामुळें बायको मेली हा त्याचा ग्रह शेवटपर्यंत कायम होता. त्यामुळें आपणास सरकार धरणें केव्हां येईल याचा नेम नाहीं असें त्याला वाटत होतें. ठाण्याच्या खाडींत आल्यावर दोन दिवस तेथें एकांतात काढून आपल्यामागें काय गडबड चालली आहे याचा त्यानें शोध केला. परंतु त्याला कुलाब्याचें कांहींच वर्तमान कळलें नाहीं. तेथें असतांना त्याला महाराज गोव्यावर चालून गेले आहेत असें कळलें, तेव्हां त्यांच्या आरमाराला जाऊन मिळावें, असा त्यानें विचार केला. बारदेश हद्दीवर जाईपर्यंत त्याला

१ महाराजांनीं पंचमहाल मर्दनगड, बारदेश इत्यादि प्रान्त काबीज करून ही गोव्याची स्वारी सुरू केली. इ. स. १६६१–६२.

फार हाल आणि संकटें भोगावीं लागलीं. कित्येक मैल तो पायीं रखडत गेला. तेथें बारकाईनें महाराजांच्या आरमाराचा शोध करीत असतां त्याला एक अत्यंत महत्वाची गोष्ट कळली. त्यावेळीं महाराज गोव्यावर चालून आलेले पाहून फिरंगी अतिशय घाबरून त्यानें आपला बचाव करण्याचा पुष्कळ प्रयत्न चालविला होता. परंतु त्यांस यशाचें चिन्ह दिसेना. तेव्हां त्यांनीं कुडाळकर देसायांचा सबनीस अनंत शेणवी यास महाराजांकडे पाठवून तहाचें बोलणें लाविलें. परंतु ह्या शेणव्यानें हितशत्रुत्व दाखवून महाराजांचा घात करण्याचा विचार केला. ही महत्वाची बातमी गणोबा तेथें असतांना त्याला कळली. तेव्हां त्यानें मोठ्या प्रयासानें महाराजांची भेट घेऊन त्यांना शेणव्याच्या विश्वासघाताची ही बातमी सांगितली. पुढें फिरंग्यांनीं तहाचें बोलणें लावलें असता महाराज बेफिकीर रहा-तील ह्या समजुतीवर अनंत शेणव्यानें बरोबर दहा हजार फिरंगी घेऊन एकाएकीं रात्रीचा महाराजांवर छापा घातला. गणोबाकडून शत्रूकडील गुप्त बातमी त्यांना पूर्वींच कळली असल्यामुळें महाराज सावध होते. त्यांनीं सकाळपर्यंत कांहीं एक हालचाल केली नाहीं. परंतु प्रातःकाळ होतांच नव्या दमानें एकदम शत्रूवर चाल करून कापाकापी सुरू केली. त्या कापाकापींत फिरंग्यांचे जवळ जवळ आठ हजार लोक गारद झाले. नंतर महाराजांनीं बारदेश लुटून जाळून उद्ध्वस्त केला. आणि फिरंगी सावकार सांपडले तेवढे पकडून त्यांच्यावर जबर खंड बसविला.

१ त्यावेळीं महाराजांनीं बारदेशांत चोहोंकडे आपलीं ठाणीं बसविलीं तें पाहून गोवें आपल्या हातचें जातें अशी फिरंग्यांस दहशत पडली. अनंत शेणव्याची

ही गोव्याची मोहिम होऊन महाराज आपल्या नव्या प्रांतांची व्यवस्था लावण्यांत गुंतले असतां शहाजी राजे स्वदेशीं यावयास निघाले आहेत असें त्यांना कळलें. त्याबरोबर हातांतील सर्व कामें बाजूला ठेऊन महाराज पितृदर्शनाकरितां निघाले. त्यावेळीं त्यांनीं आपणाबरोबर जी मंडळी नेली त्यांत गणोबाहि होता. गणोबानें महाराजांबरोबर सर्व महाराष्ट्र देश पाहिला. शहाजी राजे परत कर्नाटकांत निघून गेल्यावर महाराजांनीं मोंगलांचे गांवचे गांव आणि मोठमोठीं

---

कपटाची मसलत ऐकल्यामुळें आपणावर असें घोर संकट ओढवलें ह्याबद्दल त्यांस अनुताप झाला. मग त्यांनीं २० हजार मोहरा, उंची वस्त्रें व इतर मौल्यवान् नजराणा वकिलाबरोबर पाठवून महाजांची क्षमा मागितली आणि तह केला. त्या तहांत फिरंग्यांनीं प्रति वर्षी नव्या तोफा आणि कांहीं जवाहिर महाराजांस द्यावें असें ठरलें.

१ ही मोहिम इ. स. १६६२ त पुरी झाली. एवढ्या अवकाशांत महाराजांच्या ताब्यांत कल्याणपासून गोव्यांपर्यंत ३०० मैल लांबीची सगळी कोंकणपट्टी आणि भिमानदीपासून वारणानदीपर्यंत १६० मैलांचा सगळा कोंकण घांटमाथा आला. ह्या मुलखाची रुंदी सरासरी १०० मैल असून त्यावेळीं त्यांच्याजवळ ५० हजार पायदळ आणि ७ हजार घोडेस्वार इतकें सैन्य होतें.

२ शहाजीराजांनीं कर्नाटकांतून येतांना कांहीं उत्कृष्ट तरवारी तयार करून आणिल्या होत्या. त्या त्यांनीं महाराजांना दिल्या, व त्यांच्या अप्रतिम पराक्रमानें स्वतःस परम संतोष झाल्याचें सूचक म्हणून आपल्या हातांतील एक बहुमोल तरवार त्यास दिली. तिचा महाराजांनीं परमपूज्य बुद्धीनें स्वीकार करून ती आपल्या प्रिय व महाप्रतापी पिताच्या हातची यशस्वी तरवार जाणून तिचें नांव ' तुळजा ' असें ठेविलें. व ती ' भवानी ' तरवारीजवळ नित्य पूजेस ठेवली.

शहरें लुटण्याचा सपाटा चालविला. त्यांतहि गणोबानें बरीच वीरश्रीचीं कामें केलीं. मोंगलांना महाराष्ट्रांत अशा रीतीनें त्रस्त केल्यावर महाराजांनीं दुसऱ्या बाजूनें त्यांचीं बार्सिलोर वगैरे धनाढ्य शहरें लुटण्याचा विचार केला. त्यांनीं आपणाबरोबर आणलेलीं थोडीबहुत आरमारावरील मनुष्यें परत पाठवून त्यांच्याबरोबर सिंधुदुर्गाजवळ आरमार सज्ज करावयास हुकूम पाठविला. हा आपला बेत अगदीं गुप्त ठेवण्यासाठीं त्यांनीं बाहेर अशी बातमी पसरविली कीं, मोंगलांच्या जुन्नर येथील छावणीवर हल्ला करण्याच्या तयारीनें आपण चाललों आहों. अशी हुलकावणी दाखवून महाराज एका-एकीं मालवणास प्राप्त झाले. आणि तेथें सज्ज करून ठेवलेल्या आरमारांत बसून ते बार्सिलोरास निघून गेले. सूर्योदयाच्या सुमारास त्यांचे सैन्य शहरांत शिरलें. तेथील लोक अगदीं बेसावध होते. समुद्रांतून कोणी शत्रू आपणावर चालून येईल असें त्यांच्या ध्यानीं मनींहि नव्हतें. महाराजांनीं फक्त एकच दिवस तेथें राहून सुरत शहराप्रमाणें ह्या शहरांत पुष्कळ लूट मिळविली. तेथील लुटीचा ऐवज एकंदर तीन कोटींचा होता. हें शहर लुटल्यानंतर

१ महाराजांची ही भयंकर लूट पाहून औरंगजेबानें आपला मामा शास्ताखान यास एक लक्ष सैन्य देऊन महाराजांच्या पारिपत्याकरितां पाठविलें. त्याविषयीं असें सांगतात कीं, त्याच्या बरोबर ७ शें हत्ती, ५ हजार उंट, ३ हजार दारू गोळ्यानें भरलेले छकडे, २ हजार बायकांचे छकडे व ३२ कोटींचा खजिना होता. हें अवाढव्य सैन्य मुक्काम करी तेव्हां ३ गांव लांब व १॥ गांव रुंद असें पसरे. दि-ल्लीहून दक्षिणेंत यावयाला ह्या बादशाही फौजेला तीन महिने लागले. ह्या खाना-ची महाराजांनीं कशाप्रकारें रग जिरविली तें वाचकांस माहिती आहेच.

तेथून पुढें कुच करून कडवाल, सिद्धेश्वर, मिरज, अकोलें, कोद्रें, हुमाऊद वगैरे ठिकाणें सर करून गोकर्ण महाबळेश्वर त्यांनीं हस्तगत केलें. इतकी मोठी मोहिम आटोपून महाराजांनीं आपलें सर्व आरमार परत पाठवून दिलें. त्या आरमारावर दर्यासागर यांच्या जहाजावर गणोबा परत मालवणच्या किनाऱ्यावर ठाणावर परत आला.

क्रमाक्रमानें ही आपली हकीकत सांगून गणोबा ह्मणाला, " सांवळ्या, हीं पाहिली तीन वर्षें मी महाराजांबरोबर मोहिमींत गुंतल्यामुळें मला तुमची फारशी आठवण झाली नाहीं. परंतु ठाणावर आरमार आल्यानंतर मला प्रत्येक दिवशीं तुझी आणि त्या गोड पोरीची—कमलजेची आठवण होत होती. परंतु काय उपयोग ! तुह्मां पोरांना येऊन भेटण्यास मला तोंड नव्हतें. मी तुमच्या आईला बेसुमार मारून तिचा खून केला आणि स्वतःच्या तोंडाला काळें

१ महाराजांनीं गोकर्ण महाबळेश्वर हस्तगत करून तेथल्या देवस्थानाचें दर्शन घेतलें व तेथें पुष्कळ दानधर्म केला. तेथें बेदनूर प्रान्तांत शिवप्पा नाईक नांमें-करून एक जहागीरदार स्वतंत्र होऊन बसला होता. त्यास महाराजांनीं निरोप पाठविला कीं, "तुह्मी आह्मांस प्रतिवर्षी कांहीं पेशखुष देऊं करून तुमचा वकील आमच्याकडे पाठवावा " ह्या महाराजांच्या निरोपास त्या मगरूर नाइकानें जबाब पाठविला कीं, ' आह्मांकडून पेशखुष घेण्याची तुह्मांस ताकद असल्यास स्वतः येऊन घेऊन जा. ' हा उद्दामपणाचा जबाब महाराजांस सहन न होऊन त्यांनीं वर लिहिलेलीं ठाणीं एकामागून एक सर करण्याचा सपाटा चालविला. तेव्हां नाईक घाबरून गेला, त्यानें तत्काळ एक लाख रुपयांचे जवाहीर आणि उंची पोशाक घेऊन एक वकील पाठविला. आणि मागून अति नम्रता व स्नेह भाव दाखवून तो स्वतः महाराजांच्या भेटीस आला. आणि त्यानें महाराजांपाशीं असा करार केला कीं, आपण दरसाल तीन लाख रुपये खंडणी दाखल देत जाऊं.

फांसून घेतलें ह्मणून तुह्मी माझा तिरस्कार कराल हे विचार मनांत येऊन तुह्मांला न भेटण्याचा मी निश्चय केला. परंतु ह्या गेल्या दोन तीन वर्षांत तो माझा निश्चय डळमळूं लागला. तूं केलेलीं शौर्याचीं कामें, तुला मिळालेलें बक्षीस ह्या सर्व गोष्टी मला वेळोवेळीं कळत गेल्या तेव्हां तुला भेटण्याविषयीं माझा जीव खालीं वर होऊं लागला. शेवटीं आज तो दिवस उगवला. ”

“ पण बाबा, आतां तूं आईला भेटण्याकरितां घरीं येशील ना!”

“ होय तर! आतां तुझ्या आईला केव्हां एकदां मी भेटतों असें मला झालें आहे. पण ही सुरतची मोहिम पुरी झाल्याशिवाय कसं आपणांला जातां येणार! ”

“ ह्मणजे! आतां महाराज सुरतला जाणार काय! ”

“ होय. नुकताच आह्मीं जंजिऱ्याला वेढा दिला होता. परंतु ह्या सुरतच्या मोंगल सुभेदारानें तेथून मदत पाठविल्यामुळें तो वेढा सरकारांनीं उठविला. परंतु शिद्यालाही मदत केली ह्मणून त्या-सुभेदाराची खोड मोडण्याकरितां महाराज तिकडे जात आहेत.”

“ मग मला प्रत्यक्ष महाराजांच्याच आरमारावर रहावयास मिळेल तर! ” महाराज ज्या आरमारावर आहेत त्याच आरमारावर आपणास रहावयास मिळेल हें पाहून मोठ्या आनंदानें सांवळ्या ह्मणाला.

# प्रकरण १० वें.

## बारा महागिऱ्यांची सनद.

त्या वेळच्या दहा पांच शहरांत सुरत शहराची व्यापारांत प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. इंग्रज, फ्रेंच, डच इत्यादि दूर देशच्या व्यापाऱ्यांच्या वडामोडीनें तें शहर सदासर्वकाळ गजबजलेलें दिसत असे परंतु अलीकडे तीन दिवस त्या शहरांतील व्यापाराचा गजबजाट जाऊन महाराजांच्या लष्करांतील शस्त्रांचा सैन्याच्या खणखणाट सर्वत्र ऐकूं येऊं लागला होता. त्यावेळचा देखावा जरी रमणीय नव्हता तरी फारच भव्य दिसत होता. किनाऱ्यापासून जवळच महाराजांची छावणी पडली होती. ठिकठिकाणीं झाडाखालीं, पारावर आणि उघड्या मैदानांत जिकडे तिकडे मराठे गडी पसरले होते. मध्यभागीं जहाजाच्या डोलकाठीच्या शिडाप्रमाणें दिसणाऱ्या एका भव्य राहुटींत महाराज स्वस्थपणें विश्रान्ति घेत बसले होते. त्या राहुटींत वीराला साजतील अशाच वस्तूंचा विशेष भरणा दिसत होता. एखाद्या मोंगल सरदाराप्रमाणें किंवा बादशहाप्रमाणें स्वारी शिकारीच्या वेळीं ऐषआराम आणि सुखोपभोगाच्या वस्तूंचा त्यांना मनापासून तिटकारा होता. आपणांस एक उच्च ध्येय साध्य करावयाचें आहे, ही महत्वाकांक्षा रात्रंदिवस त्यांच्या मनांत घोळत असे. आणि त्या ध्येयाच्या प्राप्तीकरितां त्यांचे सारखे

प्रयत्न सुरू होते. महाराजांच्या जवळ मोरोपंत, प्रतापराव गुजर आणि कांहीं विश्वासू कारकून बसले होते. बाहेरच्या बाजूला हातांत नग्न तरवारी घेतलेले शिपाई पहारा करीत होते. एका बाजूला लुटीच्या सामानाचा ढीग पडला होता. आणि कारकून मंडळी लुटींत मांपड-लेल्या जिनसांची यादी तयार करीत होते.

"अरे, आतां ती कुलाब्याला डाक पाठवाल त्याबरोबर त्या सांवळ्या तांडेलाचेंहि पत्र आहे काय विचारा!" महाराज क्षणभरानें पुढें म्हणाले, "पंत, तो मोठा साहसी दिसतो. !—माझी इच्छा आहे कीं, त्याला ह्या स्वारींत जवळ बाळगून एकाद्या कामाची जबाबदारी तो कसा ओळखतो तें पहावें. नंतर त्याच्या स्वाधीन कांहीं जहाजें करून त्याला ह्या प्रान्ताच्या रक्षणाला ठेवावें."

"महाराजांची निवड योग्य आहे." मोरोपंत म्हणाले. "आज्ञे-प्रमाणें दोन दिवस माझी त्याच्यावर नजर आहे. परंतु त्याच्या धाडसाला नांवें ठेवण्यास कांहीं जागा नाही अशी माझी खात्री झाली. सकाळीं त्यानें इंग्रजांच्या वखारीवर इतक्या शिताफीनें हल्ला केला कीं, क्षणभर मलाहि त्याच्या धाडसाचें कौतुक वाटलें."

"त्याच्या धाडसाबद्दल आमची खात्री झालीच आहे. अशी धाडसाची आणि एक दिलाची आमची पुढली पिढी निपजत जाईल तर आम्ही पेरलेल्या ह्या बीयांचें कांहीं काळानें चांगलें पीक होईल." असें म्हणत असतां दरवाजाजवळ उभा असलेल्या आमच्या कथा-नायकाकडे महाराजांची दृष्टि गेली. तोंच एक दुसरा मनुष्य दरवा-

जांत येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच महाराज ह्मणाले, " कोण !–बहिरजी. आंत ये. "

बहिरजी आंत आल्यावर त्याच्या मागें सांवळ्याही आंत आला. दोघांनींही महाराजांना लवून मुजरे केले.

" बहिरजी, काय खबर आहे ? "

" कांहीं विशेष नाहीं सरकार. औरंगाबादेहून मोहबतखान आणि दाऊदखान हे दोघे सरदार दहा हजार फौज घेऊन सुरतच्या कुमकेस येत आहेत, ह्मणून ही बातमी कळविण्याकरितां सरकार पायांजवळ आलों आहें. "

" ठीक आहे. आणि तांडेल, तुमची काय खबर आहे ? "

" सरकार, बहुत जवाहीर घेऊन तारतार राजा येथें एका वाड्यांत लपला आहे अशी मला आतां खबर लागली. " मोठ्या लीनतेनें सांवळ्यानें उत्तर दिलें.

महाराज क्षणभर विचारात गढलेले दिसले. नंतर त्यांनीं प्रेमानें प्रतापराव आणि मोरोपंत यांच्याकडे पाहिलें. स्वामींच्या नजरेवरून स्वामींची इच्छा सेवकांच्या तत्काळ लक्षांत आली. नुकत्याच ऐकलेल्या दोन्ही बातम्या अत्यंत महत्वाच्या होत्या. त्या दोन बातम्या इतक्या चमत्कारिक होत्या कीं, एकाच्या आशेत गुंतून दुसरीमुळें संकटाला जवळ करण्यासारखें आहे, आणि संकटाला टाळावें, तर लुटीला अंतर द्यावें लागणार ! हे विचार त्यांच्या मनांत आले नाहींत असें नाहीं. महाराजांनीं क्षणभर विचार करून प्रतापराव आणि

मोरोपंत यांचें मत घेतलें. आणि पुढें काय करावयाचे त्याचा बेत ठरविला.

" ठीक आहे पंत, आतां ठरले त्याचप्रमाणें करून सूर्योदया पूर्वी आपण येथें आपला मागमूसहि राहूं देऊं नये ह्मणजे झालें." असें ह्मणून महाराज सांवळ्याकडे वळून पुढें ह्मणाले. " सांवळ्या, प्रतापराव देतात तीं मनुष्यें घेऊन त्या वाड्याचा बरोबर भेद घेऊन ये. पण सांभाळ, भेद काढतांना आपली हालचाल वाड्यांत कोणाला कळूं देऊं नकोस. आणि सकाळप्रमाणें भलतेंच एखादें धाडस मात्र करूं नकोस. जा."

महाराजांनीं दिलेल्या कामगिरीबद्दल सांवळ्याला अत्यंत आनंद झाला. थोड्याच वेळांत तो प्रतापरावांनीं दिलेल्या निवडक लोकांसह निघाला. त्यावेळीं मध्यरात्रीचा अम्मल सुरू झाला होता. महाराजांच्या तीन दिवसाच्या लुटीमुळें सर्व शहर अगदीं सामसूम झालें होतें. लवकरच सांवळ्यानें बादशहाच्या आश्रयानें राहिलेल्या कास्करच्या तातार राजाचा खडानूखडा पत्ता लाविला. त्या वाड्यांत जाण्याचा मार्ग फ्रेंच लोकांच्या वखारींतून होता. तेव्हां तो किंचित्-काल विचारांत पडला. परंतु सांवळयाचें प्रसंगावधान मोठें दांडगें होतें. त्याला फार वेळ विचार करावा लागला नाहीं. बरोबर आलेल्या मंडळीला जवळ बोलावून तो ह्मणाला, " मी ह्या वखारीचा दरवाजा हरप्रयत्नानें उघडावयास लावतों. तोंपर्यंत तुमच्यापैकीं एकानें छावणींत जाऊन महाराजांच्या कानावर ही गोष्ट घालावी व वाड्यांत जाण्याचा रस्ता मोकळा आहे असें सांगावें."

थोडक्या वेळानें त्यांच्यापैकीं एक मनुष्य निघून गेल्यावर सांवळ्यानें

आपल्या सात आठ मंडळीसह एकदम मोठ्यानें ' हरहर महादेव ' अशी गर्जना करून वखारीच्या दरवाजावर हल्ला केला. वखारींत एकच गडबड उडाली. महाराज सुरतला आल्यापासून फ्रेंच वखारवाल्यांना दहशत पडली होती. मराठ्यांची आपणावर केव्हां वक्रदृष्टि होईल याचा नेम नाहीं हें ते जाणून होते, ह्मणून ते पूर्वींपासून तयारीनें होते. आपल्या वखारीवर मराठ्यांनीं हल्ला केल्यास त्यास शरण जाऊन वखारीचा बचाव करण्याचा त्यांनीं प्रथमपासून विचार करून ठेविला होता. शेवटीं तो दिवस आज उगवला असें त्यांना वाटलें. दरवाजावर मराठ्यांची गडबड ऐकूं येतांच त्यांनीं मुकाट्यानें दरवाजा उघडला. इतक्यांत स्वतः महाराज आपल्या निवडक लोकांनिशीं तेथं येऊन ठाकले. फ्रेंचांनीं कांहींएक गडबड न करितां त्यांना वखारींतून जाण्याचा मार्ग दिला. जवळ जवळ एक प्रहरभर महाराजांनीं तार्तार राजाचा वाडा लुटला. त्यांत त्यांना सोनें, रुपें, जवाहीर वगैरे बहूमोल सामान सांपडलें.

अरुणोदयापूर्वी एक घटका महाराज परत छावणींत परतले. परत येतांच क्षणाचाहि विलंब न करतां सर्व लुटीचें सामान उंटावर भरण्याचा त्यांनीं हुकूम दिला. नंतर दौलतखान आणि दर्यासागर ह्या आपल्या आरमारावरील सरदारांस आणि इतर खलाशांना जवळ बोलावून त्यांच्या समक्ष सांवळ्याचा हात धरून महाराज ह्मणाले, " माझ्या पद्मदुर्गीत सध्यां कांहीं जहाजें तयार होत आहेत. त्यापैकीं

१ मालवणजवळ हा पद्मदुर्ग किल्ला आहे. तेथें जहाजें बांधण्याचा मोठा कारखाना होता. सिंधुदुर्ग येथें आरमार ठेवण्याची जागा आणि विजयदुर्ग व कुलाबा येथें आरमारावरील तोफा व दारूगोळा ठेवण्याच्या महाराजांच्या जागा होत्या.

बारा महागिऱ्यांवर मी तुला मुख्य तांडेल नेमिला आहे. त्याबद्दल ही तुझी सनद– " असें ह्मणून मोरोपंतानीं पुढें केलेला कागद घेऊन महाराजांनीं तो सांवळ्याच्या हातीं दिला, " तूं आपलीं जहाजें घेऊन दर्यासागर सरदाराच्या हुकुमानें रहावें. "

सांवळयानें सनद हातांत घेऊन महाराजांच्या पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां महाराजांनीं त्याला उठवून गणोबाच्या हवालीं केलें. त्यानें प्रेमभरानें आपल्या मुलाला हृदयाशीं घट्ट धरिलें ते पाहून महाराज पुढें ह्मणाले, " गणोबा, ह्या तुझ्या मुलाला नीट सांभाळ. त्याच्या हूडपणाकडे लक्ष ठेव. भलत्याच कामांत त्याला साहस करूं देऊं नकोस. आतां आह्मी दक्षिणेंत जात आहोंत, परंतु ह्या मुलखाची सर्व जबाबदारी तुह्मां जबाबदार मंडळीच्या शिरावर आहे, हें लक्ष्यांत ठेवा. "

एखाद्या यक्षिणीची कांडी फिरावी त्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर शहरांतील लोकांना वाटूं लागलें. पूर्व रात्रीं सर्व शहरांत वारुळांतून चवताळून बाहेर पसरलेल्या मुंग्यांप्रमाणें सर्वत्र दिसणारे मराठे गड्यां-पैकीं एकही गडी आतां कोठेंहि दिसेना ! महाराज दक्षिणेंत निघून

१ महाराज सुरत शहराहून लूट घेऊन परत जात असतां वणी दिंडोरीजवळ त्यांची आणि मोंगल सैन्याची गांठ पडली. तेथें दोन्ही सैन्यांचें घोर रणकंदन माजलें. महाराज स्वतः त्यावेळीं अंगांत चिलखत, डोकीस शिरस्त्राण आणि दोन्ही हातांत दोन पट्टे चढवून लढत होते. प्रतापराव वगैरे सरदारांस पिछाडीचें रक्षण करावयास सांगून ते स्वतः शत्रूवर चालून गेले. हें तुंबल युद्ध सारखें दोन प्रहर चाललें होतें. तीन हजार मोंगल रणांत पडले व मोंगल सरदार रणांतून पळून गेले. अशा रीतीनें मोंगलच्या फळ्या उडविल्यावर त्यांच्या तळावर हत्ती, घोडे वगैरे सामानसुमान सांपडलें तेवढें घेऊन ते सिंहगडाकडे निघाले. तों त्यास रायबा-

गेल्यावर त्यांचें आरमार परत निघालें. आतां सांवळयाला स्वतंत्र रीतीनें विचार करण्यास पुष्कळ अवसर सांपडला. त्याचें मन त्याला आतां वसईच्या खाडींत ओढूं लागलें. मोहनेची मोहक मूर्ति प्रतिक्षणीं आतां त्याला दिसूं लागली. तिला भेटून जवळ जवळ चार वर्षें झालीं होतीं. तितक्या अवधींत त्याला मोहनेची कधीं कधीं आठवण होत असे. परंतु महिन्यापूर्वी कुलाब्यास असतांना तुकोजीनें त्याच्याजवळ मोहनेबद्दल गोष्ट काढल्यापासून तो एक त्याच्या विचाराचा मुख्य विषय बनला होता. गणोबाचीहि स्थिति सांवळया-प्रमाणें झाली होती. घर सोडून त्याला नऊ दहा वर्षें झालीं होतीं. आपल्या बायकोचा पूर्वींचा स्वभाव साफ बदलला असून अलीकडे तिची शरीर प्रकृति अस्वस्थ असते असें त्याला सांवळयानें सांगितल्यापासून तिला जाऊन तावडतोब भेटावें असें त्याच्या मनांत फार होतें. त्यावेळीं तो महाराजांच्या बरोबर आरमारावर होता. कदाचित् महाराज कुलाब्यास मुक्काम करतील असें वाटलें होतें परंतु त्यांनीं मध्यंतरीं कोठेंच मुक्काम न करितां एकदम सुरत बंदर गांठ ल्यामुळें मोहिम पुरी होईपर्यंत त्या दोघांना स्वस्थ बसावें लागलें.

" सांवळ्या, आतां घरचा लागला ध्यास मनाला, खरं ना रे ? "

---

गीण नांवाच्या एका शूर बाईनें अडविलें. हिचा नवरा माहूरचा देशमुख उदाराम पूर्वी एका लढाईंत पडला असतां आपल्या सैन्याला धीर देऊन हिनें शत्रू जिंकल्यावरून औरंगझेबानें तिला रायबागीण हा किताब दिला होता. हिला महाराजांनीं लवकरच जेरीस आणलें, तेव्हां ती शरण आली. त्यांनीं तिचा आदरमान करून व तिला वस्त्रालंकार देऊन परत पाठविलें.

गणोबा ह्मणाला, " असाच जर वारा राहिला तर उद्यां सकाळपर्यंत वसईची खाडी आपण सहज गाठूं. मग मुंबईची हद्द कांहीं लांब नाहीं. पण कायरे सांवळ्या, ती पोर कमलमा, आतां मोठी दिसत असेल—थेट अगदीं आईच्या वळणावर गेली असेल, खरंना ! आणि सांवळ्या, आतां तुमच्या लग्नाचीहि व्यवस्था केली पाहिजे खरं ना ! "

लग्नाचें नांव काढतांच सांवळ्यानें चट्कन् आपल्या बापाच्या तोंडाकडे पाहिलें. मोहनेसंबंधानें अद्यापि त्यानें गणोबाला कांहींच सांगितलें नव्हतें. परंतु आतां अनायासें गोष्ट निघालेली पाहून त्यानें गणोबा-जवळ मोहनेविषयीं बोलण्याचा विचार केला. तो ह्मणाला, " बाबा, कुलाब्यास जाण्यापूर्वीं आपण प्रथम वसईच्या खाडींत उतरूं. तेथें, ज्यांच्याकडे मी तीन चार वर्षें काढिलीं ते सुभानजी नाईक राहतात!"

" तूं सुभानजीकडे कां वसईच्या खाडींत होतास ! मग मला नाहीं तें त्याचें नांव सांगितलेंस ! मी त्याला चांगला ओळखतों. आठ वर्षांपूर्वीं वसईच्या खाडींत आमचें जहाज लागलें होतें, तेव्हां मी रोज त्याच्याकडे जात असें. त्याला मोहना नांवाची एक मुलगी आहे ना ! "

" होय–होय ! तीच–तीच—"

" तीच ! तीच काय ? "

सांवळ्या गोंधळला. जणूं काय आपण बापाला मोहनेसंबंधानें सर्व गोष्टी सांगितल्या आणि मोहना कोण, असें तो विचारीत आहे असेंच त्याला वाटलें. त्यानें एखाद्या अर्धवट शुद्धीवर असलेल्या मनुष्या-प्रमाणें वरील उत्तर दिलें. सांवळ्याची ही चमत्कारिक स्थिति गणोबाच्या लक्षांत यावयास फारसा वेळ लागला नाहीं. कारण

ल्हानपणीं मोहनेला त्यानें स्वतः पाहिली होती. शिवाय चार वर्षें सांवळया तिच्याजवळच होता, तेव्हां त्यांचे कांहींतरी सूत जमलें असावें असा त्यानें तर्क केला. थोड्या वेळानें तो ह्मणाला, " मग त्या मोहनेला भेटावें असें तुझ्या मनांत आहे काय ? "

" होय. " सांवळ्यानें एकच उत्तर दिलें.

सुरतचें बंदर सोडल्यापासून दहाव्या दिवशीं सकाळीं त्यांचें आरमार वसईच्या खाडींत आलें तेथें गोडें पाणी आणि धान्य याचा पुरवठा घेण्याकरितां जहाजें खाडीला लावावीं लागलीं. सर्वांच्या पूर्वी सांवळया जमिनीवर उतरला. तें परिचयाचें ठिकाण पुनः पाहून त्याला समाधान झालें. मोहनेसह चार वर्षांपूर्वी तो ज्या ज्या ठिकाणीं खेळला होता, त्या त्या ठिकाणीं त्याची दृष्टि सहज फिरली. इतक्यांत दूर अंतरावर एका झोंपडीजवळ एक प्रिय वस्तु त्याच्या दृष्टीस पडली. तोंच त्याची दृष्टि तेथें स्थीर झाली ! क्षणभरानें तो प्रियवस्तुरूपी लोहचुंबक त्याला आपणाजवळ ओढूं लागला, तेव्हां झप्झप् पावलें टाकीत सांवळ्या झोंपडीजवळ गेला.

" मोहना. "

वाचकहो, ती मोहनाच होती ! सांवळ्यानें तिच्या अगदीं जवळ जाऊन तिला हांक मारिली. परंतु मोहनेला त्याची हांक ऐकूं आली नाहीं. ती अगदीं ज्ञानशून्य झाली होती. क्षणभरानें सांवळयानें तिला दुसरी हांक मारिली. तेव्हां एखादा मनुष्य गाढनिद्रेंतून एकदम जागा होतो, त्याप्रमाणें ती एकदम दचकली ! तिनें किंचित् वर मान केली. आणि तात्काळ मान खालीं घातली. चार वर्षांत तिच्या वर्तनांत इतका

फरक कां पडावा ? त्यांच्या शेवटच्या भेटींत ती त्याच्या बरोबर एखाद्या खेळगड्याप्रमाणें खेळली होती. परंतु आतां तिला सांवळ्या-कडे वर मान करून पाहण्याचा धीर होईना.

" मोहना, तूं माझी ओळख विसरलीस वाटतें ?"

पुनः एकदां तिनें हळूंच तिरक्या नजरेनें वर पाहिलें. तिच्या नेत्रांत औत्सुक्याची चमक मारूं लागली. तिच्या सर्वांगाला कंप सुटला होता. किंचित् काळानें पुढें होऊन सांवळ्यानें तिचा हात धरला. इतक्यांत मागून गणोबाचा आवाज ऐकूं आला.त्याबरोबर मोहना किंचित् बाजूला झाली.

" काय मोहना, तुझा बाप कुठें आहे ? चिलीम देतेस काय भरून ?" गणोबा पुढें होऊन ह्मणाला.

मोहनेला आतां धीर आला. दरवाजाच्या मागें असलेली चिलीम घेत असतां तिनें सांवळ्याकडे तिरक्या दृष्टीनें क्षणभर पाहिलें. त्याच्या अंगांत रुद्दार अंगरखा आणि पायांत मांडचोळणा असून कंबरेसभोंवतीं गुंडाळलेल्या शेल्यांत बांकदार तरवार होती. ह्या पोशाखानें तो तिला भव्य आणि मोहक दिसत होता. गणोबाच्या हातांत चिलीम देत असतां " बाबा सकाळीं कुलाब्यास वाड्यांत गेले आहेत," असें म्हणून ती सांवळ्याकडे पहात पहात आंत गेली. सांवळ्याहि तिच्या मागून आंत गेला. आणि गणोबा स्वस्थ-पणें बाहेरच्या पडवींत चिलीम ओढीत बसला. आंत गेल्यावर सांवळ्यानें पुनः विचारलें, " बाबा कुलाब्यास कां गेले आहेत ?"

" आपलेच सर्व प्रताप हे ! ह्या चार वर्षांत येथली तुह्मांला आठवण तरी झाली कां ? मी ह्मटलं होतं ना, कीं, तुह्मीं एकदां येथून

गेलां, ह्मणजे तुह्माला येथली आठवण देखील होणार नाहीं ह्मणून!"
आतां मोहनेचा बराच धीर चेपला. ती किंचित् अधोवदन करून पुढें ह्मणाली, "जाऊन चार वर्षें झालीं पण कधीं शोधसमाचार तरी घ्यावयाचा होता! परवां एकाएकीं वाड्यांतून तुकोजीराव येथें आले आणि तुमचा शोध करूं लागले. तेव्हां कुठें आह्मांला कळलं! तुह्मी एकाएकी नाहींसें झालां असं कळल्यापासून माझी काय अवस्था झाली ती तुह्माला काय ठाऊक!"

मोहनेच्या डोळयांत अश्रुबिंदु आले. कारण सांवळयाच्या सुखदुःखावर आपलें सुख दुःख अवलंबून आहे असें अलीकडे तिला वाटूं लागलें होतें. सातव्या प्रकरणांत सांवळयाला महाराजांच्या आरमारावर नेण्याकरिता कुलाब्याहून तुकोजी आला असतां सुभानजीनें सांवळयाच्या लग्नाची गोष्ट काढिली होती, हें वाचकांस स्मरत असेल. ती गोष्ट त्यानें सांवळ्या गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं मोहनेला सांगितली, आणि ह्मणाला, "सांवळ्याचा आणि तुझा जोडा अगदीं नामी दिसेल. एवढ्या लहान वयांत त्यानें महाराजांच्या आरमारावर असामी मिळविली, तेव्हां तो खात्रीनें लवकरच नांवलौकिकाला चढेल." परंतु त्यावेळीं मोहनेला सुभानजीच्या ह्या बोलण्याचें विशेष महत्त्व वाटलें नाहीं. कारण त्यावेळीं तिचें वय लहानच होतें. पुढें सांवळ्या आरमारावर जाऊन दोन वर्षें झाल्यावर तिला त्याची मधून मधून आठवण होऊं लागली. तोंपर्यंत तिच्या मनांत खऱ्या प्रेमाचा उदय झाला नव्हता. परंतु पुढें लवकरच सांवळयानें मिळविलेल्या नांवलौकिकाच्या गोष्टी तिच्या कानावर येऊं लागतांच स्वभावतः तिचें मन सांवळ्याविषयीं साशं

दिवस विचार करूं लागलें. म्हाताऱ्या मिमेचा खून करणाऱ्या तिच्या मुलाला मोठ्या धाडसानें सांवळ्यानें पकडून मोठें बक्षिस मिळविलें, ही बातमी तिला कळतांच सुभानजी म्हणालेल्या शब्दांची बरचेवर आठवण होऊं लागली. आतां सांवळ्याविषयीं तिला विशेष प्रेम वाटूं लागलें. याप्रमाणें तिच्या मनांत खऱ्या प्रेमाचा उदय होऊन थोडे दिवस झाले नाहींत तोंच एके दिवशीं सकाळीं म्हातारा तुकोजी वसईच्या खाडींत आला. त्यानें सांवळ्याविषयीं सर्व वृत्तांत त्यांना सांगितला. 'बाप आजारी आहे, त्याला पाहण्याकरिता चल,' असें सांगून फसवून सांवळ्याला कोणी नेलें ही बातमी कळतांच आपणावर आकाश कोसळलें असेंच मोहनेला वाटलें. पंधरा दिवस तिला अन्नपाणी देखील गोड लागेना, अशी तिची शोचनीय स्थिति झाली. ती दिवसेंदिवस कृश होऊं लागलेली पाहून सुभानजीला चिंता उत्पन्न झाली. त्यानें तिची पुष्कळ प्रकारें समजूत केली. शेवटीं सांवळ्याची चौकशी करण्याकरितां तो कुलाब्यास गेला. त्यावेळीं वाड्यात महाराजांच्या आरमारावरून डांक आली होती. त्यांत सांवळ्याची मोंगलांच्या जहाजावरून सुटका आणि त्यानें केलेल्या धाडसाचा सर्व वृत्तांत होता. ही आनंदाची बातमी जेव्हां सुभानजी घेऊन आला तेव्हां मोहनेला आराम पडूं लागला.

" खरंच का मोहने, मी नाहींसा झालों असें कळतांच तुला इतकं दुःख झालं ! " तिची समजूत करीत सांवळ्या म्हणाला.

" झालं किंवा नाहीं, तें आतां सांगून काय उपयोग ! आम्हीं असं दुःखानं झुरावं पण त्याचं पुरुषांना कांहीं आहे का ! शेवटीं

चौकशीकरितां बाबा वाड्यांत गेले, तेव्हां कळलं, स्वारी मोठं नाव मिळवून महाराजांबरोबर सुरतला गेली असं ! "

" तें ऐकून तर शेवटीं आनंद झाला ना ! "

" अशी बातमी ऐकल्यावर कां नाहीं होणार आनंद ! पण ते तुमच्याबरोबर आले आहेत ते कोण ? "

" कोण म्हणजे !—माझा बाप." " खरेंकीं काय ? " सांवळ्यानें आपल्या बापाची ओळख करून देऊन नंतर सुरतच्या मोहिमीचा सर्व वृत्तांत तिला कळविला. महाराजांनीं त्याला बारा महागिऱ्यांची सनद दिलेली ऐकून तिला अत्यंत आनंद झाला. तो लवकरच मोठ्या नांव-लौकिकाला चढेल ह्या सुभानजीच्या भविष्याची तिला आतां पदोपदीं सत्यता वाटूं लागली. थोड्या वेळानें गणोबा आंत आला. त्याला पाहतांच मोहना उठून दूर झाली.

" बैस पोरी, कां उठतेस ! तूं आतां कांहीं मला परकी नाहींस." गणोबा म्हणाला, " पण तुझा बाबा कधीं येणार ? "

" संध्याकाळपर्यंत येतील. सूरतहून तुमच्याकडून कांहीं बातमी आली आहे काय तेवढें पाहून येतों, असें ते सकाळीं जातांना मला म्हणाले. शिवाय मध्यंतरीं ही गडबड झाल्यापासून सरूबाई—"

" मध्यंतरीं गडबड ! कसली गडबड ? " उत्सुकतेनें गणोबानें विचारलें.

" मला फसवून मोंगलांनीं नेलें तीच गडबड असेल दुसरं काय ! खरंना मोहने ? "

" होय. तेव्हांपासून सरूबाईची प्रकृति फार बिघडली आहे. त्यांनीं तुमचा सारखा ध्यास घेतला आहे–"

" खरं की काय ? मग सांवळ्या, मी जातों पुढें. तूं ये साव-काश सुभानजीला भेटून. आतां माझं चित्त नाहीं लागणार इथें ! "

" मग आतांच जाणार तर थोडावेळ थांबा, जेवण तयार आहे." मोहना ह्मणाली.

" बरं तर मग. आटप लवकर. "

मोहनेनें तात्काळ जेवणाची तयारी केली. आज तिला काम करण्या-ला इतका उत्साह आला कीं, तास दीड तासांत तिनें एकदोन पक्कान्नें जास्त करून पानें वाढिलीं. तिची चलाखी पाहून गणोबा फारच खूष झाला. जेवण आटोपून गणोबा चिलीम घेऊन बाहेर येतो तों जहाजावरून दर्यासागर तांडेलाचें त्यांना बोलावणें आलें. असें एकाएकीं जहाजावरून बोलाविण्याचें कारण काय हें त्यांना कळेना. तेव्हां चौकशी करण्याकरितां सांवळ्या प्रथम जहाजावर गेला. तेथें त्याला निराळीच बातमी कळली.

महाराजांनीं भडोच शहरावर हल्ला करण्याचा विचार केला. आपल्या कुमकेकरितां आरमारानें यावें अशी त्यांची इच्छा होती. ह्मणून आरमारानें तावडतोब परत यावें अशी महाराजांची आज्ञा घेऊन आरमाराच्या प्रत्येक मुक्कामावर जासूद रवाना झाले होते. त्यापैकीं एक जासूद वसईच्या खाडीत आला होता. त्यानें आणलेलें महाराजांचें आज्ञापत्र पाहून दर्यासागर तांडेलानें आरमार तयार करण्याचा हुकुम दिला आणि गावांत पाण्याचा आणि धान्याचा पुरवठा आणण्याकरितां गेलेल्या खलाशांना तावडतोब परत बोलाविलें.

ही सर्व चौकशी करून सांवळ्या परत आला. महाराजांचा हुकूम आला आहे असें कळतांच गणोबा संकटांत पडला. एकीकडे स्वामिकार्य आणि दुसरीकडे घरीं जाण्याची उत्कट इच्छा! शेवटीं स्वामिकार्य प्रथम करणें हेंच आपलें आद्य कर्तव्य मग बायको आणि घरदार, असेंच त्याचें मन त्याला सांगूं लागलें. कुलाब्यास जाण्याचा बेत रहित करून तो जहाजावर जाण्यास निघाला. जातांना त्यानें मोहनेला जवळ बोलावून सांगितलें. "माझ्या मनांतून कुलाब्यास जाण्याचें फार होतें. आज कितीतरी वर्षांनीं मी हा कुलाब्यास जाणार होतों. पण मध्येंच हा महाराजांचा हुकूम आला. आतां काय?–नाइलाज आहे. बायकोला भेटण्याचा अद्यापि योगच आला नाहीं. हेंच खरं! आतां तूं इतकंच कर, सुभानजी आल्यावर त्याला ही सर्व हकीकत सांगून आह्मीं परत येईपर्यंत त्यानें सांवळ्याच्या आईची काळजी घ्यावी, आमच्या घराकडे लक्ष ठेवावें असा माझा त्याला निरोप सांग."

मोहनेनें 'होय' ह्मणून उत्तर दिल्यावर गणोबा पुढें निघाला. सांवळ्या आणि मोहना एकटीं राहिलीं. इतक्या वर्षांनीं भेट होऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच पुनः वियोग होणार, हे विचार मनांत येतांच मोहनेला अनावर हुंदका आला. आमच्या नायकाला मोहनेची समजूत करण्यास किती प्रयास पडले तें येथें सविस्तर रीतीनें लिहूं गेल्यास हें प्रकरण फारच वाढेल. करितां येथें इतकेंच सांगतों कीं, शेवटीं सांवळ्यानें मोहनेचा मोठ्या दुःखानें निरोप घेतला!

# प्रकरण ११ वें.



## कुलाब्यांतील अस्वस्थता.



त्यावेळीं सूर्यबिंब क्षितीजाखालीं जाऊन पश्चिम दिशेकडील आकाशास आरक्तता आली होती. त्याचें प्रतिबिंब सृष्टिसुंदरीच्या मुखावर पडून संध्यासमयीचें कृष्णवसन परिधान करतांना नैसर्गिक लज्जेमुळें तिचेंहि मुखमंडळ आरक्त झालेलें दिसत होतें. त्यावेळीं समुद्र अगदीं शांत होता, समुद्रकांठचा प्रदेश शांत होता आणि वाराहि शांत वहात होता. असें सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलेलें दिसत होतें. अशावेळीं समुद्रकांठच्या वाळूंत, जिला बरीच वर्षे समुद्राच्या पाण्याचा स्पर्श झाला नाहीं अशी एक लहानशी नौका ठेविली होती. तिला टेकून वाळूंत नवयौवनसंपन्न एक तरुण स्त्री त्या शांत समुद्रांत फार दूरवर एकाग्र चित्तानें पहात विचारमग्न बसली होती. तिचें वय वीस वर्षांचें असून तिचा वर्ण गोरा होता. ती मध्यम बांध्याची पण सशक्त होती. तिचे डोळे पाणीदार व सुंदर आणि अवयवांची ठेवण अगदीं रेखल्याप्रमाणें असून चेहरा अत्यंत मोहक व फारच रमणीय होता. ती कोण बरें असावी ? आणि कोणाची बरें वाट पहात असावी ? वाचकहो ! ती स्त्री तुमच्या चांगली ओळखीची आहे. तिची तुम्हांला

लवकरच ओळख पटेल. पण ती पहा–दूर दुसरी एक स्त्री येत आहे. तीहि वयानें आणि रूपानें हिच्याच सारखी आहे. परंतु किंचित् उंच आहे. तीहि तुमच्या ओळखीची आहे. तिला थोडी जवळ येऊं द्या ह्मणजे दोघींचीहि आपणास ओळख पटेल !

" मोहना. "

तिनें एक, दोन, तीन हांका मारिल्या. परंतु छे ! मोहनेचें लक्षच नव्हतें, इतकी ती विचारचक्रांत गुरफटली होती !

" काय ग बाई तरी ! इतक्या हांका मारतें पण हिचं लक्ष तरी आहे कां ?—मोहने—ए—"

" कोण ?—कमलजा !"

" इतक्या मोठ्यानें ओरडलें, पण तुला ऐकूं नाहींना आलें ! काय ग बाई तरी ही विचार करण्याची तऱ्हा ! "

" केव्हां ग ओरडलीस ? मी तर तुझ्या पहिल्या हांकेला मागें वळून पाहिलें. "

" पण मोहने, हें चांगलं कां ? त्या मेल्या फिरंग्यांनीं गावांत कोण धुमाकूळ मांडिली आहे आणि तूं येथें एकटीच ! काल तुकोबानें आणि तुझ्या बाबानें सांगितलं ना कीं, तुह्मीं एकट्या दुकट्या घराबाहेर जात जाऊं नका ह्मणून ! नाहीं कां मोहने हें तुझ्या लक्ष्यांत ? एकटी येऊन जी तूं येथें बसतेस ती तुला भीति तरी कशी नाहीं वाटत ? "

" कसली ग आली आहे भीति ! कोण नेणार आहे मला कमळजे ! मी कांहीं पोर आहे वाटतं ! "

" आणि इतक्या जणांना त्या मेल्या फिरंग्यांनीं धरून नेलं, तीं सर्व कांहीं पोरंच होतीं वाटतं ! चल उठ–"

" बैस ना पण जरा–जाऊं आतां घरीं. "

" बैस ना काय ? कोणीं यावयाचं आहे वाटतं ? पत्रबित्र आलं आहे वाटतं हंबीररावांचं–हं–तेव्हांच ! तुला कळलं आहे तर, महाराजांनीं पाठविलेल्या सैन्याबरोबर दादा येणार तें ! आतां समजलें. तरीच ह्मटलं, आमची मोहना इथें कां ?"

" असं ! आणि दुसरं कांहीं नाहींना समजलीस ? "

" दुसरंहि कांहीं समजलें असतें पण ह्मणतात ना ! "

" काय ह्मणतात ? ह्मणूं दे ह्मणतात तर. पण तूं एक गाणं ह्मण आतां ह्मणजे झालं ! खरंच कमलने, त्या दिवशीं तूं ह्मटलंस तें गाणं मला फार आवडलं. ह्मण ग तें गाणं. "

" खरंच का आवडलं ?–अगदीं मनापासून आवडलं ?–बरं तर म्हणतें–

हो मुग्ध वधूंचा संग विलासी दंग क्रिडाशाली ॥
यामध्यें साजे पहा गडे वनमाळी ॥ ध्रु० ॥
कृष्णाचें कलेवर निळें, वरी पिवळें वस्त्र तो नेसे ।
चंदनें चर्चित तनू हरीची विलसे ॥
मणीकुंडल–मंडित गंड–युगुल उदंड शोभे तैसें ।
गालांत पहा गडे मंद मंद हरि हासे ॥
पुष्ट–स्तन–भारें करून, प्रीतीनें धरून हरीला बैसे ।
कोणी स्त्री पंचम सुरें पुढें गातसे ॥
( चाल )–कोणी विलास चंचल नेत्रें पाहुनी ।

१ ' श्रीरंग गोपिकोत्संग धरुनि करि दंग० ' या चालीवर.

करि मदनानें वश हरिला कामिनी ।
चिंती मग हृदयीं त्याला बसवुनी ।
कानांत सांगतें असें वदुन गालास दूसरी शिवली ॥
मग पुलकित हरिला चुंबन देति झाली ॥ १ ॥

* * * *

* * * *

" अरे, पण मी रमलें काय इथें ! अद्यापि मला तात्याकडून आईचं औषध आणावयाचं आहे. चल मोहने, चट्कन जाऊन येऊं."

वाचकहो, कमलजा आणि मोहना यांना एकत्र पाहून तुह्मांला आश्चर्य वाटलें असेल ! त्याचा येथें उल्लेख करून आपण पुढें जाऊं. गेल्या प्रकरणांत आपण मोहनेला वसईच्या खाडींत पाहिलें होतें. त्या गोष्टीला आज चारवर्षे अधिक लोटलीं. सांवळ्या आणि गणोबा वसईच्या खाडींतून मोहनेचा निरोप घेऊन गेले ते अद्यापि परत आले नव्हते. गणोबा परत येईपर्यंत त्याच्या आजारी बायकोची–सरूची काळजी घेणें आपलें कर्तव्य आहे असा विचार करून सुभानजी मोहनेला घेऊन कुलाब्यास येऊन राहिला होता. तो कुलाब्यास येण्यापूर्वी तुकोबानें आपण योजलेला मोहनेबद्दल विचार सरूला सांगितला होता. तेव्हां ती आल्यावर सरूला आपली सून पसंत पडली. लवकरच कमलजा आणि मोहना यांची चांगली गट्टी जमली. तीन वर्षे त्यांनीं तीन दिवसांप्रमाणें मोठ्या मौजेंत घालविली. सध्यां दोघींनींहि मुग्धावस्थेंतून तारुण्यावस्थेंत प्रवेश केला होता. सुभानजी आणि मोहना कुलाब्यास येतांच सरूनें आपलें दुकान बंद करून टाकिलें होतें. अलीकडे तिची प्रकृति फारच बिघडली होती. तिला आतां वरचेवर

पूर्वीच्या आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होई. आपण आपल्या पतीब-रोबर प्रेमानें वागलों असतों तर सांप्रत आपल्या मनाची अशी तळ-मळ न होतां आपण सुखी असतों असें तिला वाटे. आपल्या दुष्ट व हेकेखोर स्वभावामुळें आपण पतीबरोबर विरोध केला नसता तर आपले तारुण्याचे दिवस सुखाचे गेले असते असे अनेक विचार तिला आतां चैन पडूं देत नव्हते. जवळ जवळ चौदा वर्षें ती पति विरहाची शिक्षा भोगीत होती. आज तिचें मन अगदींच अस्वस्थ झालें होतें. ती आपल्या मनाचें समाधान करण्याचा सारखा प्रयत्न करीत होती. आठ दिवसांपूर्वी तिनें सांवळ्याबद्दल फारच आनंदाची बातमी ऐकली होती. महाराजांनीं राज्याभिषेकाच्या समारंभांत त्याला पोशाख आणि 'हंबीरराव' ही पदवी दिली, ही बातमी कुला-ब्यास कळली होती. शिवाय त्यादिवशीं सर्वत्र मोठमोठे उत्सव होऊन गांवोगांव साखर वाटली होती. सरू ह्या सर्व आनंदाचे दिव-सांची आठवण करून मनाला आळा घालण्याचा बराच प्रयत्न करीत होती. परंतु तिच्या मनाची हुरहुर कमी होईना. आणि तसें होण्यास कारणही होतें. अलीकडे मोगल आणि शिद्दी यांच्या आर-मारावरील सरदारांनीं मुंबई बंदरांत शिरून महाराजांच्या ताब्यांतला प्रांत उध्वस्त करण्याचा घाट घातला होता.

१ हीं मोगल आणि शिद्दी यांचीं एक झालेलीं आरमारें इंग्रजाच्या परवानगीची दरकार न करितां मुंबईच्या बंदरांत शिरून महाराजांच्या ताब्यांतील प्रांत लुटून उध्वस्त करूं लागलीं. त्यांनीं पुष्कळ प्रजेची कत्तल केली; व पुरुष, बायका व मुलें पकडून त्यांस गुलाम म्हणून विकलें. हें त्यांचें करणें मुंबईचा इंग्रज गव्हर्नर आंगिअर यास मुळींच आवडलें नाहीं. त्यानें त्यांच्या वरिष्ठांपाशीं त्याबद्दल-

सरूनें औषध आणण्याकरितां कमळजेला पाठवून पुष्कळ वेळ ़ाला होता. अद्यापि ती परत येईना, किंवा मोहनाहि कुठें दिसेना ई पाहून तिला काळजी वाटूं लागली. शेवटीं तिला खोलींत बसून चैन पडेना ह्मणून ती हळुहळू बाहेर आली. त्यावेळीं सुभानजी ाहेर गेला होता. कर्मधर्मसंयोगानें थोड्यावेळानें तुकोजी काठी कीत टेकीत तेथें आला.

" कां सरूबाई, हा दरवाजांत पहारा चालला आहे वाटतं ? "

" पहाराहो कसला दादा, " दरवाजाला धरून हळुहळू उठत रू ह्मणाली, " संध्याकाळपासून ही कमलजा तात्याकडे औषध ाणण्याकरितां गेली आहे. तिचा आणि ह्या मोहनेचा–इतकी रात्र ाली तरी ठिकाण नाहीं–"

" काय सांगूं तुह्माला सरूबाई, तरी मी तुह्मांला रोज ओरडून ांगतों, ह्या हूड पोरींना एकट्यादुकट्या कुठें पाठवीत जाऊं नका णून ! दिवस कसे फिरले आहेत ते पहाता ना ?–बरं सुभानजी दा कुठें आहे ? "

" ते कुठेंसे बाहेर गेले आहेत. "

" बरं तर तुह्मीं दरवाजा लावून घ्या, काय समजलां ? मी येतों त्याकडून शोध करून. "

---

ार केली. व तो ह्मणाला कीं, तुमच्या अशा कृत्यानें शिवाजी महाराज आप- र नाहक आग पाखडतील. परंतु ह्या त्यांच्या तक्रारींचा कांहींच उपयोग ़ा नाहीं. शेवटीं त्यांच्या पारिपत्यास रायगडाहून तीन हजार सैन्य आलें. नीं शिद्दीच्या लोकांशीं संग्राम करून त्यांस पिटाळून लाविलें. हा असा ाठ्यांचा सज्जर मार मिळून त्यांचे पुष्कळ लोक प्राणास मुकले. तेव्हां भीतीनें नीं आपलें आरमार मुंबईबंदरांतून काढून नेलें.

तुकोजी पुनः काठी टेकीत टेकीत त्या दोन हूड पोरींचा शोध करण्याकरितां तात्या वैद्याकडे जावयास निघाला. परंतु तो तेथें जाण्यापूर्वी आपण त्या दोघींचा शोध करूं या! आईचें औषध आणावयाचें आहे याची कमळजेला आठवण होतांच तिनें आपलें गाणें बंद केलें आणि मोहनेला घेऊन ती तात्यावैद्याकडे जाण्यास निघाली. तात्या आतां अगदीं म्हातारा झाला होता, परंतु त्याचा स्वभाव मात्र बदलला नव्हता. तो पूर्वींसारखाच गमती आणि थट्टेखोर होता. थट्टा मस्करी करूनच तो रोग्याचा अर्धारोग प्रथम नाहींसा करीत असे. अद्यापि तो वाड्यांतील रोग्यांना औषधोपचार करण्याकरितां जात असे. मोहना आणि कमलजा त्याच्या घरीं गेल्या, त्यावेळीं तात्या चूर्ण बनवीत बसले होते.

" कोण कमलजा ! काय पाहिजे ग तुला कमलजा, वर जा—खालीं जा—इकडे जा—तिकडे जा—अग कमलजा—बोल लवकर जा—सर्वच जा जा—"

" हें काय तात्या ! जा जा कुठें ? " मोहना हांसत म्हणाली.

" अग ही मोहना, नवऱ्याकडं अजून का जायना ?—पोरी मोहना, तुझा नवरा कांग अजून येईना ? "

तात्याचा विनोद ऐकून दोघींनाहि अतिशय हसूं लोटलें.

" कायग मोहना—ऐकना—सांगना बोलना—चल ना लवकर ! आतां तुमच्या सरूचं तारूं कसं आहे, शिगरू ! बोलना—लवकर. मोहना औषध हवं आहे व्हय ? "

मुली अतिशय हंसूं लागलेल्या पाहून म्हाताऱ्यानें मुकाट्यानें

औषध तयार करून कमलजेजवळ दिलें आणि ती जाऊं लागतांच तो हातवारे करीत म्हणाला, " कमलजा—लवकर जा—हें औषध घेऊन जा—पळत जा—धांवत जा—लोळत जा—पण लवकर जा—जा—जा—"

औषध घेऊन दोघीहि एकमेकींच्या खांद्यावर हात टाकून हांसत बाहेर पडल्या. त्यावेळीं रात्र बरीच झाली होती. आकाशांत चंद्र प्रकाश नसल्यामुळें तारकांच्या अंधुक प्रकाशांत आसपासचा प्रदेश अस्पष्ट दिसत होता. अर्धा रस्ता संपला तरी त्या दोघींना आपलें हसूं आवरेना ! त्या आपल्याच नादांत चालल्या होत्या. इतक्यांत बाजूच्या झाडींतून चार हत्यारबंद मोंगल पुढें आले. आणि त्यांनीं त्या दोघींच्या तोंडावर हात देऊन एखाद्या लहान पोरांप्रमाणें त्यांना चटकन् वर उचललें ! हा सर्व प्रकार एका क्षणांत झाला.

थोडा वेळ झाला. पुनः एक मनुष्य काठी टेकीत टेकीत त्या रस्त्यानें हळुहळू जाऊं लागला. तो जवळ येतांच कमलजेनें त्याला तात्काळ ओळखलें. तिनें क्षणभर धडपड करून आपलें तोंड मोकळें केलें आणि ' तुकोजीबाबा धांवा, ' अशी मोठ्यानें किंकाळी फोडिली !

" कोण ! कमल—"

अरेरे ! तुकोजीच्या तोंडून शब्द बाहेर पडतो न पडतो तोंच पाठीमागून त्याच्या पाठींत एक जोराचा दणका बसला ! ! त्याबरोबर बिचारा म्हातारा धाड्कन जमिनीवर आदळला ! ! !

———

# प्रकरण १२ वें.



## पदवी आणि भेटी.



ह्या प्रकरणांत मोहनेचा मोठ्या दुःखानें निरोप घेऊन सांवळ्या आपल्या बापासह आरमारावर आला. त्यांची बरीच निराशा झाली. वसईहून कुलाब्यास जावें, तेथें आपल्या मंडळींना भेटावें व तेथून पद्मदुर्गास जाऊन महाराजांनीं सनद दिल्याप्रमाणें बारा महागिऱ्या आपल्या ताब्यात घ्याव्या असा सांवळ्यानें स्वतःशीं विचार करून ठेविला होता. त्याचप्रमाणें गणोबा आपल्या बायकोला भेटण्यास उत्सुक झाला होता. परंतु एकाएकीं महाराजांकडून हुकूम आल्यामुळें त्यांना आपले बेत आणि उत्सुकता जागच्या जागींच दाबून ठेवणें भाग पडलें. गावांत गेलेली आरमारावरील खलाशी मंडळी परत येतांच दर्यासागरानें आपलें आरमार पुनः परत हांकारलें. त्यावेळीं दौलतखान आणि दर्यासागर यांच्या ताब्यांत सर्व आरमार मिळून जवळ जवळ एकशें साठ जहाजें होती. वारा अनुकूल असल्यामुळें हा जहाजांचा तांडा मोठ्या डौलानें सफर करीत चालला होता. दमनजवळ आरमार येतांच समोरून फिरंग्यांनीं तें अडविण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर तांडेलानें आरमारावरील तोफेला बत्ती देऊन शत्रूवर जाण्यास हुकूम केला. थोड्याच वेळांत त्यांचें युद्ध

सुरूं झालें. परंतु मराठ्यांच्या आरमारापुढें आपला टिकाव लागणार नाहीं, असें जाणून फिरंग्यांनीं मुकाट्यानें माघार घेतली. त्यांत शत्रूचें एक जहाज मराठ्यांनीं कैद केलें. आणि त्यांचीं बारा जहाजें खराब झालीं.

फिरंग्यांच्याबरोबर झालेल्या ह्या युद्धांत महाराजांच्या आरमाराची बरीच नासाडी झाली. त्यांचा दारूगोळा संपला. तेव्हां ही गोष्ट दर्यासागर सरदाराला महाराजांच्या कानावर घालणें भाग पडलें. त्यावेळीं महाराजांनीं फोंड्याच्या किल्ल्याला वेढा दिला होता. आरमारची हकीकत कळतांच सुरतच्या फ्रेंच लोकांपासून दारूगोळा आणि साठ तोफा विकत घेऊन राजापुरास त्यांचा संग्रह करावा आणि समुद्रकांठची विजापूरकरांचीं शहरें काबीज करावीं असा महाराजांनीं आरमारास हुकूम पाठविला.

ह्या हुकुमाप्रमाणें पुनः सर्व आरमार नव्या मोहिमीवर निघालें. त्यांनीं आपणाबरोबर फिरंग्यांचें कैद केलेलें जहाज घेऊन दाभोळच्या खाडींत अडकवून ठेविलें. तेथून सांवळ्यानें पद्मदुर्गांत जाऊन बारा महागिऱ्यांचा अधिकार घेतला. आतां तो स्वतंत्र झाला. दर्यासागर सरदाराच्या जहाजावर असतांना त्यानें आपल्या जहाजाची कशी व्यवस्था ठेविली आहे, त्याचप्रमाणें दौलतखान तांडेलानें आपल्या जहाजाची कशी व्यवस्था ठेविली हें त्यानें लक्षपूर्वक पाहून ठेविलें होतें. त्याचप्रमाणें, आपल्या सोईकरितां कांहीं फेरबदल करून त्यानें आपल्या ताब्यांत आलेल्या बारा महागिऱ्यांची व्यवस्था केली. थोड्यावेळांत त्यानें आपल्या जहाजांची केलेली व्यवस्था आणि शिस्त

पाहून दर्यासागर सरदाराला आनंद झाला. नंतर तें सर्व आरमार विजापूरकरांच्या समुद्रकांठच्या प्रदेशाला शह देण्याकरितां निघालें.

महाराजांनीं सोंपविलेली कामगिरी बजावण्यास आरमाराला फार प्रयास पडले नाहींत. त्यांनीं विजापूरकरांचीं कारवार, अंकोलें वगैरे शहरें काबीज केलीं. अशा रीतीनें महाराजांचें आरमार फार दूरच्या कामगिरींत गुंतलेलें पाहून नुकताच पराभव झाला त्याचा सूड उगविण्याकरितां घोडबंदरास वसाहत करून राहिलेल्या फिरंगी लोकांनीं पुनः गडबड आरंभिली. ती गोष्ट महाराजांना कळतांच त्यांना फार राग आला. त्यांनीं तात्काळ जारीचा हुकूम सोडून फिरंग्यांची घोडबंदराची वसाहत काबीज करण्याची आपल्या आरमाराला आज्ञा केली. पुनः आरमार नव्या मोहिमीवर निघालें. अशारीतीनें एकामागून एक मोहिमीवर आरमार गुंतून राहिलें. आणि गणोबा व सांवळ्या यांचा घरीं जाऊन आपल्या मंडळीस भेटण्याचा बेत लांबणीवर पडूं लागला.

इकडे महाराजांच्या मनांत एक विचार फार दिवसांपासून घोळत होता. प्राचीन काळीं ज्याप्रमाणें अनेक पराक्रमी हिंदुराजांस यथासांग राज्याभिषेक विधि होऊन त्यांनीं फौजफांटा न्यायमनसुबा, प्रधानमंत्री वगैरे व्यवस्था केल्या, तसें आपणहि करावें, असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले. त्याचप्रमाणें त्यांना वाटूं लागलें कीं, आपला अम्मल महाराष्ट्र देशभर चोहोंकडे पसरला आहे, आपणापाशीं प्रधान मंत्री वगैरे कारभारी झाले आहेत, एकलक्ष सैन्य आपल्या हाताखालीं होऊन तें विजापूर, गोवळकोंडे येथील सुलतानापासून दरसाल खंडण्या

उकलीत आहे; दिल्लीच्या बादशहाबरोबर युद्ध करून, त्याचे कित्येक शूर शूर सरदारांचा आपण पाडाव केला आहे, जागोजाग आपलीं किल्ले कोट, ठाणीं झालीं आहेत, समुद्रांत आरमार होऊन त्याचा दरारा इंग्रज, फिरंगी, फ्रेंच, इत्यादि व्यापाऱ्यांवर चांगला बसला आहे, आपणांस चोहोंकडे 'महाराजा' असें लोक ह्मणतात व आपलें नाणें सर्वत्र चालू आहे, न्यायसुबाही चांगल्याप्रकारें चालून प्रजापालन उत्तम प्रकारें होत आहे, तेव्हां आपण स्वतः निर्माण केलेल्या हिंदुसाम्राज्याचें स्वतंत्र सिंहासन स्थापन करून, आपले पूर्वज ज्याप्रमाणें छत्रसिंहासनयुक्त राज्य करीत आले, तसें आपणास करण्यास आतां सर्व गोष्टी अनुकूल आहेत. सिंहासनारूढ होऊन यथाविधि राज्याभिषेक होईपर्यंत, आपली गणना केवळ पाळेगारांतच होणार असा सर्व गोष्टीचा योग्य विचार करून महाराजांनीं एक मोठा दरबार भरवून त्यांत आपले विचार आपल्या सरदार लोकांस कळविले, तेव्हां सर्वांचें अनुकूल मत पडलें.

त्या दरबाराला आरमारावरील सरदार आणि मुख्य अधिकारी यांनाहि महाराजांनीं बोलाविलें होतें. त्यावेळीं सांवळया आपल्या बापासह आरमारावरील सरदाराबरोबर रायगडास आला होता. त्याला महाराजांनीं मुद्दाम रायगडास बोलाविलें होतें. मातुश्री जिजाबाईसाहेबांस लहान मुलांनीं केलेल्या शौर्याची हकीकत ऐकून विशेष प्रेम वाटत असे. आमच्या कथानायकाविषयीं महाराजांजवळ बोलतांना आईसाहेबांनीं त्याला पाहण्याची आपली इच्छा एकवेळ दर्शविली होती. सांवळया रायगडास आल्यावर आईसाहेबांस मुजरा करण्याकरितां

गेला, तेव्हां महाराज म्हणाले, " माझ्या आरमारावरील ह्या बाल-वीराला पाहण्याची आईसाहेबांना इच्छा होती. "—असें म्हणून त्याच्या शौर्याची थोडीशी हकीकत सांगून महाराज पुढें म्हणाले, " हाच तो माझा सांवळया तांडेल. "

जिजाबाईसाहेबांनीं त्याला जवळ घेतलें आणि आपल्या बाजूला बसविलें. क्षणभरानें त्या म्हणाल्या, " शिवबा, सांवळया हें नांव लहानपणींच बरं दिसतं. पण आतां तुझा हा सांवळया मोठा झाला आहे. तेव्हां ह्याला तसेंच मोठें नांव हवें आहे. मी ह्याचें ' हंबीरराव ' हें नांव आजपासून ठेवतें. "

" आईसाहेबांची आज्ञा मला वंद्य आहे. "

सांवळया आठ दिवस रायगडावर होता. शेवटीं सर्व हिंदु-स्थानच्या इतिहासांत केवळ सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा दिवस उगवला. महाराज सिंहासनारूढ झाले. सर्वत्र आनंदी

---

१ त्या दिवशीं ( ६ जून १६७४ ) सकाळीं रायगडावर एकच गडबड उडून गेली होती. चोहोंकडे आनंदाचे शब्द, जयघोष, मंगलवाद्यांचे सुस्वर ऋत्विजांचा वेदवाणीचा पवित्र घोष हीं ऐकूं येऊं लागलीं. महाराज पहांटेस उठून, पत्न्या व पुत्रांसह मंगल स्नानें करून व उत्तम वस्त्रें व अलंकार घालून, व श्रीभवानी देवीस, मातोश्री जिजाबाई, कुलगुरु व इतर विद्वान्, वैदिक शास्त्री पंडित यांस नमस्कार करून, सुमुहूर्तें घटी प्राप्त होतांच अभिषेकास सिंहासनावर येऊन बसले. त्यांचे शेजारीं त्यांच्या स्त्रिया—सोयराबाईसाहेब व पुतळाबाईसाहेब, ह्या पटबंधन करून पट्टराण्या होऊन बसल्या. त्यांचे सन्निध संभाजी आणि राजाराम हेहि येऊन बसले. सिंहासनाच्या सभोंवतीं आठ दिशांस आठ प्रधान, कोणी सुवर्णकलश, कोणी रौप्यकलश, कोणी ताम्रकलश, कोणी छत्र, कोणी-

आनंद झाला. अष्ट प्रधानांची नेमणूक केल्यावर पुनः महाराजांनीं मोठा दरबार भरविला. ह्या दरबाराला दूरदूरचे राजे, त्यांचे वकिलें आले होते. त्यांनीं हजारों रुपयांचे नजराणे आणले होते. ह्या दर-

चामर असे घेऊन उभे राहिले. त्यांचे पलीकडे गागाभट्टजी व इतर ऋत्विज, उत्तम वैदिक, शास्त्री पंडित हे राजमंडळावर पवित्र मंत्रोदकाचें अभिषिंचन करीत उभे राहिले. हा विधि चालत असतां मंगलवाद्यें, भेरी, नृत्य, गायन, वाद्य, जयशब्द, तोफांची सरबत्ती इत्यादिकांनीं तो सर्व प्रदेश दणाणून गेला. जागोजाग स्वराज्यांत किल्ले, दुर्ग होतें, तेथें पूर्वी सूचना पाठविल्याप्रमाणें एकाचे तोफेचा आवाज ऐकून दुसऱ्या किल्ल्यांत, ह्याप्रमाणें चोहोंकडे किल्ल्यावरून एकसारखा तोफांचे सरबत्तीचा व जयघोषाचा आवाज होऊं लागला. महाराजांनीं ह्याप्रसंगीं दानधर्म फार केला. त्यांनीं आपली सुवर्णतुला करविली. तिचें वजन सोळाहजार होन भरलें. तें सर्व ब्राह्मणास वांटून दिलें. गागाभट्टजी यांचा उत्तम मान करून त्यांस लक्ष रुपये दक्षिणा दिली. ऋत्विजांस पांचपांच हजार रुपये दिले. इतर विद्वान्, वैदिक, शास्त्री पंडित यांस कोणास हजार, कोणास पांचशें, चारशें असे योग्यता पाहून दिले. गोसावी, गरीब, भिक्षुक यांस चार, दोन, एक ह्याप्र-माणें वांटले. यानंतर महाराजांनीं आपले अष्टप्रधान, सरदार, मानकरी, कारकून वगैरे लोकांस कोणांस हत्ती, कोणांस घोडे, कोणांस पालखी, कोणांस कंठा, कोणास चौकडे, पोशाख असे योग्यते प्रमाणें बक्षिस दिलें.

१ त्यावेळीं मुंबईच्या इंग्रज व्यापारांच्या तर्फे हेन्री आक्झेंडन व फ्रायर असे दोन गृहस्थ राज्याभिषेक समारंभाकरितां गेले होते. त्यांपैकीं हेन्री आक्झें-डन ह्यानें महाराजांशीं इंग्रजाच्या तर्फे तहाचीं कलमें सादर केलीं. त्यांत इंग्रजांस मराठी राज्यांत व्यापार करूं द्यावा, व्यापारमाल येईल जाईल त्यावर शेंकडा अडीचरुपये प्रमाणें जकात महाराजांस द्यावी, महाराजांचे मुलखांत दर्याचे काठीं इंग्रजांची जहाजें फुटून किनारीं लागण्यास त्यांतील माल इंग्रजास परत द्यावा, इंग्रजी नाणें मराठी राज्यांत चालूं द्यावें अशा चार मागण्या होत्या. त्यापैकीं महाराजांनीं पहिल्या दोन मान्य केल्या, व बाकीच्या अमान्य केल्या.

बारांत महाराजांनीं अनेक शूरवीरांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें बक्षिसें दिलीं. त्यांत आमच्या कथानायकाला ' हंबीरराव ' ही पदवी आणि पोशाख देऊन वीस महागिऱ्यांवर असामी दिली.

सांवळ्याला ' हंबीरराव ' ही पदवी, बक्षिस आणि असामी मिळाली ही हकीकत ताबडतोब कुलाब्यास सर्वांना कळली. कारण सरकारी डांकेबरोबर त्याच्या बापानें तुकोबाला एक खासगी पत्र पाठविलें. त्यांत ती सर्व हकीकत सविस्तर रीतीनें लिहिलेली होती. ह्याप्रमाणें रायगडास राज्यारोहणाचा उत्सव चालला असतां मोंगल आणि शिद्दी मुंबईच्या बंदरांत शिरले आहेत, अशी बातमी आली. तेव्हां महाराजांनीं महादाजी मोहिते नांवाच्या सरदाराबरोबर तीन हजार सैन्य देऊन आरमारावरील सर्व मंडळीसह त्यास ताबडतोब शत्रूवर रवाना केलें.

हां हां ह्मणतां सर्व सैन्य कल्याणच्या खाडींत आलें. तेथें येतांच सर्व सैन्य आपल्या आरमारावर घेऊन दर्यासागर तांडेलानें आपल्या निरनिराळ्या बंदरांच्या संरक्षणाकरितां थोडी थोडी जहाजें पाठविलीं. सांवळ्यानें आपलीं वीस जहाजें बरोबर घेऊन कुलाब्याचा रस्ता धरला. महादाजी हा सरदार त्याच्याच जाहजावर होता. ह्या सरदाराच्या हाताखालीं सांवळ्याच्याच वयाचा मानाजी भालेकर नांवाचा एक हवालदार होता. याची आणि आमच्या कथानायकाची बरीच गट्टी जमली होती. हा हवालदार आपल्या सरदाराच्या प्रीतींतील होता.

हंबीरराव—आतां आपण सांवळयाला ह्या नांवानें हांक मारूं—आपलें आरमार घेऊन कुलाब्याजवळ येतांच मोगलांचीं जहाजें त्यांच्या दृष्टीस पडलीं. थोड्याच वेळांत दोन्हीं बाजूनें तोफांचा गडगडाट सुरू झाला. हळुहळू जहाजाला जहाज भिडूं लागलें. हंबीरराव हातांत तरवार घेऊन शिडाच्या कांठीला धरून आपल्या मंडळीला उत्तेजनपर शब्दानीं पुढें सरसावण्यास सांगत होता. त्याच्या बाजूला महादाजी उभा होता. इतक्यांत मोगलांच्या जहाजावरून ' दादा, दादा ' असा स्पष्ट ध्वनि हंबीररावाच्या कानीं पडला. त्याबरोबर तो चपापला. कमलजेचा आवाज त्यानें तात्काळ ओळखला.

" सांवळ्या—आपली कमलजा, अरे—ती—ती पहा मोहना——आणि तुकोजी—" पाय उंच करून गणोबा मोंगलांच्या जहाजाकडे बोट दाखवून ह्मणाला. हंबीररावाचें तिकडे लक्ष होतेंच. तो एकदम ह्मणाला, " मानाजी, पाण्यांत उड्या टाका, ती पहा—त्या जहाजावर आपली मंडळी कैदी आहेत——"

परंतु मानाजीनें उडी टाकेपर्यंत हंबीररावानें वाट पाहिली नाहीं. त्यानें स्वतः एकदम पाण्यांत उडी टाकिली. त्याबरोबर त्याच्या मागून मानाजी आणि दुसऱ्या पांच पन्नास बहाद्दरांनीं धडाधड उड्या टाकिल्या !

जहाजावरील मोंगल खलाशी त्या पाण्यांतून पोहून आलेल्या शत्रूंला जहाजावर चढूं देईनात. त्यांना जहाजावरून [illegible] चांगलें फावत होतें. बराच वेळ झाला. मानाजी पाण्यांत [illegible]



मोहनेनें मागें वळून पाहिलें आणि क्षणार्धांत आपलें मस्तक आपल्या प्राणदात्या प्रिय कराच्या बाहूंत ठेऊन ती मूर्च्छित झाली.

( पृष्ट १५३. )

रुढतां मागच्या बाजूनें मोंगलांच्या जहाजावर चढला. आपणांपैकीं एकजण वर चढलेला पाहतांच बाकीच्या मंडळीला ईर्षा येऊन ती भराभर वर चढूं लागली. तें पाहून मोंगल खलाशी अतिशय चवताळले. त्यांनीं जहाजावर कैद असलेल्या दुर्दैवी कैद्यांना मारण्याचा सपाटा चालविला. एकानें कमलजेला उचलून पाण्यांत फेंकून दिलें, दुसऱ्यानें मोहनेवर शस्त्र उगारलें, तिसऱ्यानें एकाला भयंकर वार करून जखमी केलें.

" मानाजी, तिला सांभाळा. दुष्टा–" असें ह्मणून हंबीररावानें मोहनेवर शस्त्र उगारणाऱ्या मोंगलाचें धडापासून शीर वेगळें केलें ! मोहनेनें मागें वळून पाहिलें आणि क्षणार्धांत आपलें मस्तक आपल्या प्राणदात्या प्रियकराच्या बाहूंत ठेऊन ती मूर्च्छित झाली.

" हंबीरराव–हंबीरराव–मला मदत–" कमलजेसह मानाजी पाण्यांत बुडत असतां मोठ्यानें ओरडून ह्मणाला.

हंबीररावानें सांगतांच मानाजीनें पाण्यांत उडी टाकून मोठ्या संकटानें पाण्यांत कमलजा बुडत असतां तिला धरलें होतें. बराच वेळ पोहून तो आतां शक्तिहीन झाला होता. तरी देखील मोठ्या शौर्यानें त्यानें कमलजेला बेशुद्ध स्थितींत पाण्याच्या वर धरलें होतें. परंतु फार वेळ त्याला धीर धरवेना, तेव्हां तो मोठ्यानें ओरडला. त्याची आरोळी ऐकतांच हंबीररावानें एकवेळ सभोंवार पाहिलें. त्यावेळीं त्याचे दोन चार खलांशी साधारण जखमी झालेले त्याच्या दृष्टीस पडले. परंतु मोंगलांचा एकही खलाशी त्याला दिसेना. सर्व खलाशांचीं प्रेतें जिकडे तिकडे अस्ताव्यस्त पडलीं होतीं. तें पाहून त्याला बरेंच

माधान झालें. त्यानें आपल्या बाहुंपाशांत मूर्च्छित झालेल्या मो-
नेला हळूंच खालीं निजवून मानाजीच्या साह्यार्थ धांव घेतली.

मराठ्यांच्या आरमारानें मोगलाचीं जहाजें पिटाळून लाविलीं.
यांच्या जहाजावरून हंबीररावानें चाळीस कैद्यांची सुटका केली.
शेवाय सहा हतभागी कैदी मोंगलानें क्रूरपणानें मारले होते. सुटका
केलेल्या कैद्यांत कमलजा, मोहना, आणि म्हतारा तुकोजी ही
याचीं प्रिय माणसें होतीं. थोड्या वेळानें गणोबानें आपलें जहाज
यांच्या जवळ आणलें. नंतर महादाजी सरदार आणि गणोबा हे
हंबीररावानें काबीज केलेल्या मोंगलांच्या जहाजावर चढले. तुको-
बाला पाहतांच गणोबा त्याच्याजवळ जाऊन त्याला कडकडून भेटला.

" काय सांगूं तुम्हांला राव, प्रसंग मोठा कठीण आला होता, "
तुकोबा म्हणाला, " तरी मी ह्या पोरींना सांगत होतों कीं, एकट्या
दुकट्या कुठें जात जाऊं नका ह्मणून! पण ह्या हूड पोरी माझं
म्हाताऱ्याचं ऐकतात कशाला! काल संध्याकाळीं कुठें रमत बसल्या–"

इतक्यांत कमलजा शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडतांच जवळ
बसलेला गणोबा तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां 'बाबा' असें ह्मणून
तिनें आपल्या बापाच्या गळ्याला घट्ट मिठी मारिली. तिच्या
डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. क्षणभरानें ती हुंदके देत देत ह्मणाली,
" बाबा, इतक्या वर्षांनीं तुला आमची आठवण झाली काय? आज दादा
होता ह्मणून नाहीं तर आमचं काय झालं असतं!–ही कमलजा पुनः
कधीं तुमच्या दृष्टीस पडली असती काय? ऐन वेळेवर–"

"थांब कमलजे, मी होतों ह्मणण्यापेक्षां हे मानाजी होते असं ह्मण. त्यांनीं तुला मोठ्या संकटानें बुडतां बुडतां स्वतःचा जीव धोक्यांत घालून वांचविलें आहे."

आपल्या भावाचें भाषण ऐकून कमलजेनें कृतज्ञतेनें मानाजीकडे पाहिलें. दोघांची एकदृष्टि होतांच तिनें चट्कन आपली दृष्टि जमिनीकडे फिरविली.

दोन प्रहरच्या सुमारास हंबीररावानें आपलें आरमार कुलाब्यास लाविलें. त्याबरोबर 'श्रीशिवाजी महाराजकी जय' ह्या खलाशांच्या मंगल आरोळ्यानें सर्व किनारा अगदीं दणाणून गेला. सर्व मंडळी घरीं आल्यावर त्यांच्या आनंदाचें वर्णन कोण करणार! गणोबा— आपला पति आला असें कळतांच सरू धांवत बाहेर आली आणि तिनें आपल्या पतीच्या पायांवर डोकें ठेविलें. अहाहा! त्यावेळीं गणोबाला किती आनंद झाला असेल बरें? इतक्यांत सुभानजी जवळ आला. त्याची आणि गणोबाची पूर्वींची ओळख होती. त्यानेंच सुभानजीला कुलाब्याची माहिती सांगून तुकोजी वाड्यांत असतो असें सांगितलें होतें. आणि त्याच माहितीवरून सुभानजी कुलाब्यास येऊन तुकोजीला भेटला होता. ती हकीकत पांचव्या प्रकरणांत आली आहे. त्यावेळीं गणोबानें आपलें नांव मात्र त्याला सांगितलें नव्हतें. कारण आपल्या मारानें आपली बायको मेली असें समजून नांव कळल्यास आपणांस खुनी ह्मणून कोणी पकडील अशी त्याला दहशत होती. सुभानजीला पाहतांच हंबीररावाला दुर्बीण आणि होकायंत्र यांची एकदम आठवण झाली. चार वर्षांपूर्वीं तो कुला-

ऱ्यास आला असता त्या दोन्ही वस्तु त्यानें तुकोजीजवळ दिल्या होत्या. त्या अद्यापि त्याच्याचजवळ होत्या. आपल्या मागें कदाचित् त्या वस्तु तुकोबानें सुभानजीला दाखविल्या असतील असें वाटून त्यानें सुभानजीला विचारलें, "बाबा," सुभानजीला तो बाबा ह्मणून ह्मणत असे हें वाचकांच्या लक्षांत असेलच! "बाबा, तुकोजी बाबानें दाखविलेल्या त्या वस्तु तुह्मीं ओळखल्या काय?"

"कुठल्यारे सांवळ्या त्या वस्तु?—मी नाहीं अद्यापि त्या पाहिल्या!"

"सांवळ्या, मी कुठें अद्यापि त्या सुभानरावाला दाखविल्या आहेत." असें ह्मणून तुकोजी सुभानरावाकडे वळून ह्मणाला, "काय सांगूं तुह्मांला राव, सांवळ्यानें त्या मजजवळ दिल्या त्या मी तशाच वाड्यांत पेटीमध्यें घालून ठेविल्या आहेत—"

हंबीरराव त्याचें भाषण ऐकत उभाच राहिला नाहीं. तडक त्यानें वाड्याकडे धांव घेतली. त्याला धांवतांना पाहून सर्वांना त्याचें कौतुक वाटलें. कारण अशातऱ्हेनें धांवण्यास आतां तो लहान नव्हता. थोड्या वेळानें तुकोजीच्या पेटींतून दुर्बीण आणि होकायंत्र घेऊन तो परत आला. तो एकदम धांवत कां गेला हें सुभानजीच्या लक्षांत आलें नाहीं. तो कोठल्या वस्तु ह्मणाला, त्या पाहण्याविषयीं तो अगदीं उत्सुक झाला होता. हंबीरराव परत येत असतां त्याच्या हातांत त्या ओळखीच्या दोन वस्तु पाहून सुभानजी चपापला. त्यानें हंबीररावाच्या हातांतून त्या दोन वस्तु घेतल्या. वस्तु घेतांना त्याचा हात मात्र थरथरत होता.

“ सांवळ्या, ह्या वस्तु—तुझ्याकडे कशा आल्या ?—” दुर्बीण आणि होकायंत्र निरखून पहात सुभानजी कांपऱ्या आवाजांत ह्मणाला, “ सांवळ्या—सांग तुला ह्या कोणी दिल्या ? ह्या माझ्या वस्तु माझ्या बायकोजवळ होत्या—पण—ती—”

“ मानाजीराव, जा आपलें तें मोठ्या शीडाचें लहान जहाज ह्या बाजूला खाडींत घेऊन या—जा लवकर. आजचा हा खरोखर आनंदाचा दिवस आहे. ” असें ह्मणून सांवळ्या सुभानजीला ह्मणाला, “ ह्या वस्तु तुमच्या तुह्मीं ओळखल्या ना ! थांबा—बाबा आतां थोडावेळ थांबा. तुमच्या प्रश्नाचें उत्तर मी आतां देतों. हा पहा मी आलोंच ! ”

कपडे चढवून हंबीरराव पुनः पळत पळत खाडींत आला. मानाजीनें जहाजाचें शीड नुकतेंच जोडलें होतें. सुदैवानें त्यावेळीं वारा फारच उत्तम वहात होता. हां हां ह्मणतां त्यांचें जहाज चेऊलच्या खाडीला लागलें. घरांतून निघतांना तो कोणाबरोबर बोलला नाहीं त्यामुळें तो कोठें गेला असावा हें कोणालाच कळलें नाहीं. सुभानजी तर अतिशय घोटाळ्यांत पडला. त्यानें दुर्बीण आणि होकायंत्र ओळखलेलें पाहून हंबीररावाच्या मनांत जनाबाईविषयीं पूर्वीं जो संशय आला होता तो खरा ठरला. जनाबाई ही सुभानजी नाईकाची बायको अशी आतां त्याची पूर्ण खात्री झाली. वादळांत सांपडून ती एका किनाऱ्याला लागली आणि सुभानजी दुसऱ्या किनाऱ्याला लागला. त्यामुळें आपली बायको वादळांत सांपडून मेली असें सुभानजीला वाटून त्यानें अगदीं वैराग्य धारण केलें होतें. आणि इकडे जनाबाई पति जिवंत असून वैधव्यांत दिवस काढीत होती. हंबीरराव आला

त्यावेळीं जनाबाई बाहेर बसली होती. इतक्या वर्षांनीं त्याला पाहून जनाबाईला अत्यंत आनंद झाला.

" सांवळ्या, अरे आहेस तरी कुठें ? पदव्या आणि इनामें मिळविण्यांत गर्क झाला आहेस वाटतं ! बरा आहेस ना ? "

" तुमच्या आशीर्वादानें बरा आहें. पण चला लवकर मजबरोबर. तुह्मांला मी नेण्याकरितां आलों आहें. आज आमच्या घरीं मोठा समारंभ आहे. "

" कसला ! तुझ्या लग्नाचा काय ? बैस, ऐकूं दे तरी सर्व हकीकत. मी समजत होतें कीं, तूं मला विसरलास ह्मणून ! "

" वाः असं कधीं तरी होईल काय ? पण चला—"

हंबीररावानें तिला जास्त बोलूंच दिलें नाहीं. घाई करून त्यानें तिला जहाजावर आणलें. घरीं समारंभ कसला आहे ह्मणून जनाबाई त्याला एकसारखें विचारीत होती. परंतु त्यानें तिला जास्त कांहींच कळूं दिलें नाहीं. जहाजांत येऊन बसल्यावर आपणास मिळालेली महाराजांकडून सनद, पोषाख आणि पदवी याविषयीं सविस्तर हकीकत सांगून त्यानें कुलाब्याची खाडी येईपर्यंत वेळ मारून नेला. रात्रीच्या सुमारास त्यांचें जहाज कुलाब्यास आलें. घरीं सर्व मंडळी त्याची उत्सुकतेनें वाट पहात बाहेरच बसली होती. आज सरूला नवा उत्साह आला होता. आज ती स्वतः स्वयंपाक करण्याच्या गडबडींत गुंतली होती. बाहेर ' दादा आला, " असा कमलजेचा शब्द ऐकतांच हातांतील काम ठेऊन

ती बाहेर आली. हंबीरराव बरोबर एक स्त्री येत आहे असें त्यांना दिसलें. ती स्त्री कोण असावी ह्मणून प्रत्येकाच्या मनांत निरनिराळे विचार येऊं लागले. कारण जनाबाईला त्यांनीं कधींच पाहिलें नव्हतें. फक्त तिला ओळखणारा सुभानजीच होता. तुकोबाच्याहि ती ओळखीची होती परंतु त्याची ओळख आतां साफ बुजाली होती. जनाबाईला घेऊन हंबीरराव घराजवळ येतांच सुभानजीची आणि तिची नजरानजर झाली. त्याबरोबर जनाबाई एकदम वाटेंतच उभी राहिली. आपण खरोखरच आपल्या पतीला पाहतों किंवा आपणास हा भास होत आहे हें तिच्या लक्षांत येईना. सुभानजीचीहि तीच स्थिति झाली.

" आहे खराना हा आनंदाचा दिवस ! बाबा, तुमच्या प्रश्नाचें उत्तर पाहिजेना? घ्या—आतां ओळखून आपआपलीं माणसं ! "

हंबीररावानें असें ह्मणतांच सुभानजीनें प्रेमातिशयानें आपले बाहू पसरले. आणि जनाबाई त्या बंधनांत येतांच ते दोन्हीं बाहू त्यानें घट्ट मिटले ! ही भेट पाहून सर्वांना गहिंवर आला. परंतु मोहनेला मात्र किंचित् चमत्कारिक वाटूं लागले. आपल्या आईची इतक्या वर्षांनीं भेट होऊन ती आपली कांहीं चौकशी करीत नाहीं असें पाहून तिला वाईट वाटूं लागलें. आजपर्यंत ती सुभानजीला आपला बाप असेंच समजत असे हें वाचकांना माहिती आहेच ! बराच वेळ झाला, तरीहि जनाबाई आपणांस जवळ घेत नाहीं असें पाहून तिच्या डोळ्यांत पाणी आलें. ती हळूंच पुढें झाली आणि सुभनजीच्या खांद्यांवर डोकें टेकून हुंदके देऊं लागली. प्रथम तिची ही कृति सुभानजीच्या

लक्षांत आली नाहीं. शेवटीं ती अस्पष्ट आवाजांत हुंदके देत विचारूं लागली, "बाबा, ती आईना!—ती मला नाहीं जवळ घेत—" हें मोहनेचे शब्द ऐकून जनाबाई गोंधळली. तेव्हां सुभानजीनें मोहनेच्या डोक्यावरून हात फिरवून तिला जनाबाईजवळ नेलें आणि ह्मणाला, "ही आपली धर्म मुलगी. घे हिला जवळ आणि तिची समजूत कर. पोरी तुझे आईबाप आतां आह्मींच ! आजपर्यंत ही गोष्ट मी तुला सांगितली नाहीं पण आतां सांगतों." असें ह्मणून त्यानें आपला वृत्तांत सांगण्यास सुरवात केली. सर्व हकीकत क्रमाक्रमानें सांगून वादळांत आपणांस पाळणा कसा सांपडला ती हकीकत तो सांगूं लागला. बाजूला बसलेली मंडळी त्याचें भाषण लक्षपूर्वक ऐकत होती. परंतु महादाजीचें लक्ष सुभानजीच्या हकीकतीनें जास्त वेधलें होतें. पाळणा सांपडला ती हकिकत ऐकून महादाजीनें मोठ्या उत्कंठेनें सुभानजीला विचारलें, "नाईक, ती वादळांत सांपडलेली मुलगी हीच काय ?"

"होय. तुह्मीं मघां त्या चांडाळांच्या हातून सोडलेली तीच ती ही माझी मोहना !"

"ही मोहना, ही तुह्मांला वादळांत सांपडली ?" पुनः त्यानें विचारलें. आणि मोहनेकडे पहात तो विचारांत गर्क झाला.

"हिच्या आईबापाचा मी पुष्कळ शोध केला परंतु हा वेळपर्यंत मला कांहीं पत्ता लागला नाहीं. परंतु हिच्याबरोबर सांपडलेल्या वस्तु—हिचा पाळणा, हिच्या अंगावरील ते बाळपणचे कपडे आणि

गुंडाळलेली ती जरीची लहान शाल अद्यापि मीं नीट जपून ठेविली आहे. कदाचित्–"

" मला दाखवाल का त्या वस्तु ? "

" हो, न दाखवायला काय झालं ! पण तो पाळणा राहिला वसईस, बाकीच्या वस्तु आहेत येथें. मोहनां, बाळ तें पेटींत बोचकें आहे तें आण पाहूं. "

मोहना मुकाट्यानें उठली. बोचकें आणतांना तिला सुभानजी नेहमीं सांगत असलेल्या वाक्याचा खरा अर्थ आतां कळला. तिनें कैकवेळां त्या बोचक्यांतल्या जिनसा कोणाच्या ह्मणून त्याला विचारलें होतें. तेव्हां " ह्या वस्तु एका वादळांत सांपडलेल्या मुलीच्या आहेत, " ह्या पलीकडे त्यानें तिला कांहींच सांगितलें नव्हतें. मोहनेनें आणून दिलेल्या बोचक्यांतून सुभानजीनें त्या वस्तु महादाजिच्या हातांत दिल्या. पुष्कळवेळ महादाजी त्याकडे पहात राहिला. क्षणभरानें त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. त्याला अनावर हुंदका आला. शेवटीं तो अस्पष्ट आणि कांपऱ्या आवाजानें ह्मणाला, " सुभानजी, ईश्वरी लीला अतर्क्य आहे ह्मणतात तें खोटें नाहीं. आतां माझी खात्री झाली–मोहना, ही माझीच मुलगी आहे. मोहना, ये–ह्या आपल्या हतभागी बापाला भेट–"

त्यानें पसरलेल्या बाहूंत जाण्यास मोहनेला किंचित् संकोच वाटला. परंतु जेव्हां तिनें आपलें मस्तक त्याच्या हृदयावर ठेविलें तेव्हां तें आपल्या बापाचेंच हृदय आहे असें, एक दैविक शक्ति तिच्या कानांत गुणगुणून सांगूं लागली. तिच्या नेत्रांतून अश्रुपूर वाहूं लागला. थोड्या वेळांत तिनें आपल्या अश्रुरूपीं प्रेमानें बापाचें

हृदयस्थळ भरून काढलें! आतां मात्र त्या घरांत सर्वत्र आनंदाचें पूर्ण साम्राज्य पसरलें!

त्या दिवशीं सरूनें जेवणाचा बेतहि अतिउत्तम ठेविला होता. सर्व मंडळीचें मोठ्या आनंदानें जेवण झालें. स्वयंपाक घरांत सरू आणि जनाबाई गुंतल्या होत्या आणि मंडळीला वाढण्याची कामगिरी मोहना आणि कमलजा यानीं पत्करली होती. जेवण आटोपल्यावर सर्व मंडळी पुनः एकत्र बसून आपआपली कर्मकथा सागूं लागली. कमलजा, मोहना, सरू आणि जनाबाई बाहेर बसलेल्या पुरुष मंडळीच्या गोष्टी ऐकत, आंतल्या बाजूला बसल्या होत्या. महादाजी सरदारानें आपली हकीकत सांगितली; ती संक्षिप्त रीतीनें वाचकांकरितां येथें देतों.

महादाजी जुमलेदार हा पूर्वीं बांदल देशमुखाच्या पदरीं हजार स्वारांचा सरदार होता. देशमुखाचा पराभव केल्यावर महाराजांनीं बाजी देशपांड्याप्रमाणें यालाहि आपल्या सैन्यांत असामी दिली. ही नवी नोकरी रुजूं करण्यापूर्वीं आपल्या कुटुंबांतील माणसांना भेटून शेताची व घरादाराची व्यवस्था लावावी ह्मणून तो महाडास गेला. तो महाडचा रहाणार असून घरांत त्याची बायको, लहान मुलगी शिवाय इतर कुटुंबाचीं माणसें होतीं. चार दिवस घरीं राहिल्यावर बरोबर बायको व मुलगी घेऊन तो दक्षिणेंत यावयास निघाला. ते दिवस पावसाचे होते. त्यांचें जहाज बाणकोटची खाडी सोडून पुढें आल्यावर एकाएकीं वादळांत सांपडलें आणि एका खडकावर आपटून फुटलें. त्या आपघातांत बरीच प्राणहानि झाली. महादाजी आणि दोन खलाशी इतकीं माणसें मोठ्या संकटानें कल्याणच्या खाडीला लागलीं. आणि लहान मलीचा पाळणा तसाच वाहत गेला. दुसऱ्या

दिवशीं थोडीं प्रेतें खाडींत वहात आलीं. त्या प्रेतांत महादाजीनें आपल्या प्रिय पत्नीचें प्रेत ओळखलें. तेव्हां त्याला अत्यंत दुःख झालें. बायकोप्रमाणें आपली लहान मुलगीहि वादळांत सांपडून बुडून मेली असावी, असें त्याला वाटलें. शेवटीं बिचारा दुःखी अंतःकरणानें महाराष्ट्रांत जाऊन महाराजांच्या सैन्याला मिळाला.

अशा रीतीनें प्रत्येकजण आपआपला वृत्तांत सांगण्यांत गढला होता. त्या दिवशीं मध्यरात्र होईपर्यंत त्याच्या सुखदुःखाच्या गोष्टी चालल्या होत्या. शेवटीं त्याच बैठकीला गणोबानें मुलांच्या लग्नाचा प्रश्न काढला. त्यावेळीं आंतल्या बाजूला आपणाजवळ बसलेल्या कमलजेला मोहना चिमटा घेऊन ह्मणाली, " का कमलजे, त्या कोपऱ्यांत ग काय इतकं मघांपासून एक चित्तानें पहात आहेस! तेथें काय एवढं पाहण्यासारखं आहे! मला तर तिकडे मानाजीराव बसलेले दिसतात. तूं कोणाकडे—त्यांच्याकडे का इतकं तनमन लावून पाहतेस?"

तोंच बाहेर महादाजी ह्मणाला, " गणोबा, आह्मीं मोहना तुमच्या पदरांत टाकिली तशीच तुह्मी कमलजा आमच्या पदरांत टाका. ह्या माझ्या मनाजीला तरी आतां माझ्या शिवाय कोण आहे? तोहि थोड्या दिवसांत महाराजांच्या लष्करांत माझ्यासारखा जुमलेदार होईल."

" ठीक आहे, जमवून टाका तर! काय तुकोजीराव, तुमचं काय मत आहे?" गणोबानें विचारलें.

" काय सांगूं राव तुह्मांला, आतां जमवून काय टाकायचं राहिलं आहे! हा तर योगायोगच जुळून आला आहे."

# प्रकरण १३ वें.



## चार वर्षांतील हकीकत.



ईश्वरी सूत्र निराळें असतें. मानव प्राणी आपल्या सुखाकरितां निराळीच धडपड करीत असतो आणि ईश्वरी–इच्छा असते निराळी ! हंबीरराव आणि मानाजीराव यांच्या लग्नांची तयारी मोठ्या कडाक्यानें सुरू होती. दोन दिवसांवर लग्नें आलीं, इतक्यांत मातोश्री जिजाबाईसाहेब स्वर्गवासी झाल्याची बातमी एकाएकीं कुलाब्यास आली. ही खबर कळतांच आमच्या मंडळीची बरीच नाउमेद झाली. महाराज दुःखांत असतां आपण लग्नाचा समारंभ करावा हें अगदीं गैर आहे, असें त्यांना वाटूं लागलें. परंतु त्यांना लग्न समारंभ लांबणीवर टाकतां येईना. कारण महादाजी सरदार आणि मानाजी यांस बरोबर आणलेलें लष्कर घेऊन परत दक्षिणेंत जाण्याची घाई होती. तेव्हां नाइलाजास्तव दोन दिवस उशीरां तीं दोन लग्नें त्यांनीं उरकून घेतलीं.

वास्तविक पाहिलें असतां महाराजांवर तो घोर प्रसंग आला होता. राज्याभिषेक होऊन थोडे दिवस झाले नाहींत तोंच मातुश्रीसाहेब निवर्तल्या, त्यामुळें महाराजांना किती दुःख झालें असेल याची कल्पना देखील करवत नाहीं. परंतु महाराज मोठे विवेकी

होते. आपला राज्यारोहणसमारंभ आपल्या मातोश्रीनें पाहिला यांतच समाधान मानून त्यांनीं दुःखांत सुख मानिलें. असो.

आमचीं नुकतीच विवाह झालेलीं जोडपीं परस्परांच्या संगतींत मोठ्या प्रेमांत होतीं. रोज सायंकाळच्या सुमारास हंबीरराव मोहना आणि मानाजी कमलजा हीं दोन जोडपीं वाळूंत किंवा नावेंत बसून पाण्यांत सहल करतांना दृष्टीस पडत असत. एके दिवशीं तीं जोडपीं नावेंत बसून मौजेनें सहल करीत असतां मुंबईपासून दहा अकरा मैलाच्या अंतरावर गेलीं होतीं. तेथून जवळच दिसणाऱ्या एका लहानशा बेटाकडे कमलजेचें लक्ष गेलें. ती ह्मणाली, "दादा, हें रे कुठलें बेट ? यांत वस्ती दिसत नाहीं, सर्वच जंगल वाढलं आहे वाटतं !"

"तें का ? त्याला खांदेरी आणि त्याला उंदेरी अशीं नांवें आहेत." जवळ जवळ असलेल्या त्या बेटाकडे बोट दाखवून हंबीरराव ह्मणाला, "मानाजीराव, ह्या बेटांविषयीं माझ्या मनांत पुष्कळ वेळ विचार आले. ह्या दोन बेटांपैकीं एखाद्यावर महाराजांनीं आपल्या आरमाराचं ठाणं केलं तर पुष्कळ फायदा होईल असं मला वाटतं. ही गोष्ट महाराजांच्या मनांत यावयाला पाहिजे होती. कदाचित् आलीहि असेल परंतु त्यांत कांहीं तरी गोम असल्याशिवाय महाराजांनीं तिकडे दुर्लक्ष केलें असेल—"

"होय. अशीच गोष्ट असली पाहिजे. नाहींतर महाराजांचं धोरण कधींहि चुकायचं नाहीं, अशी माझी चांगली खात्री आहे. आतां हेंच पहाना ! पूर्वीं महाराष्ट्रांत सर्वत्र एकच झोटिंगपादशाही

झाली होती. कोणी कोणाला विचारीत नव्हतं; बादशहाची नोकरी करून ते देतील तो तुकडा एखाद्या इमानी कुत्र्याप्रमाणें खावा परंतु स्वदेशाविषयीं किंवा स्वधर्माविषयीं, इतकंच नव्हे तर स्वतःचें आपलें कर्तव्य काय आहे याची देखील त्यांना ओळख नव्हती. परंतु ही गोष्ट महाराजांच्या लक्षांत किती लवकर—अगदीं बाळपणांत—आली, याची आठवण झाली ह्मणजे ते खरोखरच ईश्वरी अवतार आहेत अशी आपली खात्री होते. प्रथम त्यांनीं धोरणाधोरणानें एकएक नाका पकडून आपल्या जहागिरीच्या आसपासचे कांहीं किल्ले काबीज केले; आणि त्यावरच स्वराज्याचा शुद्ध पाया बांधला, हें त्यांचें धोरण चुकीचें काय? हंबीरराव, तुह्मीं हे असे दूर—शिद्दी, फिरंगी, इंग्रज यांच्यांत असल्यामुळें महाराजांच्या मुख्य धोरणाची तुह्मांला क्वचित्‌च कल्पना होत असेल! महाराजांनीं कैकवेळां आपले विचार बोलून दाखविले आहेत. "आपणाला गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करून आर्यमातेचा उद्धार करावयाचा आहे. आणि ही कामगिरी आपल्या हातून तडीस जाण्याकरिता आह्मां मराठ्यांची पांगलेली शक्ति एकवटली पाहिजे," हे महाराजांचें उद्गार कैकवेळां आमच्या कानावरून गेले आहेत."

अशा रीतीनें एकीकडे हंबीरराव आणि मानाजी यांच्या गोष्टी चालत आणि दुसरीकडे कमलजा आणि मोहना यांचा विनोद सुरू होत असे.

"कायग मोहने, त्या दिवसाची तूंच ना! मी तुला बऱ्याचं सांगायला आलें कीं, एकटं दुकटं फिरणं चांगलं नाहीं, तर ह्मणे मी का आतां पोर आहें? पोर नव्हतीस—चांगली थोर होतीस, मग काग त्या मेल्यांनीं पकडून नेलं जहाजावर?"

" नेलं पकडून ह्मणून तर मानाजीरावांना निमित्त मिळून ते धांवत आले आणि आमच्या कमलजाबाईना बुडतां बुडतां वांचविलं, समजलीस ? तुझी आणि मानाजीरावांची ओळख व्हावयाला जर कांहीं कारण असेल तर त्याच्या मुळाशीं मीच आहें हो ! "

हा त्यांचा विनोद नेहमीं चालत असे. परंतु जनाबाई आणि सरू यांचा विषय कांहीं निराळाच असे.

" कांहीं ह्मणा, ईश्वरी सूत्र कांहीं निराळेंच असतें. सर्वांच्या भेटी अशा एकाच दिवशीं अगदीं अकल्पित रीतीनें व्हाव्या यालाच तर ईश्वरी लीला ह्मणतात. "

" खरंच, तुह्मी ह्मणतां तें कांहीं खोटें नाहीं सरूबाई. त्या मेल्या फिरंग्यांच्या हातून आमची सुटका केल्यापासून हंबीररावाचं माझ्याकडे सारखं येणं जाणं होतं. पण एकदां देखील त्यानें वसईस आपण कोणाकडे राहतों तें सांगितलें नाहीं आणि मींहि विचारलें नाहीं. मला जर नांव कळतं तर केव्हांच आमची ओळख पटली असती !"

"पण हें व्हावं कसं ! हेंच पहा—आज चार वर्षे झालीं ती तुह्मीं सांवळ्याला दिलेली दुर्बीण वाड्यांतील दादा जवळ होती. पण त्याला नाहीं ती सुभानरावांना दाखवायची बुद्धि झाली ! तें कांहीं नाहीं, ईश्वरानें प्रत्येक गोष्टीला काळवेळ ठरविला आहे हेंच खरं ! "

दुपारच्या प्रहरीं एकीकडे त्या दोघींचें आपल्या पूर्व हकिकतीच्या वृत्तांतावर बोलणें चालत असे; तों दुसरीकडे सुभानजी, गणोबा, तुकोबा, महादाजी आणि वाड्यांतील कांहीं मंडळी, चिलिमीचे झुरके

घेत आपापल्या आयुष्यांतील घडलेल्या ठळक ठळक गोष्टी परस्परांना सांगण्यांत अगदीं चूर असे.

"मी खलाशी ह्मणून प्रथम राहिलों तो हंबीरराव सरदाराच्या जहाजावर!" गणोबा बोलत होता, "फारच तो सज्जन मनुष्य! माझ्यावर त्याचं फार प्रेम. कधीं ह्मणून कोणाला दुखवायचा नाहीं. त्याचं मरण पहा कसं चमत्कारिक! महाराजांचा हुकूम नसतां फक्त बायकोचा हट्ट ह्मणून त्यानें तिला आपणांबरोबर जहाजावर घेतलें. त्यापूर्वीं त्यानें कधींहि आपल्या बायकोला जहाजावर नेलें नव्हतें. पण ह्मणतात ना—वेळ आली कीं, बुद्धि सुचायचीच! त्यावेळीं महाराजांची गोव्याची मोहिम सुरू होती.त्या मोहिमेंत शत्रूच्या गोळ्यानें त्याचें जहाज फुटलें. तेव्हां बायकोला वांचवावी ह्मणून तो तिला घेऊन पोहून जात होता. चांगला पाव मैल पोहून गेला आणि आतां आपणापैकींच एका जहाजावर तो चढणार तोंच तें जहाज एकदम भडकलें. त्या जहाजावर दारूगोळयाचा संग्रह केला होता. एकाएकीं त्या जहाजाचा कसा भडका झाला ते मात्र कळलें नाहीं. परंतु त्या जहाजावरील साठ पासष्ट खलाशांबरोबर तें सरदाराचें जोडपेंहि मेलें!"

"अरेरे! वाईट झालं!" महादाजी ह्मणाला, "पण गणोबा, मृत्युवेळा आली ह्मणजे मनुष्याला तशी बुद्धि सुचायचीच! आता हें पहा, तुमच्याबरोबर तो सुरतच्या मोहिमींत असलेला प्रतापराव गुर्जर सरनोबत तुह्मांला माहिती आहे! तो कसा शूर प्रतापी योद्धा

१ प्रतापराव गुजर हा महाराजांच्या लष्करांत सरनोबत होता. त्याच्या एका चुकीबद्दल महाराजांनीं त्याला दोष दिला, आणि 'तुह्मीं आपल्या बेकैद वर्तनानें

होता तो ? पण त्याचा विनाशकाल आला तेव्हां त्याची बुद्धि फिरली. महाराज एका गोष्टविरून त्याला कांहीं बोलले त्याचा राग मानून तो निघाला. आणि शेकडों लोकांसह अविचारानें शत्रूवर जाऊन रणात पडला. "

अशा रीतीनें त्या कुटुंबाचा काळ मोठ्या सुखांत जात असे. असे पंधरा दिवस गेल्यावर महादाजी, मानाजी आणि कमलजा यांचा दक्षिणेंत जाण्याचा दिवस उगवला. सरूला त्या दिवशीं बिलकूल चैन पडलें नाहीं. कारण कमलजा आतां गेली ह्मणजे तिची आणि आपली लवकर भेट होणार नाहीं हें ती जाणून होती. शेवटीं मोठ्या दुःखानें परस्परांचा निरोप घेऊन महादाजी सरदार आपल्या मंडळी-सह दक्षिणेंत निघून गेला. कमलजा गेल्यानंतर मोहनेला आठचार

आह्माला नाखुष केलें आहे. आतां विजापूरकरांची फौज सफाई बुडविल्याखेरीज आमच्या समोर कदापि येऊं नये.' असा निरोप पाठविला. त्यामुळें त्याला पराका-ष्ठेचा त्वेष येऊन तो शत्रूच्या सैन्यावर आवेशानें चालून गेला. त्यावेळीं मुसलमान सरदार अबदुल करीम मोठ्या सैन्यानिशीं पन्हाळ्यावर चालून आला होता. त्या हल्ल्यांत प्रतापराव शेंकडों लोकांसह धारातीर्थी पतन पावला. त्याच हल्ल्यांत हंसाजी मोहिते पुढें आला. त्यानें विलक्षण पराक्रम करून शत्रूवर विजय मिळ-विला. ह्याच हंसाजीला ' हंबीरराव ' अशी पदवी देऊन महाराजांनीं आपल्या अष्टप्रधानांत सरनोबत–सेनापति–केलें. आपल्या ठपक्यामुळें आवेशाला चढून प्रतापराव समरभूमीवर पडला त्याबद्दल महाराजांना अत्यंत खेद वाटला. तो मोठा शूर आणि अत्यंत पराक्रमी होता. त्यानें एकनिष्ठेनें आणि शौर्यानें केलेली सेवा महाराज विसरले नाहींत. त्यांनीं त्याच्या नातलगांस आणि पदरच्या लोकांस चांगल्या नेमणुका करून दिल्या. व त्याच्या एका मुलीशीं आपला पुत्र राजाराम ह्याचें लग्न करून त्याच्या कुटुंबास आपलें नातलग केलें.

दिवस बिलकूल गोड वाटलें नाहीं. तिला राहून राहून कमलजेच्या विनोदी भाषणाची आठवण होई. सरूलाहि ती गेल्यापासून अगदीं चुकल्यासारखें वाटत होतें. महादाजीनें कबूल केल्याप्रमाणें प्रत्येक महिन्याला त्यांच्याकडून खुशालीचें पत्र नियमानें येत असे. आणि त्या पत्राच्या मजकुरावर सरूच्या मनाचें समाधान होत असे.

असो. हंबीररावाचें लग्न होऊन आतां जवळ जवळ चार वर्षे झालीं. ह्या चार वर्षांत त्याचें आरमार बहुतेक स्वस्थच होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तितक्या अवधींत गणोबाच्या कुटुंबाला दोन माणसें अधिक वाढलीं. कमलजेला मुलगा झाल्याची बातमी आल्यानंतर आठ महिन्यांनीं मोहनेला मुलगी झाली. आणि कुलाब्यांतील आपल्या परिचयांतील दोन वृद्ध माणसें निवर्तलीं. तीं दोन माणसें ह्मणजे वाड्यांतील तुकोजी कडु आणि तात्या वैद्य होत. ह्या दोघांच्या मृत्यूमुळें त्या कुटुंबाला अतिशय दुःख झालें.



# प्रकरण १४ वें.



## आरमारावरील शेवटची मोहीम.



'क्षत्रिय कुलावतंस श्री शिवछत्रपति' असा किताब धारण करून महाराजांनीं स्वतःस मोठ्या थाटानें राज्याभिषेक करून घेतला व चिरवांच्छित हिंदुपदपादशाही पुनः स्थापन केली, हें वर्तमान औरंगजेब बादशहाला कळलें तेव्हां त्याला अतिशय वाईट वाटलें. त्यानें चोहोंकडून महाराजांची सत्ता हाणून पाडण्याचा विचार केला. परंतु महाराजांस टक्कर देण्यांस त्याला आपल्या दरबारांत एकहि शूर पुरुष दिसेना. त्यानें प्रथम दक्षिणेंतील आपला सुभेदार दिलारखान यास मोठी फौज घेऊन महाराजांच्या मुलुखांत शिरण्याची आज्ञा केली. अशा रीतीनें दक्षिणेंत पुनः लढाई सुरू झाली. परंतु महाराजांच्या समुद्रकांठच्या प्रांतांत शत्रूची विशेष गडबड नव्हती. मोंगल, शिद्दी, आणि फिरंगी यांची महाराजांनीं बरीच रग जिरविली होती. महाराजांची खोडी काढण्यास त्यांच्या अंगांत आतां विशेष त्राण राहिलें नव्हतें. तरी मधून मधून त्यांचीं जहाजें भेद काढण्याकरितां येत असत. परंतु

१ ह्या समारंभास एकंदर खर्चाचा आंकडा एक कोटि बेचाळीस लक्ष होन झाला असें बखरकार ह्मणतात.

समुद्र किनाऱ्यावरील प्रत्येक ठाणावर महाराजांच्या आरमाराची सज्ज तयारी असल्यामुळें त्यांची बिलकूल डाळ शिजत नसे. फ्रेंच आणि इंग्रज पूर्वी पासूनच महाराजांना भिऊन होते. आतां राहिले डच लोक! त्यांनीं मात्र महाराजांना इतराप्रमाणें त्रास दिला नाहीं.

महाराजांनीं कर्नाटकांतील मोहिम आटोपल्यावर जंजिरा हस्तगत करण्याचा पुनः एक वेळ प्रयत्न केला. त्या वेळीं जंजिऱ्याचा सरदार शिद्दी काशीम याच्या लोकांचा मुशाहिरा थकल्यामुळें ते फार बेदिल झाले होते. अशा रीतीनें तो संकटांत आहे असें पाहून महाराजांनीं आपलें आरमार तयार करून जंजिऱ्याला पाण्यांतून वेढा दिला आणि त्यावर तोफांचा भडिमार चालविला. परंतु महाराजांचा हाहि प्रयत्न फुकट गेला. आपणांस ह्या कामांत यश कां येत नाहीं याचा शेवटीं महाराजांनीं बारकाईनें विचार केला तेव्हां त्यांस असें कळून आलें कीं, आपल्या ह्या पाण्यांतील शत्रूच्या हालचालीवर नजर ठेवण्यास आपणांस जवळची जागा नसल्यामुळें मोंगल आणि शिद्दी, इंग्रजांच्या आश्रयानें वाटेल तेव्हां मुंबईबंदरांत दडी मारून राहतात. तेव्हां त्याला काय युक्ति योजावी असा प्रश्न उद्भवला. हंबीररावाच्या मनांत खांदेरी उंदेरी ह्या दोन बेटांविषयीं पुष्कळ दिवस विचार घोळत होता. तो त्यानें महाराजांच्या कानावर घातला.

" हंबीरराव, तुह्मीं सुचविलेला विचार योग्य आणि फायदेशीर दिसतो. तुह्मीं स्वतः त्या दोन्हीं बेटांची पहाणी करून तेथें काय आहे, आपणांस तेथें काय करतां येईल याची चौकशी करून या." महाराजांनीं आमच्या कथानायकाला आज्ञा केली.

महाराजांकडून ही कामगिरी मिळतांच हंबीररावाला अतिशय आनंद झाला. त्यानें त्या दोन्ही बेटांविषयीं पुष्कळ वेळां विचार करून तेथें किल्ले बांधले असतां शत्रूला जेरीस आणण्यास उशीर लागणार नाहीं असें मत ठरविलें होतें. त्या दोन्ही बेटांवर कधींच कोणीं वस्ती केली नसून त्यावर पुष्कळ रान वाढलें होतें. त्याची नीट पहाणी करून हंबीररावानें महाराजांस कळविलें. तेव्हां त्यावर मजबूत किल्ले बांधण्याचें त्यांनीं मनांत आणिलें, आणि ती कामगिरी त्यांनीं हंबीररावावरच सोंपविली. पुढें लवकरच खांदेरी बेटावर तटबंदीचें काम झपाट्यानें सुरू झालें. परंतु हें वर्तमान इंग्रजांस कळतांच ते मोठ्या फिकीरचि पडले. त्या बेटावर महाराजांचें ठाणें झालें असतां आपणांस धोका पोंचेल असें जाणून ते त्या बेटावर आपला हक्क सांगूं लागले. ही बातमी वसईच्या फिरंगी लोकांस कळताच तेहि त्या बेटावर आपला हक्क सागूं लागले. परंतु महाराजांनीं त्यांच्याकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं.

महाराज ऐकत नाहींत असें पाहून इंग्रजांनीं आपलीं तीन जहाजें खांदेरी बेटावर महाराजांच्या कामास प्रतिबंध करण्यास पाठविलीं. आणि त्यांनीं महाराजांच्या लोकांस बेट सोडून जाण्यास सांगितलें. परंतु अशा डरकावणीला भीक घालणारा आमचा कथानायक नव्हता. ‘ आमच्या स्वामीकडून हुकूम आल्याशिवाय आह्मी आमची कामगिरी सोडणार नाहीं. इतकेंच नव्हे तर तुह्मी आमच्या कार्यांत विघ्न आणल्यास आह्मीं शस्त्र उगारण्यास कमी करणार नाहीं. ’ असा त्यानें इंग्रजांना निरोप पाठविला.

दहा दिवस इंग्रजाच्या जहाजांनीं बेटासभोंवतीं घिरट्या घातल्या परंतु हंबीररावानें त्यांना बेटाजवळ येऊं दिलें नाहीं. तेव्हां आपल्या मदतीला सोळा तोफा मागवून आणखी कांहीं जहाजें इंग्रजांनीं मागविली. त्या जहाजावरील इंग्रज तांडेल आपलीं जहाजें बेटाला लावून कांहीं लोकांनिशीं बेटावर चढला. तेव्हां महाराजांच्या लोकांची आणि इंग्रजांची झटापट होऊन हंबीररावानें इंग्रजांच्या मुख्य तांडेलास आणि सहा इंग्रज शिपायांस ठार मारून बाकीच्यांस कैद करून ठेविलें.

हळूहळू ह्या लहानशा झटापटीला लढाईचें स्वरूप प्राप्त झालें. इंग्रजानीं आपल्या वरिष्ठापाशीं आणखी कुमक मागितली. तेव्हां इंग्रजांचीं एकंदर साठ जहाजें खांदेरीकडे आलीं. इकडून दर्यासागर आणि दौलतखान यांनींहि हंबीररावाच्या मदतीला आपलें आरमार आणिलें. त्यावेळीं त्यांचें युद्ध झालें, त्यांत महाराजांचीं पांच जहाजें बुडालीं. महाराजांचें यांत बरेंच नुकसान झालें. हें वर्तमान दक्षिणेंत कळतांच तेथून पाच हजार फौजेची कुमक आली. तेव्हां मात्र त्यांच्या शत्रूला अतिशय दहशत पडली. इंग्रजांनीं ताबडतोब आपला वकील रायगडावर तह करण्याकरितां पाठविला.

अशा रीतीनें इंग्रज स्तब्ध बसलेले पाहून मोंगल सरकारानें शिद्दी काशीम यांच्या लोकांचा थकलेला मुशाहिरा चुकवून त्यांना मराठ्यांच्या आरमारावर पाठविलें. त्यांनीं प्रथम इंग्रजांला फितविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. त्यांनीं उंदेरी बेटावर तोफा चढवून तेथून महाराजांच्या आरमाराशीं युद्ध आरंभिलें. ह्या युद्धांत शिद्दी विजयी झाला. महाराजांचीं लहान मोठीं नऊ

जहाजें नाश पावलीं. त्यांच्या आरमाराचा सरदार दौलतखान आणि गणोबा जखमी होऊन शिवाय पांचशें लोक प्राणास मुकले. पुष्कळ लोक शिद्दीच्या हातीं सांपडले. तेव्हां उरलेलें आरमार आणि घायाळ झालेले लोक महाराजांस राजापूरास नेणें भाग पडलें.

त्या लढाईंत आपल्या बापाचा हात आणि पाय जखमी झाल्या-मुळें हंबीररावाला फार चिंता उत्पन्न झाली. त्याच्या मनांतून आपल्या बापाजवळ राहण्याचें फार होतें, परंतु खांदेरी किल्ल्याचें रक्षण करण्यास त्याच्याशिवाय दुसरा योग्य मनुष्य नसल्यामुळें त्याला बापाबरोबर जातां आलें नाहीं. आमच्या कथानायकाच्या मनाची ही चलबिचल महाराजांच्या लक्षांत येऊन त्यांनीं गणोबाची चांगली व्यवस्था केली. तो बरा झाल्यावर त्याला वार्षिक वेतन देऊन आपल्या सिंधुदुर्गांत राखणदार ह्मणून ठेविलें. बापाची नीट व्यवस्था लाग-लेली पाहून हंबीररावाचें मन शांत झालें. तितक्या अवधींत राजा-पुराहून जहाजें दुरुस्त होऊन आलीं. ह्यावेळीं हंबीररावानें मोठ्या शौर्यानें उंदेरी बेटावर शिद्दीच्या लोकांनीं दिलेला तळ साफ उडवून त्यांना पळावयास लाविलें.

इकडे इंग्रजांचा वकील रायगडास जाऊन त्यानें महाराजांबरोबर पुनः तह केला. त्या तहांत ' इंग्रजांनीं शिद्दीच्या आरमारास आ-पल्या बंदरांत थारा देऊं नये. आणि पावसाळ्यांत कदाचित् आश्रय

---

१ हा तह मार्च १६८० त झाला. हा तह झाला तरी आपल्या बंदराजवळील दोन्ही बेटें–खांदेरी आणि उंदेरी–मराठ्यांच्या ताब्यांत जाऊन त्यांवर त्यांचीं ठाणीं बसलीं याबद्दल इंग्रजांना मोठें वैषम्य वाटूं लागलें. तीं आपल्या ताब्यांत

दिलाच तर त्यांनीं त्याच्याकडून महाराजांच्या मुलखास किमपि उपद्रव न करण्याचा करार करून घ्यावा ' असा ठराव करून घेतला. ह्या तहानंतर खांदेरी आणि उंदेरी हीं बेटें¹ महाराजांच्या ताब्यांत पूर्णपणें आलीं. तेथें जें आरमार महाराजांनीं ठेविलें त्यावर त्यांनीं हंबीररावाची नेमणूक केली.



---

असावीं असें त्यांच्या मनांत फार होतें. यास्तव मराठ्यांशीं लढून तीं परत घेण्याविषयीं त्यांनीं ' कोर्ट आफ् डायरेक्टरा ' पाशीं परवानगी मागितली. परंतु त्यांस ती मिळाली नाहीं. त्या कोर्टाचें असें ह्मणणें पडलें कीं, ' महाराजांबरोबर वैमनस्य करून आपणांस येथें थारा नाहींसा करणें यांत कांहीं शहाणपणा नाहीं.

१ हीं दोन बेटें ताब्यांत आल्यावर महाराजांना बऱ्याच गोष्टी आपल्या आटोक्यांत आल्या अशी खात्री वाटूं लागली. जंजिरा सर करण्याची त्यांची कित्येक वर्षांची इच्छा होती. तो किल्ला आपल्या हातीं यावा ह्मणून त्यांनीं जातीनें प्रयत्न केले परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. जंजिरा एकदां आपल्या स्वाधीन झाला ह्मणजे शिद्दी, मोंगल, फिरंगी इत्यादिकांना आपण वाटेल तसें वाकवूं अशी महाराजांना खात्री होती. परंतु ती इच्छा अनेक प्रयत्न करूनहि सफल झाली नाहीं तरी हीं दोन बेटें–खांदेरी आणि उंदेरी कबजांत येतांच त्यांना पुष्कळ आशा वाटूं लागली. परंतु ईश्वरी सूत्र कांहीं निराळेंच होतें ! हीं दोन बेटें कबजांत घेऊन पुढें ज्या गोष्टी कराव्या असें महाराजांच्या मनांत होतें त्या सिद्धीस न्यावयास महाराज जगले नाहींत. ही खांदेरीबेटाजवळील धामधूम संपल्यानंतर लवकरच महाराजांचें देहावसान झालें !



जंजिऱ्याचा किल्ला.

*The Lakshmi Art,—Bombay.*

# प्रकरण १५ वें.



## तेजस्वी तारा पडला !

प्रत्येक गोष्टीला तीन अवस्था आहेत. मग तो कोणीही प्राणी असो अथवा पदार्थ असो, सजीव असो वा निर्जीव असो, तिसऱ्या अवस्थेंत त्याचें स्थित्यंतर झालेंच पाहिजे. सर्व दिवस आपला प्रताप गाजवून आतां सूर्यनारायणाची प्रभा निस्तेज होऊं लागली. आकाशाचा पश्चिमेकडील भाग किंचित् आरक्त दिसत होता, तोहि आतां निस्तेज आणि काळा दिसूं लागला. इतक्यांत अंतरिक्षांत एक मोठा तारा पडतांना दृष्टीस पडला. त्याकडे पाहून हंबीरराव ह्मणाला, " मानाजीराव, हें काय आहे हो ? मी अगदीं लहान होतों तेव्हांपासून ह्या ताऱ्यांचा विचार करतों परंतु हें काय आहे, हेंच मला अद्यापि कळत नाहीं. आतां नुकताच एक मोठा तेजस्वी तारा मी पडतांना पाहिला. तूं पाहिलास का ? " मोहनेकडे वळून त्यानें विचारलें.

" माझें नाहीं लक्ष तेथें ! मी आपली माझ्या ह्या ताऱ्याबरोबर खेळतें. " असें ह्मणून मोहनेनें आपल्या चिमुकल्या प्रतिमोहनेला उचलून तिचें प्रेमानें चुंबन घेतलें.

" कां मानाजीराव, विचारांत कां पडलांत ? "

" छे; उगाच—पण एक तेजस्वी तारा खालीं पडतांना तुह्मीं पहिला ह्मणतां ? "

" होय. कां बरं ? "

" हे आकाशांतील तेजस्वी तारे ह्मणजे भूतलावरील प्रतापी पुण्यपुरुषांचीं प्रतिबिंबें आहेत असा माझा समज आहे. आणि तुह्मीं ह्मणतां आतां एक तेजस्वी मोठा तारा पडला—"

" मानाजीराव, हें काय मध्येंच काढलंत ! मी मघांपासून काय विचारतें त्याचं उत्तरच नाहीं ! तुमचा तारा कसा आहे तो सांगा पहिल्यानें; आणि आमच्या कमलजाबाई बऱ्या आहेत ना ? " मोहनेनें मध्येंच विचारलें.

गेल्या प्रकरणांत उल्लेख केला आहे, ती पांच हजारांची फौज आरमाराच्या कुमकेला आली होती त्यांत मानाजीहि आला होता. शिद्दी आणि इंग्रज यांची धामधूम संपल्यावर तो मुद्दाम हंबीररावाला भेटण्याकरितां खांदेरीच्या किल्ल्यांत आला होता. मोहनेचा प्रश्न ऐकून मानाजी ह्मणाला, " सर्व मंडळी मोठ्या आनंदांत आहेत. पण आमचा मुरारी तुमच्या सगुणेला भेटण्याविषयीं फार आतुर आहे. "

" होय तर! अशी भेट थोडीच होणार आहे ! कमलजेचं आणि माझं ठरल्याप्रमाणें तुमच्या मुरारीनें मागणी घातल्याशिवाय आमची सगुणा त्याच्या दृष्टीस थोडीच पडणार आहे ! "

" ऐका, हंबीरराव—हें काय बुवा नवीनच ऐकतों ! "

" त्यात काय नवीन ! आमचं हें पूर्वीं ठरलंच होतं. मला मुलगा झाला असता तर आह्मीं प्रथम मागणी घातली असती— "

" अस्सं काय ! एकूण तुमचं पूर्वींपासूनच ठरलं आहे तर !

ठीक आहे. हंबीरराव, तुमचं काय बुवा ह्मणणं आहे ? "

"ह्मणणं काय? मागणी घाला ह्मणजे कळेल." मोहना ह्मणाली. "ही पहा, माझी सगुणाहि हंसूं लागली!"

अशा तऱ्हेचा मोहनेचा विनोद चालला होता परंतु हंबीररावाचें तेकडे बिलकुल लक्ष नव्हतें. 'आकाशांतील तेजस्वी तारे हे भूतलावरील पुण्यपुरुषांचीं प्रतिबिंबें आहेत' ह्या मानाजीरावानें सांगितलेल्या वाक्यावर त्याचा विचार चालला होता. आपण एक अत्यंत तेजस्वी तारा पडतांना पाहिला याचा काय अर्थ असावा हें त्याच्या लक्षांत येईना. बराच वेळ विचार केल्यावर त्यानें पुनः मानाजीरावाला विचारलें, "कायहो मानाजीराव, मी लहान असतांना कुलाब्याच्या खाडींत वाळूंत बसून पुष्कळ तारे पडतांना पाहिले परंतु इतका मोठा आणि तेजस्वी असा तारा पडतांना आजपर्यंत कधींच पाहिला नव्हता. हे जर तारे भूतलावरील प्रतापी पुरुषांचीं प्रतिबिंबें आहेत असें तुह्मीं ह्मणतां तर हा मोठा तारा आतां पडला याचा अर्थ काय?"

"मी तरी यांत काय सांगूं! ह्या गोष्टी जाणत्या जोतिष्याशिवाय दुसऱ्याला कळणं कठीण!" किंचित् काळ थांबून मानाजीराव पुढें म्हणाला, "पण काय हो हंबीरराव, तुमच्या वडीलांना दुखात झाल्यावर त्यांची कांहीं खबर कळली कां ? "

"नाहीं अद्यापि. बाबा येथून सिंधुदुर्गांत गेल्यावर आईनें हिला आणि सगुणेला येथें पाठवून दिलं आणि ती गेली सिंधुदुर्गांत बाबांजवळ!"

" आतां येथील सर्व बंदोबस्त करून आह्मीं जाणार आहोंत दोन दिवसांनीं त्यांच्या खबरेला ! " मोहना मध्येंच म्हणाली.

" माझाहि विचार आहे तेथें जाण्याचा, " मानाजीराव ह्मणाला, तेथील खबर काढून मग जाईन दक्षिणेंत. "

बराच वेळ त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या, इतक्यांत बाहेरून पहारेकरी आंत आला. त्याच्या चर्येवरून तो घाबरलेला असा दिसत होता. त्यानें कांपऱ्या आवाजांत रायगडाहून पंडिताचें आज्ञापत्र घेऊन जासूद आला आहे असें कळविलें. थोड्या वेळानें जासूद आंत आला. त्यानें पत्र पुढें केलें परंतु तें देत असतांना त्याचा हात थरथर कांपत होता. हंबीरावानें पत्र हातांत घेतलें. त्यावर मोरोपंत पंडित प्रधान यांचा शिक्का होता. हंबीररावानें तें पत्र आपल्या मस्तकावर धरून नंतर वाचण्यास सुरवात केली. क्षणांतच त्याची चर्या बदलली ! त्याच्या हातांतून पत्र खालीं पडलें, आणि " हाय ! हाय ! ! तारा पडला ! ! !" असें ह्मणून त्यानें जोरानें कपाळावर हात मारून घेतला.

" काय झालें हंबीरराव ? " भयाभीत होऊन मानजीरावानें एकदम विचारलें.

"तेजस्वी तारा पडला ! प्रतापी सूर्य मावळला ! ! हाय हाय ! ! !"

मानाजीरावानें खालीं पडलेलें पत्र एकदम उचललें. आणि वाचण्यास आरंभ केला. त्यांत प्रत्येक मराठ्याचें हृदय विदारण करणारी महाराजांच्या निधनाची शोकजनक बातमी असून प्रत्येक ठाणेदारानें

१ खांदेरीबेटावर ठाणें बसवून ईंग्रजांस आणि शिद्दीस जागच्या जागीं बसविल्यावर महाराजांस अशी बातमी लागली कीं, औरंगाबाद येथील लष्कराच्या खर्चासाठीं पुष्कळ मोठी रक्कम दिल्लीहून येत आहे. त्यासरशीं त्यांनीं आपले निव.

णि किल्लेदारानें आपआपल्या ठाण्याची आणि किल्ल्याची पुढला हुकूम पर्यंत हुशारीनें व्यवस्था ठेवावी अशी पंतपंडितांची आज्ञा होती.

" मानाजीराव, अहो हे पहा असं काय करतात ! " मांडीवरें ळत असलेल्या सगुणेला खालीं टाकून मोहना एकदम उ ठली आणि ीरराावाजवळ धांवत गेली.

" हंबीरराव, हें काय असं वेड्यासारखं ! कपाळावर काय रून घेतां—थांबा, माझं ऐका—आतां झाली गोष्ट त्याला काय कर- र ! हें पहा—"

" तेजस्वी तारा पडला ! हाय ! ! हाय ! ! ! " असें ह्मणून ीररावानें पुनः एकदां अतिशय जोरानें कपाळावर हात मारून ला. त्याबरोबर बेशुद्ध होऊन तो धाडकन् जमिनीवर आदळला !

महाराजांच्या निधनाची बातमी आमच्या स्वामिभक्त तांडेलाच्या ीं लागली; त्याला सर्वत्र अंधःकार भासूं लागला. पत्र वाचतांच ाच्या डोक्यावर भयंकर परिणाम झाला, त्यांत त्यानें डोक्यावर ख वेगानें असह्य तडाखे मारून मस्तकांतील शिरानुशिरा हालवून डल्या आणि शेवटच्या तडाख्यानें शेवटीं तो बेशुद्ध होऊन

घोडेस्वार बरोबर घेऊन, कोणांस कळूं न देतां, ती रक्कम घेऊन येणारांवर केला. आणि शत्रूकडून हरकत होण्यापूर्वी ते रायगडावर अतिवेगानें येऊन ले. ह्या दौडीमुळें त्यांस अतिशय थकवा आला, त्यांच्या छातींत दुखूं लागलें, तून रक्त पडूं लागलें व अंगांत मनस्वी ज्वर भरला. हें दुखणें दिवसोंदिवस काधिक जड होत चाललें. पदरच्या लोकांनीं मोठमोठे वैद्य आणून नानाप्र- चे उपचार केले. नवस, अनुष्ठानें, जादुटोणे वगैरे प्रकारच्या उपायांची काष्ठा केली. पण कांहींएक उतार पडेना. शेवटीं ह्या महापुरुषानें (ता. ५ एप्रिल ८० ) दोनप्रहरीं अत्यंत शांतपणें व समाहित चित्तानें देहत्याग केला ! ! !

खालीं पडला! त्याबरोबर मोहनेनें मोठ्यानें किंकाळी मारिली. मानाजीरावानें लगबगीनें त्याला वर उचलून धरिलें. किल्ल्यांतील सर्व माणसें धांवत आलीं. महाराजांच्या निधनानें सर्वांना अत्यंत दुःख झालें होतें, त्यांत ही आपल्या प्रेमळ किल्लेदाराची शोचनीय स्थिति पाहून त्यांच्या दुःखाचा कडेलोट झाला. जो तो हंबीर-रावाला शुद्धीवर आणण्याकरितां अनेक उपायांची योजना करूं लागला. मानाजीरावानें बराच वेळ त्याच्या डोक्यावर पाणी झिंप-ल्यावर हंबीररावानें डोळे उघडले. परंतु ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. त्यानें पुनः विलक्षण हातवारे करून अंगाला पिळ देण्यास सुरुवात केली.

" मानाजीराव, काय हो हे असं करतात! पहा हो पहा, अग आई—धांवा हो धांवा—"

पुनः हंबीरराव बेशुद्ध झाला. मानाजीरावानें तावडतोब कुलाब्यास मनुष्य पाठवून वाड्यांतील वैद्याला बोलावून आणिलें. मोहना आपल्या पतीच्या उशाजवळ चिंताक्रांत बसली होती. वाड्यांतून वैद्य आल्या-वर त्यानें हंबीररावाच्या रोगाची चिकित्सा केली आणि सांगितलें कीं, " महाराजांच्या निधनाची बातमी एकाएकीं ऐकल्यामुळें त्याला जबरदस्त धक्का बसला आणि मानसिक शक्तीवर ताण पडून त्याला चित्तभ्रम झाला आहे. "

आठ दिवस नाना उपाय करून पाहिले परंतु हंबीररावाच्या भ्रमिष्ट स्थितींत कांहींच फरक पडला नाहीं. त्याला कोणी विचारल्यास ' तारा पडला! ' हें एकच उत्तर तो देत असे. आठ पंधरा दिवसानीं मानाजीरावानें किल्ल्याची व्यवस्था दुय्यम किल्लेदाराच्या स्वाधीन करून हंबीररावाला सिंधुदुर्गांत नेलें.

---

# उपसंहार.



रात्र पडून सर्वत्र निःस्तब्धता पसरली होती. नभोमंडळात असंख्य नक्षत्रांत मध्यभागीं येऊन रजनीनाथानें आपल्या कोमल किरणांनीं शीतल परंतु पिठासारखा स्वच्छ प्रकाश पाडला होता. पृथ्वीवरील एकंदर निःस्तब्धता पाहून ती जणूं काय निद्रावस्थेंतच आहे असें वाटत होतें. अशावेळीं सिंधुदुर्गाच्या तटावर आमच्या खास परिचयांतील दोन माणसें बसलीं होतीं. तीं दोन माणसें, हंबीरराव आणि मोहना होत. सिंधुदुर्गांत येऊन त्यांना दोन वर्षें झालीं होतीं. अद्यापि हंबीररावाचा चित्तभ्रम कमी झाला नव्हता. सर्व दिवसांतून अगदींच थोडावेळ तो चांगला शुद्धीवर असे. बाकी सर्व वेळ त्याचा भ्रमिष्ट स्थितींत जात असे. मोहना आपल्या पतीला एखाद्या लहान मुलाप्रमाणें रात्रंदिवस सांभाळीत होती. एक क्षणभरहि ती त्याला विसंबत नसे. रात्रीच्या प्रहरीं ती किंवा सरू यांचा त्याच्यावर सारखा पहारा असे. त्याला एकटेंच सोडल्यास कदाचित् तो स्वतःला कांहीं अपाय करून घेईल, असें वैद्यानें त्यांना सांगितलें होतें. गणोबा बिचारा पायानें अधु झाल्यामुळें त्याला आपल्या मुलाच्यामागें धांवपळ करतां येत नव्हती. त्यामुळें तें काम मोहनेलाच करावें लागे. आज देखील तो आपल्या लहरींत इतक्या रात्रीं तटावर येऊन आकाशाकडे पहात स्तब्ध विचार करीत बसला होता.

" चला गडे! आतां आपण कितीवेळ बरं बसणार येथें?"

" तूं कोण? थांब—तो पहा आतां एक तेजस्वी तारा उगवेल. तो पाहिल्या शिवाय येथून जावयाचें नाहीं. पण तूं कोण मला नेणार—मी नाहीं येत जा—"

" हें काय! मी तुमची मोहना ना! मला तुह्मी विसरलां काय?"

" को—ण—मो—हना! कुठली मोहना? तूं कांहीं तेजस्वी तारा नाहींस. प—ण—हं—हं—हं—आतां आलं लक्षांत. अरे तूं माझी मोहना! अरेरे! लाडके, पहा कसा मी तुला विसरलों होतों तो!" असें ह्मणून हंबीररावानें तिला जवळ ओढून आपल्या हृदयाशीं घट्ट धरिलें, आणि काळजीनें तिच्या निस्तेज झालेल्या गालाचें प्रेमानें चुंबन घेतलें.

" पण आतां नाहींना गडे मला विसरणार!"

" छे: छे: असं कसं होईल!—मोहने, पण तूं आतां पूर्वीसारखी नाहीं ती दिसत? तुझं तोंड अगदीं फिक्कट कां दिसतं?"

हंबीररावाचा असा प्रश्न ऐकून तिला गहिंवर आला. पतीच्या काळजीमुळें आपली अशी स्थिति झाली, आणि आपली अशी स्थिति होण्यास तुह्मीच कारण हें तिला सांगवेना. तिनें हंबीररावाच्या गळ्याला घट्ट मिठी मारिली!

" ऐक, असं वेड्यासारखं करूं नकोस! आतां एक तेजस्वी तारा उगवेल—तो पहा—तो पहा—"

असें ह्मणून हंबीररावानें अंतरिक्षांतील असंख्यात ताऱ्यांपैकीं एका मोठ्या ताऱ्याकडे बोट दाखविलें. आज तो अर्धवट शुद्धीवर होता. त्याला ज्या ह्या वेळोवेळीं निरनिराळ्या भ्रांतीकारक लहरी

येत असत त्याची मोहनेला चांगलीच माहिती झाली होती. तिनें हळुहळू त्याला आंत नेलें आणि बिछान्यावर निजविलें.

पुढें थोड्या दिवसांनीं ' संभाजी महाराज स्वतः जंजिऱ्यावर स्वारी करण्यास येत आहेत ' अशी बातमी दुर्गावर आली. ' महाराज येतात ' इतकीं अक्षरें हंबीररावाच्या कानीं पडतांच तो एकदम चपापला. त्यानें तात्काळ आरमारावर जाण्याची सिद्धता चालविली. त्याची गडबड पाहून तो खरोखरच शुद्धीवर आहे किंवा भ्रमांत आहे हें कोणालाच कळेना. मोहनाहि गोंधळली, ती हंबीररावाची समजूत करण्याचा प्रयत्न करूं लागली, तेव्हां तोच उलट तिची समजूत करून ह्मणाला, " वेडे, प्रत्यक्ष महाराज येत असतां मी जाऊं नको ह्मणून ह्मणतेस, याचा अर्थ काय ? आपला हंबीरराव आरमारावर नाहीं असें पाहून महाराजांना किती तरी वाईट वाटेल, याची तुला कल्पना तरी आहे काय ? "

शेवटीं नाइलाजास्तव गणोबानें दोन चांगलीं विश्वासू माणसें बरोबर देऊन हंबीररावाला दौलतखान तांडेलाच्या आरमारावर पाठविलें. आमच्या नायकाची ती शोचनीय स्थिति पाहून त्यालाहि फार वाईट वाटलें. हंबीरराव किती शूर योद्धा आणि उत्तम दर्यावर्दी होता हें सर्वांना माहित होतें. त्याच्याकडे पाहून आरमारावरील प्रत्येकाला वाईट वाटत होतें. दुसऱ्या दिवशीं संभाजी महाराज आरमारावर आले. दौलतखान तांडेलानें हंबीररावाला त्यांच्यापुढें नेलें. परंतु हंबीरराव संभाजी महाराजांना मुजरा करीना. तो एकसारखा त्यांच्या तोंडाकडे पहात राहिला.

" छेः हा नव्हे तो तारा ! तो तेजस्वी तारा पडला ! हाय हाय ! " पुनः त्याला चित्तभ्रम झाला.

हंबीररावाचें हें चमत्कारिक वर्तन पाहून संभाजी महाराजांनीं दौलतखानाला त्याच्याविषयीं माहिती विचारली. तेव्हां थोडक्यांत आमच्या कथानायकाच्या स्वामिभक्तीची ओळख करून देऊन दौलतखान म्हणाला, " आपले परमपूज्य थोरले महाराज निवर्तले, हें ऐकल्याबरोबर याची ही अशी शोचनीय स्थिति झाली. "

संभाजी महाराजांना हंबीररावाचा वृत्तांत ऐकून फार वाईट वाटलें. आपल्या वडिलांकरितां देह नव्हे तर मन देखील सर्वस्वी अर्पण करणारे हंबीररावासारखे शूर आणि स्वामिभक्त योद्धे आहेत, असें पाहून त्यांना गहिंवर आला. त्यांनीं तात्काळ हंबीररावास वार्षिक वेतन देऊन त्याची योग्य काळजी घेण्यास आपल्या मंडळीला हुकूम केला.

वाचकहो, येथें आमची गोष्ट आटोपली ! आमचा कथानायक शेवटपर्यंत त्याच स्थितींत होता. कोणी विचारल्यास ' हाय हाय, तारा पडला ! ' हें एकच त्याचें उत्तर असे. मोहनेला आपल्या पतीचा कधींहि कंटाळा आला नाहीं. ती रात्रंदिवस त्याची सेवा करण्यांत व त्याचे लहान मुलाप्रमाणें कोड पुरविण्यांस आनंद मानीत असे. चांदण्या रात्रीं ती आपल्या पतीला किल्याच्या तटावर नेऊन एखाद्या मुलाप्रमाणें त्याच्या बरोबर खेळून त्याचें हरतऱ्हेनें मन रंजवीत असे.

पुढें सगुणा मोठी झाल्यावर कमळजेचा मुलगा मुरारराव याच्या बरोबर तिचें लग्न झालें. हा मुरारी पुढें कान्होजी आंग्र्यांच्या आरमारावर फार प्रसिद्धीस आला.

---

# समारोप.



प्रस्तुतची कादंबरी फारच थोड्या प्रकरणांत आटोपली आहे. परंतु तसें करण्याचा मुख्य उद्देश इतकाच होता कीं, हें संविधानक फक्त श्रीशिवाजी महाराजांच्या आरमाराची माहिती व्हावी ह्या उद्देशानें जुळविलें असल्यामुळें फक्त ऐतिहासिक प्रसंगानुरोधानें त्याची जुळवणी केली. ऐतिहासिक प्रसंगास प्राधान्य न देतां कादंबरीची मांडणी केली असती तर हें पुस्तक फार मोठ्या प्रमाणावर देखील लिहितां आलें असतें परंतु माझ्या कांहीं विद्वान मित्रांनीं आणि हितचिंतकांनीं ऐतिहासिक प्रसंगासच प्रधान्य द्यावें असें मला सुचविलें आणि मलाहि तसेंच वाटलें म्हणून मी ही क़ादंबरी त्या धर्तीवर लिहिली आहे.

ही कादंबरी लिहून झाल्यावर सांवळ्या उर्फ हंबीरराव याचा मुलगा मुरारी, जो पुढें कान्होजी आंग्र्यांच्या आरमारावर प्रसिद्धीस आला ह्मणून उपसंहारांत शेवटीं लिहिलें आहे, त्याला नायक करून '**मराठ्यांचें आरमार** अथवा **मुरारी तांडेल**' या नांवाची, मराठ्यांच्या आरमाराच्या माहितीची मी कादंबरी लिहिण्यास सुरू केली. परंतु उत्तेजनाच्या अभावीं कांहीं प्रकरणें लिहून ही कादंबरीं तशीच सध्यां तरी अपुरी ठेवावी लागली आहे.



# हिंद एजन्सी-विविध-विषय ग्रंथमाला.

## नियम.

मराठी भाषेंत उत्तमोत्तम पुस्तक निर्माण होऊन तद्वारा मायभाषेची थोडीबहुत सेवा घडावी, या हेतूनें ही माला विजयदशमी शके १८३५ पासून आह्मी सुरू केलीं आहे. विविध विषयावरील मनोरंजक व बोधपर ग्रंथ या मालेंत प्रसिद्ध करण्यांत येतील.

मालेचे नियमः—

( १ ) मालेस ८ आणे आगाऊ प्रवेश फी भरून वर्गणीदार होणारांस मालेंतून प्रसिद्ध होणारी सर्व पुस्तकें निम्मे किंमतीस मिळतील.

( २ ) दरवर्षी मालेची ३।४ पुस्तकें प्रसिद्ध केली जातील.

( ३ ) मालेच्या प्रत्येक पुस्तकाची किं. -॥- हून कमी व दीड रुपयापेक्षां जास्त असणार नाहीं.

( ४ ) वर्गणीदारांस प्रथम पासून प्रत्येक प्रसिद्ध होणारें पुस्तक घेतलें पाहिजे.

मालेचें प्रथम पुष्प " **हेंच योग्य** " नामक एक सामाजिक सुंदर कादंबरी असून त्याची किं. १। रु. आहे. दुसरें पुष्प '**सीता-वनवास**' नामक एक पौराणिक सुंदर, बोधपर व चटकदार कादंबरी असून त्याची किं. १२ आहे. वर्गणीदारांस हीं पुस्तकें निंमे किंमतीस मिळतात.

**हिंद एजन्सी,**
बुकसेलर्स आणि पब्लिशर्स
**माधवबाग-मुंबई.**